पेशवे दप्तरांतून निवडलेले कागद

# ४१

# मराठी राज्याची अखेर

[ किंमत—४ रुपये १५ आणे किंवा ८ शिलिंग ३ पेन्स ]

संपादक—गो. स. सरदेसाई, बी.ए.

गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३४

## Selection No. 41.

### *THE LAST DAYS OF THE MARATHA RAJ,*

### 1. BAJIRAO II.

Maratha state-papers begin to lose their historical importance as one approaches the downfall of the Maratha Raj, their place being taken by the full and well-edited British records of statesmen like the Wellesleys and Mountstuart Elphinstone. The Peshwa Daftar does, however, now and then yield stray documents furnishing fresh and illuminating details. It is puzzling that so few of Bajirao's own state-papers are to be found. This is probably due to the fact that the last of the Peshwas, though not destitute of ability, was indolent and vicious, and left the conduct of public affairs to his officials. Whatever the true reason may be, the contrast becomes striking as one passes from the regime of Nana Fadnis to the succeeding period.

The crisis in Bajirao's fortunes was precipitated by Yashwantrao Holkar's invasion of the Deccan in the autumn of 1802. An eloquent letter incorporated in this selection is addressed by Yeshwantrao to Bajirao, in which he says : " The house of Holkar has been serving the Peshwa faithfully for generations and I am very anxious myself to continue to do the same loyal service. If Your Highness has taken offence at my own conduct or that of my brother, I beg to be forgiven and crave the same favour in the future as my house used to receive in the past " (30). This letter failed to pacify Bajirao, with a result equally detrimental to himself and his Raj. Yashwantrao invaded Poona and inflicted a crushing defeat upon the combined armies of Sindia and the Peshwa. The latter sought British protection at Bassein and contracted an engagement by which he basely surrendered the liberties of the Maratha Confederacy.

Although the papers here presented number about 300 and range over a period extending from 1796 to 1818, they do not bear upon all the important incidents of the regime of the last of the Peshwas. Some of the earlier events, such as his campaign against the Chhatrapati of Satara and his flight to Bassein, are rather scantily represented, and the period between 1803 and 1815 is hardly touched at all. But all through, there are curious side-lights, particularly on the life and habits of Bajirao himself. One paper alludes to a gold *hukka* ordered by Bajirao, and now an heirloom of the Peshwa's household, from which we may infer that he used to smoke tobacco (53). No such allusion has been discovered in the case of any of his predecessors. Bajirao's intrigues against the British Government extended to places so far distant as the Panjab, Afganistan and Nepal ; and Lord Hastings mentions in his private journal how Bajirao tried to induce the King of Burma to invade Bengal and cripple the British in that quarter. A few interesting details are revealed in some of the letters with reference to the fatal visit to Poona of Gangadhar Shastri, the envoy from Baroda, and his subsequent murder at Pandharpur. It was this crime which precipitated the fall of the Peshwa (84, 89, 91).

But it is the last Maratha War which is found most graphically depicted in these papers. Both Bajirao and the British Resident Elphinstone are

seen slowly drifting into a decisive conflict in which the Pindaris and several North Indian chieftains are implicated. The designs of the Chhatrapati of Satara and his surrender to the British power, the hard fought battles of Koregaon and Ashti, the flight of Bajirao and other important occurrences are here well depicted. Balajipant Natu is here seen persuading Bajirao's Sardar Aba Purandare to desert his master and join the English. Similarly Rango Bapuji is found working in Malwa under Col. Briggs, who won the battle of Mahidpur on 21st December 1817.

Similarly a quantity of striking information is supplied by numerous news-writers in the employ of Elphinstone, such as Balawantrao Bapuji, Raoji Balaji, Yeshwant Baburao, Rango Vasudeo who are writers of numerous letters addressed to Elphinstone some of which are now for the first time reproduced. After all, these agents appear to have imparted little really valuable information, although they were not slow afterwards to demand exorbitant rewards for their services. In fact one is struck with the unending claims forced upon the attention of the Bombay authorities by innumerable persons who had been given hopes of a lucrative bargain in that time of stress and difficulty. Bajirao too appears to have engaged similar agencies to supply news of the movements of the British; but it seems he was not faithfully served and those who, like Bahirao Narayan, many of whose letters, containing detailed information, are here reproduced, struggled hard to help him in various ways, invariably failed to secure encouragement from him.

Further details are revealed about the fate of Bajirao's notorious confidant Trimbakaji Dengale and the members of his family, under the British regime. The closing episode of the whole chapter is the despatch of the family-gods of the Peshwa from Wai to Brahmavarta so late as the year 1836. The varied contents of this selection will, it is hoped, supply matter of great historical interest, and at the same time furnish the student with a fair idea of the nature of the material he may expect to find in the Daftar bearing on the period.

## 2. DIARIES OF DAULATRAO SINDIA.

The last batch of 41 letters (276-316) forms an independent subject of its own and has consequently been kept separate. It gives realistic glimpses of the life and court of Daulatrao Sindia during a period of some four years (1811-1815) and singularly corroborate the eloquent pen pictures given in his letters by Broughton. They are addressed to Trimbakji Dengle at Poona by his agent, a relation of his, named Krishnaji Gaikwad who was stationed at Gwalior for that purpose. The papers here selected are only a few out of a large number that exist in the Daftar. They are mainly news-letters describing the doings of Daulatrao and incidentally offering minute and useful details, not only about political occurrences of the time, but about the social, religious and economic conditions then prevailing throughout the country, which students of history would love to learn.

No. 1] [1792?

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
हरिपंत तात्या यासी.

प्रति माहादेव शास्त्री आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणें विशेष. राजश्री बाळाजीपंत नातू याजला आपण हरकोठे अंनास लाविले पाहिजे म्हणून पूर्वी आपणाजवळ आम्ही बोललो होतों. त्याजवरी आपण मान्य केले. त्यास मारनिले दत्तरी उमेदवारीनें सरकारचे लिहिणे लिहितात. दोन वर्षे जाहाली, लिहिणार चांगले जाहाले. रामचंद्रपंत ढमढेरे यास आम्हींहि विचारिलें. त्यांणी प्रत्योत्तर दिल्हें कीं आमचे निशेचे आहेत. श्रम बहुत यांणी केला. कर्जदार लोकांचे बहुत जाहले आहेत. याची सोय आपण करून दिल्ही पाहिजे. तालुके रायगड हा किल्ला सरकारांत नवा घेतला तेथें असामी कारकुनाच्या होतील, यास्तव आपणास याचे चालवणं. आपले जावई व आमचे भाचे हे आपले स्वकीये आहेत, यांस तेथे एक असामी आपण करून दिल्ही पाहिजे. यास सर्व भरंवसा आपला आहे. आम्ही तेथें यावे तर आमचे शरीरी समाधान बहुत नाहीं, यास्तव आम्ही आलो नाहीं. तेथें कारकुनाची नेंमणूक बेहब्यास होऊ लागली तर एके असामीस नाव यांचे लावावे. परस्पर ऐकिलें कीं फडणिसी व मजमदारी दुसरे कोणी गृहस्तांनीं करून घेतली, बाकी असाम्या होणार, त्या आपणांस कळतील. ब्राम्हणास अन्नास लाविले पाहिजे. यांस पाठऊन द्यावे ऐसा प्रकार असिला तर पा। देऊ. आम्ही आपणाजवळ शब्द घातला आहे हा आपण सिधीस नेला पाहिजे. बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद.

¶[*Mahadeo Shastri recommends Balajipant Natu to the notice of Haripant Tatya and requests him to find employment for him in the Peshwa's service. The early life of this historical person deserves to be noted.*

---

No. 2] [1794-95

श्री

यादी दिमत माहाराज राजश्री
छत्रपति स्वामी यांजकडील सुा। खमस
तिसैन मया व अलफ. येणेप्रमाणे कलमे

| | |
|---|---|
| माहाराजांचे पुत्र याणी घोडा व हाती पाहिल्यास वर बसावयाकरितां | पागेत घोडी लाहानमोठी तीस पस्तीस आहेत. परंतु चांगले घोडे |

हर्षायमान होऊन मोठा छंद घेतात. मूल लहान थोरा घोड्यावर व मोठ्या हतीवर बसवितां नये. येथे छावा हती व लाहान रहिवाल घोडे मुलाजोगे नाही. यास्तव हती व घोडा वाड्यांत फिरवावयाजोगे

१ हती छावे असतील त्यात लाहान असेल तो सडका व गाशा वगैरे सामानसुधा

१ घोडा रहिवाल लहान सामान सुधां

---

२

कलम १

कारखान्यांत उटे नाहींत. उंट होते परंतु मयत जाहाले. हमेशा सौ उभयतां कन्येच्या स्वाऱ्या सासऱ्यास न्याव्या आणाव्या लागतात, तेव्हा वोझ्याचा पेंच पडतो. दोन च्यार वेला वोझी हतीवरून पोंचवावी लागलीं. त्याणें हती पाठीस लागोन खराब जाहाले. शहरांत कोणापासोन उट मागोन आणावे तरी येथे येकहि मिळावयाचा नाही. याजकरिता नेहेमी कारखान्यांत येणेप्रो असावें

४ उट नफर

१ मादी

३ नर

---

४

१ साडणी

---

५

येकूण कलम १

खासा स्वारीचे उपयोगी नाही. पांच सात घोडी मध्यम प्रतीची आहेत, ती खोडील, स्वामीची रीझ घोड्यावर, फार परंतु रिझेयोग्य घोडे नाही, म्हणौन पेशजी स्वारी सातारेयास आली त्या वेलेस येविशीचें बोलणें जाहालें आहे. तरी घोडी चांगलीं खाशांच्या उपयोगी पाठवावी म्हणौन आज्ञा आहे

२ नर रास

१ चलाख

१ फेरावयाच्या उपयोगी

---

२

३ मादवाना

---

५

तिरंदाजीचे सामान सरकारातून यावे ते येत नाही व येथेहि खरेदी मिलत नाही. तिरंदाजी नेहेमी चालते यास्तव येणेप्रो

१० कमाना

१०० लेसा

१०० तीर

१०० तुके

४ तरकस

---

३१४

कलम

१

निशाण बादली होते तें जाया जाहालें. याजकरितां तासी जामेवारे सरकारातून आलीं त्याचे निशाण केले ते दोन वर्षात फाटले. यास्तव

गर्ची जामेवारे दोन व पटका येक येणेप्रो दसऱ्यास निशाणाकरिता पाठवावे कलम
१

खाशे अंबारीस हत्ती येथे पांच हत्ती आहेत त्यापो उपयोगी नाही, यास्तव बीनझोली हत्ती अंबारीसुद्धा पाठवावा कलम
१

कलमे
६

¶ *A requisition is sent to Poona for animals and articles required at Satara for the use of the King. The list contains camels, horses and some accessories of archery.*

---

*No. 3*] [*21-7-1798*

श्री

**येकोजी राजेसाहेब** **अमरसिंव्ह राजे**

विनंती विनवावया प्रार्थना ऐसीजे. शेवक तंजावर संस्थानी श्रीमंत राजश्री समागंम शेवकांचे प्रपितामाहा आले, तधीपासून त्याचे सेवेत आहो. सांप्रत इंग्रजानी श्रीमंत राजश्री साहेबास येकायेकी अन्यायेकडून संवस्थान आपण आक्रमावें, म्हणोन साहेबास केला अवमान, रहस्येकडून साहेबाचे इशाऱ्याप्रमाणे विनंति ऐसिजे. साहेब तक्तावर बसून बारा वर्षे जाहाली. त्या वेलेस चालले. पूर्वोतर सर्वहि वेदमूर्ति राजश्री भटाचार्य स्वामी आपले सनिधान आहेत त्यास विचारल्यानें श्रुत करितील म्हणोन शेवकानें विस्तार लिहिला नाही. धर्म संस्थान जाहल्याकरितां स्वाम या युगी ब्रम्हकुलामाजी अवतार घेतला आहा. माराष्ट्र देशांत राजश्री भोसले भूपाचे मुख्य प्रधान म्हणोन नाव गाजवीत आहा. त्याकरितां धार्मिष्टभूपांस नीच्यानी अवमान केला तो एकून आपल्याच्याने सोसवेना. त्या गोष्टीचा अभिमान पूर्ण असेल म्हणोन तंजावरी नीच्याकडोन अवमान भोगिले, ते सेवेसी विदित व्हावयाकारणे शेवकानें विनंती लिहिली आहे जे, विजय संवत्छरी अरकाटचे नवाब महंमद अलीखान याणी

शंभर वर्षे चालत होतें, तें राज्य इंग्रजाची फौज कुमक घेऊन तंजावरचा किला घेतला. माहाराजास कै(देत) (ठेवि)ले. तेव्हां पुण्यांत कैलासवासी श्रीमंत दादासाहेब होते, त्यांस हे वर्तमान कलोन, आपण फौजेनसी महंमदअलीखानाचें पारिपत्य करावें म्हणोन तुंगभद्रापावेतो आले. ईश्वरास दया नाहींसं जाल्यामुलें आवंतर होऊन या देशास येणे राहिले. तेव्हा इंग्रजास नीट बुधी येईलसे लेहून संवस्थान माहाराजास देविले. त्या वेलेस कृत्रिम करोन, संवस्थानचें जवाहीर व भांडार व मालमालियेत व हत्येरे व घोडी व हती समस्त जिंदगी वीस कोट रुपयाची लुटली ती साहेबास न देतां, किल्यांत फौजहि आपली ठेऊन, त्यास खर्चास साहिबानी चवदा लाख रुपये प्रतिसंवत्छरी देणे म्हणोन ठरोन, पुन्हा दुर्मुखी नाम संवच्छरी राज्य साहेबाचे स्वाधीन केले. त्यानंतर इंग्रजाचे देशात असणार कुंपणीवाल्यानी पत्र लेहून पाठऊन तीन लाख रुपयांची जाहागीर साहेबाकडोन घेतली. त्यानंतर प्लवंगनाम संवछरी तुलजा राजे कैलासवासी जाहाले. त्यावेलेस त्याणी दोन महिने आगोधर दाईज बुवाजी भोसले याचे संततीतील येक मूल आणोन, दत घ्यावा म्हणोन, त्या मुलास वाड्यांत आणोन. दतहोम करून घ्यावयासी पंडितास बोलाऊन, धर्मशास्त्रविचारणा केली. तेव्हा तो मूल आपले बापास येकच पुत्र विषये जाल्याकरितां, दत घ्यावयास अयोग्य म्हणोन, शास्त्रज्ञानी सांगितल्यावरून ते राहाते करून, सांप्रत या माहाराजसाहेबास तक्तावर बसविले. ते पूर्ववृत्त वेदमूर्ति राजश्री भटाचार्ये स्वामीस ठाऊक आहे; त्यास्तव विस्तार लिा नाही. तें श्रुत करितं घ्यानास येईल. त्यावेलेस इंग्रजानी नवाबाची पेशकसी म्हणोन मागील बाकी म्हणोन फिरंगीयाकडोन कर्ज घेतले आहे. त्या देण्याचे ऐवजीं म्हणोन येकवीस लाख रुपये प्रतिसंवत्छरी जाहागीरखेरीज देणे म्हणोन साहेबाकडोन लेहून घेऊन, बारावर्षे जाली. प्रतिसंवछरी याप्रो ऐवज घेतात आणि मध्यें मध्यें साहेबाचे थोरवीस उणीव जसीजसी यावी तसतसे उपद्रव करितात. असें असोन अर्धे राज्य बलात्कोर करून बांधोन घेतलें. त्या कामास साहेबानी सेवकास व विश्वनाथ यासी उभयतास पाठऊन, लार्ड मार्निगटन म्हणार चेनापटणास येणार आहे; तुम्ही जाऊन त्यास सांगोन, आमचा निमे मुलुक बांधोन घेतला आहे, तो सोडोन घेऊन येणे, म्हणोन पाठविले. बंगाल्यासहि साहेबानी पत्रे लेहून पाठविली. त्यास प्रतिउतर न लिहितां आषाढ शुध्ध पौर्णिमेस इंग्रजाची फौज किल्यांत होती ते आणऊन, साहेबाच्या वाड्यांत चहूकडे चवक्या बसऊन तुम्ही राज्यांस आयोग्य, शर्फोजीस मसनदावर बसवितो म्हणोन सांगोन, आषाढ बहुल द्वितीया स्थिरवारी इंग्रजाचा रसिडंट बिजामीन वोरीन व त्या किल्याचा कर्नल याणी शर्फोजी

म्हणारास मसनदावर बसविले. का म्हणजे त्याजकडोन राज्य सर्वहि तुम्ही कुंपणीत विल्हे लाऊन घ्या, आम्हास खर्चास काही द्या, म्हणोन लेहून घेऊन भोसले याचें धर्मसंस्थान आपण आक्रमिलें. देवालयें ब्रम्हालये दक्षण देशांत बुडालें. ब्राम्हणाचे व देवाचे कोटी दिवे या नीचानी येकायेकी गहाते केले. ते कोणत्या रूपें पुन्हा प्रकाश होतील की ते आपण कराल. या भूमीवर देव ब्राम्हण असावे म्हणोन आपणास अगत्य असेल, येसे जाणोन या अनाथाने विनंती लिा आहे. या कामास कोणत्या प्रकारें यत्न करावा की, तो करून धर्म स्थापाल म्हणोन यजमानसाहेबाची आज्ञा रहश्येकडोन आली. त्याप्रमाणे हे विनंती पत्र लिा आहे. त्याचे पत्र आपले नावें यावयासी नाही. शेवकाचे नाव मोहर निशाणानसी इंग्रजाकडोन काम करून घेऊन या म्हणोन आज्ञापत्र लिा होते ते या विनंतीपत्राबराबर पाठविले आहे. ते पाहातां हा शेवक यजमानसाहेबाचा ऐसे चितास नीट कलेल. यास्तव आज्ञापत्र आले तेहि पाठविले आहे. हे सर्वहि नीट पाहून परलोकाचे ठाई द्रिष्टी देऊन खर्चास पाहिजे म्हणौन गे न करितां या प्रत्नास आरंभ करून चेनापटणपर्यंत येऊन दाखल होय तोपर्यंत बगमी करून दिल्यास पुरे. ईश्वराचे दयेने तथे आलियावर खर्चासहि पुरोन भांडारांतील द्रव्य पोहचे असे करून येईल, असें येथे आहे. याचे प्रतिउत्तर दया करून लेहून वा राजश्री भटाच्यार्ये याजवल दिल्यास पावते होऊन, शेवक सनाथ व यजमान स्वामी संतोप होतील; व ब्राम्हण उभय लोकी तारणार असे नीट समजतील. हे विनंती. जिवाजी देवाजी मुा चेनापटण अधि(क) श्रावण शुध नवमी स्थिरवार काल्युक्ताक्षीनाम सवछरे.

¶Amarsing, Raja of Tanjore, in an eloquent manner appeals to the Peshwa, Bajirao, for help against the English who have despoiled him of his kingdom.

---

*No. 4]* *[26-6-1798*

पौो छ १४ मोहरम सन तिसा तिसैन आषाढ मास.

**श्री**

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यासी आज्ञा केली येसीजे, तुम्ही विनंतीपत्र पाठविलें तें पावलें. माधवराव अनंत याणी लिहिलेअन्वयें बंदोबस्त करून पाठविला. पुढें दर्शनास येईन तेव्हां समजोन बंदोबस्त होईल, असे असतां अविचारवंत काय विनंती करितात? त्याजवरून मर्जीहि तशीच दिसते. वाहटु-[1] लीचें वारें च्यार घटका राहत नाहीं. करवीरकर वगैरे भंरी (?) अंतकरणांत येऊ नयेत. कोणहाचे राजकारण विनंती मान्य न होता पूर्ववत कृपा करावी.

---

१ वावटळीचे.

6985

सेवक मर्जीशिवाय नाहीं म्हणून लिहिले तें कळलें. यैसियास तुमचे परंपरेने निष्ठेने सेवा घडत आली. आलीकडे कारभारी ठेविले त्याचे योगेकरून सीमेपरते नष्टचर्य भोगिले, ते क्लेश दूर व्हावे, येविसी तुमचाहिं दृढ निश्चय असतां कोण्ही काय विकल्प भासविले तेच मनांत भरून हली कारभारी आले त्यांच्याहि चाली एक प्रकार पडत गेल्या. सांप्रत तरी तुमचे वंशांत कधींच अमर्यादा जाली नाहीं. आशा गोष्टी रास्ते याणी काय समजोन, आपण तयार होऊन सर्व चीजवस्त आटोपून बाहेर निघाले, आणि बंदिवानहि घेऊन चालले. तेथें मनाई करविली. तेव्हां तेथें कटकट वाढली. कवायती गारदी याणी गोळी चालविली. माणसें बायकामुलें जाया जाली, तेव्हा इकडील लोकानी मारामार केली आणि काढून दिल्हे. त्याजवर माधवराव याणी शहरावर तोफा लाऊन, राजवाड्यावर गोले चालविले. दोन प्रहरापासून सायंकालपर्यंत तोफा चालल्या. ते समई इकडूनहि त्याजकडून जाल्यावर तोफा चालू जाल्या. सर्व राज्यभागाचे वोझे घेणार तुम्हासारखा दुसरा सेवक कोण आहे, यैसाच अंतःकरणांत निश्चय धरून सर्व भार तुम्हावर ठेऊन स्वामीचा मनोदय स्वामीस क्लेश होतात ते न व्हावे. हें तुम्हास सेवाधर्मास योग्य ते तुम्ही रास्तेयास लेहून बंदोबस्त करविला लिहिला, त्यातील याजकडून काही येक न घडले. असमंतात काही येक स्वाधीनता असल्यास काय घडेल हा संपय जातच नाही; आणि येथील बंदोबस्त फौजा वगैरे पाठऊन करावा हेच सर्वोपरी यैसे दृढ जाले आहे. भेट व्हावी त्यांत दुतर्फा मनोदय समजोन घेऊन पाहिजे तर्सी खातरजमा करून घ्यावी; तोपर्यंत स्वामीचा मनोदय तितका रक्षावा ते घडत नाही. हे तुमचे चालण्याचे निश्चयास बहुत आश्चीर्य भासते. येविसीचे पर्याय पत्री काय म्हणून ल्याहावे! भेटीचा योग तरी कालेकरून घडवाल, तेव्हा घडणार; तोपर्यंत पूर्ववत नष्टचर्य भोगावे. हें तुमचे अतःकरणांत यावे; परंतु समजाविणार समजावितात, तदनुरूप घडते, ते न घडावे; आणि जे गोष्ट तुम्हास श्रेयस्कर तेच घडावी. येथील बंदोबस्त स्वामीचे मनोदयानरूप घडावा हे उत्तम. हलीहि माधवराव किल्याखालील जवलील गाव लुटणे जालणे वगैरे करीत आहेत. बुधवार पेठेस आगी दिल्ही, लुटली, हे तुम्हास समजावे. जाणिजे. छ ११ मोहरम. तुमचे ठाई इकडून दुसरा अर्थ नाही. तुमचेहि निष्टेत अंतर पडू नये. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

¶*This is a protest made by Shahu II to Bajirao against the atrocities committed by Rastia at Satara. The paper discloses the abject condition of the Raja.*

No. 5] [3-8-1798

श्री

शेवेसी मोरो बापूजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २० सफरपर्यंत येथास्थित असे विशेष. स्वामींनीं छ ११ सफरचे आज्ञापत्र पाठविलें ते पावलें. पत्रीं आज्ञा रा। नाना वानवडीस आले. केवल मोकले नाहीत, परंतु मोकले होतील. आज सकाळीं सखाराम घाटगे व फकीरजी गाढवे वगैरे कैद जाले. तुम्हांस कलावें. पेसजी तुम्हांस येण्याविसीं लिहिलेच आहे. याप्रो। सोय करून लौकर यावें म्हणौन आज्ञा. त्यास आज्ञेप्रो। निघालों. शेवकाकडील वर्तमान चिरंजीव पांडोबा विनंती करितील. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Moro Bapuji reports that Sakharam Ghatge and Fakirji Gadhve have been imprisoned and adds that Nana Fadanis will be soon released from confinement.*

---

No. 6] [11-8-1798

श्री.

सेवेसी विज्ञापना. ता। छ २८ सफर रोज मंदवार प्रातःकाळपर्यंत वर्तमान शहरात फौजा सिरल्या. रयत लोकांची लूट जाहली. त्यात पूर्वेकडे कांहीं एक पेठेत घरें वांचलीं. पंचमेस मंगळवारात डोंगराकडील लगत घरें कांहीं वाचलीं. गुरुवारी साऱ्या फौजेस ताकीद होऊन, प्रातःकाळापासून लूट बंद केली. शहराभोवत्या चौकिया बसविल्या. किल्याच्या यायजास नाकेबंदी चौकिया बसविल्या. वरील माणूस खालीं येऊं नये, व खालीकडील माणूस वर्ते जाऊं नये या प्रो। ताकीद जाहली आहे. राजश्री माहाराजाकडील कारभारी छत्रसिंग माहाराजाचे धाकटे बंधु, व भवानजी शिर्के व कुसाजी माहाडीक, व नरसिंगराव गुजर व लिंगोजी कासकर सर्व माहाराजांचे आप्त राजपागा घेऊन किल्यातून मोड जाहाला, ते समई घेऊन गेले. त्यास बरोबर च्यारशे पाचशे जमाव आहे, याप्रमाणे बोलवा आहे. यास्तव राजश्री परशरामभाऊ याजकडील हरिपंत धायगुडे त्याच्या पिछावर लोक सुधां लागले आहेत. येविसीचा मार काय होईल तो त्याचा शोध पकेपणे घेऊन, सेवेसी विनंती लिहीन. माहाराजाकडील हस्ती कालचे व आजचे मिळोन दाहा पाडाव जाले. त्याचा खर्चाचा बंदोबस्त रास्ते याजकडून चालला आहे. राजश्री माहाराजाकडील बोलणें सोयचे

6987

अद्यापि नाहीं. राजश्री रास्ते व भाऊ व विंचूरकर यांचा मुकाम आहे तेथेंच आहे. करवीरकर यांजकडील बातमीस जोडी गेली आहे, ती अद्यापि आली नाहीं. आल्यावर सेवेसी विनंती लिहीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter reports that Parashuram Bhau Patwardhan attacked Satara and routed the Raja's forces.*

---

*No. 7*] [*14-8-1798*

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**
**नागेपंत नाना स्वामीचे सेवेसी**

पोष्य नरसिंह खंडेराव साष्टांग नमस्कार विनंती उपरि. येथील कुशल तागायत छ १ रबिलोवलपावेतों यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. श्रीमंतानी सातारियास जावयाची आज्ञा समक्ष केली, मसलत दुसरीकडे निसबतीस आम्ही चाकरी केली नाहीं असें असोन, श्रीमंतानी आज्ञा केली. त्यास नाहीं म्हटल्यास मर्जी राहणार नाहीं असें समजोन, कांहीं येक अडचणी न दाखवितां गोव्यास आलों. तेथून कूच करून सातान्यानजीक आलों. आश्विक वद्य ८ शनवारीं लढाई जाली; व गुरुवारीं द्वादसीस राज्याचे फौजेवरी चालून वेऊन, शहरांत आपल्या फौजा दाखल जाल्या. राज्याची फौज पळाली. किल्याभोंवत्या चौक्या वसविले. लौकरच वंदोवस्त होईल. येवि-सींचे तपसीलवार वर्तमान राजश्री माधवराव रास्ते यानी सरकारांत लिहिलें, त्याजवरून कळेल व राजश्री निंबाजी विठल व रामाजी राजेश्वर सविस्तर सांगतील, त्याजवरून कळेल. इकडील मसलत श्रीमंताचे प्रतापें आटोपली. राजश्री पर्शरामपंत भाऊ करवीरकरावरी जातील. राजश्री माधवराव रास्ते सातारियास राहून बंदोबस्त करतील. आम्ही रिकामे येथें कालहरण करावें ठीक नाहीं; याजकरितां आपण श्रीमंताचे कानावरी घालून आम्हांस हुजूर येण्या-विसी सरकारचें पत्र पाठवावें, येविसीं अनमान करूं नये. माहाल सरंजामास आहे, तेथील अवस्ता सिंदे होळकर यानी काय केली, आम्हांस पैका येतो किंवा नाहीं, याचा शोध करावा. सर्व भिस्त माहालावरी, माहालचा पैसा येईना कर्ज कोठें मिळेना, तेव्हां फौज कोणते भिस्तीवरी बाळगावी, चरितार्थ कसा चालेल ही चिंता रात्रंदिवस आहे. याचा निर्वाह दुसरियाच्यानें होत नाहीं. श्रीमंतापासी विनंती करावी, आणि श्रीमंताचे मनांत द्रव येऊन बंदोबस्त केल्याखेरीज परिणाम नाहीं. परंतु आपण अनकूल असल्यास कोणती गोष्ट घडत नाही? येविसी राजश्री

बलवंतराव कुगांवकर यांनी आपल्यास आम्हांविसी सविस्तर सांगितले आहे. आम्ही इकडे आल्यामुळें तसेंच राहिले. त्यास श्रीमंतास विनंती करून, आम्हांस हुजूर बोलाऊन घ्यावें; आणि अंगेजनी करून, हरयेकविसीं बंदोबस्त करून घ्यावा. आम्हीं आपल्याखेरीज नाहीं. आपले भेटीनंतर ज्यांत आपली मर्जी राहील तोच अर्थ घडेल. परंतु आपण आमचा प्रतिपक्ष करून, हरयेकविसीं बंदोबस्तास अनमान करू नये. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति.

¶*The writer Narsinha Khanderao Vinchurkar communicates to Naropant Nana that the Raja's army was defeated and guards had been placed at the gates of the Fort. The addressee Naropant may be Chakradev*

---

*No. 8*] [*15-8-1798*

श्री

सेवेसी कृष्णराव नारायण कृा सा नाा विा ताा छ २ सौ बलपावेंतो स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. बहुत दिवस आज्ञापत्र येऊन सांभाल होत नाहीं, येणेकरून चित्त सापेक्षित आहे, याजकरिता विनंति लिा आहे तरी सदैव कृपापत्री सांभाल होत असला पाहिजे. यानंतर पेशजी राा माधवरावजी रास्ते येथून निघोन निंबगांवे येथे मुकामास गेले, त्या समई आम्हीहि समागमे जावें, परंतु त्यांचे निकडीने जाण्यामुले योग न घडला. मागाहून जावें तरी येथे याच्या पेचांत सांपडल्यामुलें उपाय न चाले. त्यांत त्यांची ताकीद व शहराभोंवत्या नाकेबंद्या याजकरितां उगेच होतो. ऐसे असताहि त्यानी परामृष करावयाचा तो केलाच. पदरचे च्यार रुपये भरीस घालून जीव वाचवून होतों. इतकियात स्वामीचे पुण्यप्रतापेकरून माधवरावजी यांचे आगमन फौजेसह जाहाले. ही गोष्ट मोठीच जाहाली. फौजेचे काम अनिवार याजमुलें शहर लुटलें गेलें. त्यांत आमची पागा व गोट व मागील चौक व तीर्थस्वरूप राा विश्वनाथराव काका यांचा वाडा व पांच साहा कारकुनाची घरं वगैरे दरोबस्त लुटली गेली. ते समईच रावजीजवल लस्करात येऊन पोहचलो. स्वामीचे कृपाकटाक्षे राहात्या वाड्याचे दोन चौक वाचले, तेणेकरून आबरू वाचली. येविसीचे वगैरे सांप्रतचे जाहालेले वर्तमान रावजीचे लिहिल्यावरून विदित जाहालेच असेल. पुढे सांभाल करणार व कृपाकरून चालविणार स्वामी वितिरिक्त दुसरा कोणीहि नाही, हे खचित ध्यानात असिले पाहिजे. येतद्विपईंच वृत रावजीचे लिहिल्यावरून निवेदन होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This letter from Krishnarao Narayan Joshi probably to the Peshwa describes the siege of Satara by Raste and the losses suffered by the writer.*

No. 9] [18-8-1798

श्री

सेवेसी विज्ञापना ता। छ ९ रबिलोवल रोज मंदवार रा। प्रात:कालपर्येंत वर्तमान तर छ ४ रोज भृगुवार राजश्री रास्ते यांजकडे येसाजीपंत आगट्ये व बापू शेमेकर श्रीमंत मातुश्री आईसाहेब व माहाराज याजकडून बोलणे बोलावयासी आले. त्यांचे बोलणे कीं, तूर्त किला आमचे स्वाधीन असावा. कारण आमचे पदरी च्यार ग्रहस्त आहेत, त्यांची आमच्यामुळे खराबी जाहाली. यास्तव त्याजकडे तुम्हां वाईट नदरेने पाहू नये. तुम्ही शाहारांत राहून काम कारभार करावा. याजप्रा। माहाराज यांचे बोलणे आहे म्हणून रास्ते याजपासी बोलले. नंतर यांही बोलणे केले कीं, किल्यावर दोन तीनसे लोक व कारकून घेऊन असावे आणि पैल्याप्रा। शेवाचाकरी घ्यावी. पूर्वीचा बंदोबस्ताप्रा। असावे. याप्रमाणे माहाराजास मान्य गोष्टी नाहींत. त्यांच्या बोलण्यास रास्ते मान्य करीत नाहीं. याप्रमाणे छ २९ सफरपासून सल्याचे बोलणे लागलें त्यास आज नऊ रोज होत आले. आद्यापि निर्गम दिसण्यांत येत नाहीं. माहाराजानी किल्याच्या तटांच्या गल्या-खालीं चौकियां बसऊन बंदोबस्ताने आहेत आणि हिकडे सल्याचे बोलणे लाविले. त्याची गत या प्रकारची आहे. आज ऐकिण्यांत आणखीं आले कीं, श्रीमंत मातुश्री आईसाहेब व माहाराज यांजकडील बोलणे कीं, तूर्त आमचे स्वाधीन आसावा आणि किल्यावर लोक आहेत त्यांचा जामीन येक कोणी ग्रहस्त तुमच्या खातरजमेचा देतो. त्यास रास्ते यांचे म्हणे कीं, ऐसे म्हणतां तरी किल्यावर जितके लोक आहेत तितकीयानी प्रथक प्रथक जामीन द्यावे आणि दोन तीनसे लोक कारकून ऐसा किल्यावर ठ्यावा म्हणजे सलाच आहे. आम्हींहि सेवाचाकरी पैल्या पुरवतप्रमाणे करू. माहाराजानी पूर्वीत प्रा। असावे. त्यासहि निग्रह माहाराजांचा फार आहे. परंतु आज आगट्ये व बापू सेमेकर आले होते त्याणी रास्ते यांजकडील लक्ष्मण धोंडदेव फडणीस यास माहाराजाकडे नेले होते. च्यार घटका रात्री आवसीची डेऱ्यास आले, तो आज सुक्रुवारची रात्र म्हणून कांहीं बोलणे माहाराजाचे रास्ते यास सांगितले नाही. याचा शोध मनास आणून विनंती लिहीन. राजश्री रामराजे माहाराज याची बहीण अहल्याबाई सिंदी आली होती. रास्ते याचे व बाईचे दोन घटका खलबत जाहले. भोजन होऊन चोली, लुगडे देऊन निरोप घेऊन आपले घरास गेली. कोणत्या गोष्टीविसी आली होती याचा शोध घेऊन विनती लिहीन. करवीरकर माहाराज याचा मुकाम बतीसिराले याजकडे गेलाची बातमी आहे, परंतु किला मलकाअर्जुन डोंगरावर येथे किला बांधावयासी मोहूर्त केला म्हणून ऐकिण्यात आले आहे.

6990

राजश्री माहाराज याजकडील आप्त आहेत, त्यांजकडे गाव असतील ते जप्त रास्ते याणी केले आहेत व माहाराज याजकडे चाकरीस गावगंना लोक असतील त्यास गावगंना पाटील कुलकर्णी यास रोखे करून आणून चौकसी करीतच आहेत. कही त्रिवर्गाची जात असते. सरपणचे रोखे होत असतात. लढाई जाहाली त्याचे दुसरे दिवसी पत्र तपसीलवार पो कीं, येलोजी मोहिते हे तरवारीने ठार जाहाले, पैली लढाई व त्याचा लेक धाकटा माहाराजाचा जावई यास जखमी तरवारीची येक दोन लागल्यानंतर त्याणी लढाई कोणी सरदार उभे पुढे राहून घेतली नाहीं. शाहाराभोवता वेढा घालून दाबाने होते. मोड जाहाला तेव्हा दोन तीनसे घोडे पाडाव केले ते भाऊकडे फार आले. विंचूरकर व रास्ते याकडे थोडे बहुत आले असेल. याप्रो अदमास दिसतो आहे. शाहारची लूट भाऊकडील लोकाकडे गेली. या दो ग्रहस्ताकडे थोडी बहुत लोकांकडे आलीच आहे. माहाराजाचे पायदळ जखमी फार दोन तीनसे जाहाले-याचा अदमास आहे. याजकडील भाऊकडील सितोले तरवारीने ठार जाहाले व विठलराव बाबा यास डोल्यावर बरचीची जखम लागली. याजखेरीज कोणी नामांकित ग्रहस्त त्यांजकडील व याजकडील पडला नाहीं. पडला असता तरी विनती लिहिली असती. तत्रापि आमच्या (अपूर्ण)

¶*This incomplete letter describes the battle of Satara and the negotiations started by Agte and Shemeker with Rastia on behalf of the Raja. The interview between Rastia and Ahilyabai Sindia, the sister of Ramraja, the movements of the Raja of Kolhapur and the casualties that occurred in the fighting are some of the topics mentioned in this letter.*

---

*No. 10*] [*22-8-1798*

श्री

सेवेसी विज्ञापना. तागायत छ ९ रबिलौवल रोज सौम्यवार प्रात:कालपर्यंत वर्तमान तर राजश्री रास्ते याजकडे येसाजीपंत आगशे इंदुवारी चारघटिका रात्रीस येऊन बोलले कीं तीनसे लोक व कारकून घेऊन त्यांचे हातीन सारा कारभार घ्यावा म्हणोन सांगितले. त्यावरोन श्रीमंत मातुश्री आईसाहेब भोमवारी प्रात:काली किल्ल्यावरून खाली येऊन, रास्ते याणी पुढें जाऊन सनमान करून आणून वकील याणी करार केल्याप्रमाणें लोक व कारकून किल्यावर घेऊ, बाकीचे किल्ल्यावर लोक वगैरे राहिले त्यांचा खातरजमा करावयासी येणार होती ती सोवली जाहाली म्हणून चिठी आली. मंदवारी प्रात:काली येणार म्हणोन चिठीत लिहिले आहे. दिवसगतीवर घातले आहे. खाली आल्यावर होईल

ते वर्तमान लिहीन. राजश्री परशरामभाऊ यांचे चिरंजीव अपा मिरजेहून आले, ते काल इंदुवारी पौवाई येथें मुक्काम केला. त्यांच्या भेटीस राजश्री माधवराव रास्ते व विंचूरकर भौमवारी प्रातःकाली गेले. तो भाऊचे चिरंजीव बाबा व दार्जाबा व बापू त्रिवर्गांची स्वारी आली, तेव्हां तिघांच्या भेटी होऊन नंतर रास्ते यांच्या भेटीकरितां गोलीच्या टपेपर्यंत चालोन आले. तेथें भेटी जाहाली; नंतर विंचूरकर यांची भेट घेऊन नंतर मानकरी याजकडील व त्याजकडील यांच्या जाहालिया उपरांतिक रास्ते श्रीबहिरोबाचे दर्शन घेऊन डेऱ्यास आले. विंचूरकर याणीं लष्करपर्यंत पोचऊन, आपल्या डेऱ्यास आले. आणखी फिरोन भेटावयासीं आपा व बाबा व बापू त्रिवर्ग रास्ते यांचे डेऱ्यास प्रहर दिवस सायंकालचा आमलांत आले. घटकाभर कचेरीस बसोन, साखर-पाणी मानकरीमुद्धा घेऊन तांबूल भक्षूण अर्ध घटिका बसोन माघारे डेऱ्यास गेले. त्याजबरोबर एक हजार फौज आहे. नंतर रास्ते याणी से दीडशे गाडदी नवे चांगले पाहून ठविले. करवीरकर महाराज यांचा मुक्काम बतिसिगल्यास होता, तो करविरास गेले म्हणून बातमी रास्ते यांच्या डाकेची आहे. रत्नाकरपंत करवीरकर महाराज याजकडील व धोंडोपंत गोखले यांची व त्यांची लढाई सावणूर येथें जाहाली. धोंडोपंत गोखले यास तरवारीच्या जखमा दोन तीन लागल्या, आणि कचकरले म्हणून बातमी रास्ते यांजकडे आहे. बापू सेनकर आले होते. दोन घटिका बोलणे होऊन, निघोन सातारियास गेले. शेवेशीं श्रुत होय हे विज्ञापि.

¶*This is a news-letter which states that the three sons of Parashuram Bhau Patwardhan with an army of one thousand men reached Satara and that the Maharaja of Kolhapur returned to his capital. The writer appears to be Krishnaji Narayan.*

---

*No. 11*] [*24-8-1798*

**श्री**

सेवेसी विज्ञापना ता॥ छ ११ माहे रबिलोवल रोज भृगुवार प्रातःकाल एक घटका दिवसपर्यंत वर्तमान तर राजश्री माधवराव रास्ते याजकडे श्रीमंत मातुश्री आईसाहेब मंदवारी प्रातःकाळीं किल्यावरोन खाली येणार आहेत. आल्यावर त्यांच्या व यांच्या अनुमते विचारे ठरऊन लोक व कारकून घेणार ऐसा बेत ऐकितों आहे. आल्यावर वर्तमान काय होईल ते लिहीन. काल छ १० रोजी गुरुवारी राजश्री येसाजीपंत आगव्ये प्रथम दोन घटका रात्रीस येऊन फराल करून, दोन घटका खलबत करून फिरोन महाराजाकडे गेले. बोलण्याचा

इत्यार्थ कांही समजला नाहीं. शोध घेऊन विनंती लिहीन. राजश्री परशराम भाऊ याणी हरसिंग कोकणचा यांचे लोक पायदळ ३२ व गाडदी २०० याप्रमाणें नवे हजेरी घेतली आहे. राजश्री हरिबा धायगुडे यांच्या रावटीस भाऊ यांचे चिरंजीव आपा गेले होते. दोन घटका एकांत होऊन आपल्या डेऱ्यास आले. राजश्री माधवराव रास्ते यांणीं पायदळ पनास यांची नवं हजेरी घेतली आहे. बापूभट ठकार आले होते. रास्ते व त्याचे एकांत होऊन फिरोन माघारे गेले. भाऊकडील कारभारी रास्ते याजकडे येतात जातात, व रास्ते याजकडील कारभारी येतात जात आहेत. राजश्री महाराज यांणीं रास्ते यांस पेशजी धुडाऊन शहरा बाहीर घालविले, ते समई सिकेकटार व देवपूजा वगैरे चीजवस्त जितकी गेली होती तितकी महाराजांनी पाठऊन दिल्ही, म्हणून ऐकिण्यांत आले आहे. आणखी ऐकिण्यांत आले आहे कीं गंड्याच्या मालावरून कूच करून पावाईपलीकडे भाऊ यांचा मुकाम जाणार आहे. रास्ते विंचूरकर यांचा मुकाम गंड्याच्या मालावर राहातो, किंवा आणखी कोणीकडे होतो हे समजल्यानंतर विनंती लिहीन. हली भाऊ व रास्ते विंचूरकर यांचा मुकाम जेथे आहे तेथेच आहे. कागद कोरे ल्याहावयासी नाही व पोटास कांही नाही. दररोज पाऊण रुपये खर्चास लागत आहे. कृपाळु होऊन द्यावयाची आज्ञा असावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This news-letter refers to the negotiations going on between the Maharaja of Satara and Rastia.*

---

*No. 12*] [*August 1798 ?*

श्री

सेवेसीं विज्ञापना. ऐकण्यांत नामांकित प्रहस्त पडला ऐसे. नाहीं. पायदळ व स्वार, रास्ते व भाऊ व विंचूरकर या त्रिवर्गाचे पाचशेपर्यंत अदमास होईल. याखेरीज रास्ते याजकडील प्रहस्त पिसाळ ओझर्डेकर येवरपारेकर व लाड लस्कर त्रिवर्ग तरवारीच्या जखम्या दोन तीन या प्रो लागल्या; व आनंदराव सिलेदार कारकून यास गोळी बंदुखीची लागोन ठार जाहले, या प्रो बोलवा आहे, म्हणून पेशजी पत्र लिहिले होते; व हालीं विनंती लिहिली आहे. रास्ते याची उठावणी यवतेश्वरचे अंगाकडून, करंजेच्या अंगाकडून परशरामभाऊ, व दोघांच्या मधी विंचूरकर त्रिवर्गांनीं एकदांच उठावणी करून, फौजेवर चालोन घेऊन, तोफा वरचेवरी पुढें नेऊन चांगली मारगेरी कासी रघुनाथ यांहीं केली;

6993

आणि बेलाशख चालोन पडले. त्या वेळेस अर्ध घटका लडाई चांगली होऊन, इकडील तीन पथकांतील पाच सहाशें जखमी जाहले. त्यांजकडीलहि जखमी जाहले. हिकडील भरणा भारी, यामुळें त्यांचा मोड जाहला. हजार स्वारानिसी सिर्के व कुसाजी महाडिक व छत्रसिंग महाराजांचे धाकटे बंधु वगैरे त्याजकडील पळोन, पाटणखोरे याच्या सुमारें कोयना उतरोन, करवीरकर महाराज याजकडे जावयासी निघोन गेले. हजारस्वारांपैकीं झाडून लोक पुटोन आपल्या साईनें निघोन गेले. खाशे मंडळी दोनशें स्वारांनिशीं कोयनापार जाहले. त्यांच्या पाठीवर राजश्री परशराम भाऊ यांचे चिरंजीव चार हजार फौजानिशीं गेले, तेहि कृष्णा कोयनाचे आलीकडेच आहेत. लढाईचे दिवशीं शाहर लुटले गेले. लोकांची खराबी बहुत जाहली. हें वर्तमान पेशजी सविस्तर लिहिलें आहे. याउपरहि वरचेवरी लिहीत जाईन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापित.

¶ *The letter gives a detailed account of the attack on Satara by Raste etc. The Raja's army was defeated and a part of it crossed the Koyna river with a view to take shelter within the Kolhapur territory.*

---

*No. 13*] [*August 1798*

## श्रीशंकर प्रसन्न

पुरवणी सेवेसी विज्ञापना ऐसी जे. छ ४ मावलचे आज्ञापत्र पाठविलें ते पावलें. सातारा शहर प्राचीन लुटलें. लोकांची मालमालियेत फार लुटीस गेली त्याचा बंदोबस्त तुम्हीं केल्याच असेल. खजिना नगारा निशाण हाती लुटीस आल्यास सरकारचेंहि चाल तुम्हांस ठाउकीच आहे. चौकशी करून ठिकाण लाऊन सरकार काम येथास्थित करणें म्हणून आज्ञा. ऐसियास सातारा शहराची अमदानी स्वामीच्या ध्यानातच आहे. त्यांत विरुध वाढल्यापासून लोक सावधच होते. त्या आलीकडे शहर लुटलें जाईल या आंदेशाने साहा रोज गोलागोली होऊन दोहींकडील फौजा उभ्या होत्या, त्या आवकाशांत इकडून सूचनाहि केली होती. लोकानी आछादन करावयाचे ते केलेच होतें. प्रहर दाहा घटका लुट जाहाली. भांड कुंडे, कापड, गुरें, घोडी कार्याकारण नग-नगोटें लुटीस गेलें. शहरासमीप मुकाम केला. नंतर दोन च्यार कोसी चौक्या बसऊन गोटात वगैरे जे उमगले ते ज्याचे त्यास देविलें. खजिन्याचा विषय कांहीच नाहीं. हाती सरकारचे सार येके जागां करून राजवाड्याजवळच ठेविले आहेत. स्वामिशेवा घडेल तितकी करीत आहें. सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञापना.

¶ *The letter describes the sack of the capital, Satara, and says the people did not suffer much owing to measures taken to restore order in the city.*

*No. 14]* *[26-12-1798*

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य
राजश्री विश्वासराव नारायण गो॥

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार मु॥ तिसा तिसैन मया व अल्फ. किले सातारा येथे पेशजीचे कदीम लोक चाकरीस होते त्यांणी व नवे लोक ठेविले त्याणी मिळोन बखेडा केला. सबब त्यांची घरे व सेतं व इनामगाव व जमिनी व सरंजाम व वतनें किले मंदन येथील सरंजामाचे गावगना आहेत त्याची जफ्ती सरकारांत करून जफ्तीचे काम रा॥ बाजी गणेश याजकडे सांगोन पाठविले असेत. तरी ज्याजकडे इनाम गाव व जमिनी व सरंजाम चालत असतील त्याचा मजकूर हुजूर समजोन आज्ञा करणे ते केली जाईल. तोपावेतो सदरहू प्रो॥ जफ्ती करून उत्पन्न होईल ते खंड गुन्हेगारीचा ऐवज ठराऊन वसूल घेऊन डौल मातारा येथील खर्चास देत जातील. तुम्ही दिकत न करणे. याजकडे कामकाजास ष्यादे कारकून लागतील ते किले मजकुरपैकी देत जाणे. जाणिजे छ १७ रजब आज्ञा प्रमाण.

बार

*Peshwa Bajirao Raghunath orders the attachment of the houses and property of the employees at the fort of Satara for having rebelled against the Peshwa's Government.*

---

*No. 15]* *[4-6-1799*

श्री

सेवेसीं हरि सदाशिव दामले चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत जेष्ट शु १ मंगळवार दोन प्रहरपर्यंत मुकाम मुंबई येथें स्वामीचे कृपाअवलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. इंग्रजाकडील बातमीचा मजकूर आज दोन प्रहरीं अकस्मात शेंदोनशें तोफाचे आवाज केले. भोज्यनाची वेल, तेव्हां कोटांत सिपाई चौहूंकडे पाठऊन बातमी आणिली, तों विलाइतचा पाछाय याचा जन्मकालचा दिवस, यामुळें जनरालचे वाड्यांत सर्वांस खाणे करून तोफा मारिल्या. मोठा आनंदाचा दिवस केला. बारीक वर्तमान आंतून काय असेल तें मागाहून सविस्तर लिहितों. पेशजीं टिपूची बातमी लिहिली आहे, त्यास टिपूचें वर्तमान येतांच कागदोपत्रीं छापोन,

6995

सर्वांस कलविली. त्याची नकल इंग्रेजी करून युक्तीनें घेऊन पाठविली आहे. त्यावरून सर्व ध्यानांत येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Sadashiv Damle writes news from Bombay about the rejoicings of the Company's servants on account of the birthday of their King and the fall of Tipu.*

---

*No. 16*] [*16-6-1799*

**श्री**

सेवेसी विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ ११ मोहरम भानुवासर संध्याकाल च्यार घटिका रात्रपरियंत यथास्थित असे विशेष. राजश्री बालाजी जनार्दन याजकडे प्राथःकालीं नारोपंत चक्रदेव व चिमणाजी खंडेराव व बज्याबा सिरालेकर व यांचें च्यार घटिका बोलणें होऊन श्नानास उठले. नंतर नारायणराव वैद्य यांचें दोन घटिका देवघरांत बोलणें जालें. आज आंबरस केला होता. सवासें ब्राह्मण भोजनास बोलाविले. त्यास येक रुपया दर आसामीस दक्षणा दिल्ही. भोजनोत्तर निजावयास गेले. निजोन उठल्यावर बालाजी कुंजर यांचें अर्ध घटिका बोलणें होऊन गेल्यावर चिमणाजी खंडेराव व नारोपंत व लक्ष्मणपंत चक्रदेव, बज्याबा सिरालेकर यांचे दोन घटिका बोलनें जालें. नंतर फकरुदीन यांचें दोन घटिका बोलनें होऊन गेल्यावर वेंकटराव पिंगले व सदाशिव माणकेश्वर व आत्या गुरुजी व शेषाद्रिपंत व सदाशिव भट दात्ये व बामनाजी हरि व दादो हरि मराटे व अन्याबा जुनरकर व लाला फत्तेचंद याचे दोन घटिका बोलणें होऊन, मग खंडोपंत वर्तक व रावजी आपाजी व माधवराव व जावजी पाटील यांचें संध्याकालपर्यंत खलबत जालें. नारोपंत व लक्ष्मणपंत चक्रदेव व बज्याबा चिमणाजी खंडेराव अद्याप बसले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer states how Nana Fadnis spent the day and what interviews he gave. This gives an idea how disconsolate Nana was a few months before his death. Fakruddin mentioned in the letter was the son of Sayad Nuruddin Hussein Khan, who was Munshi to Sir C. W. Malet.*

---

*No. 17*] [*11-7-1799*

पौ छ ७ सफर

**श्री**

सेवेसी विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ ७ सफर गुरुवासर संध्याकाल दोन घटका रात्रपरियेंत यथास्थित असे विशेष. राजश्री बालाजी जनार्दन याजकडे प्राथःकालीं दोन घटिका दिवस आल्यावर खंडोपंत वर्तक व व्यंकटराव गोविंद व सदासिव माणकेश्वर या त्रिवर्गाचे तीन घटिका बोलणें जालें. नंतर

श्नान होऊन भोज्यनोत्तर निजोन उठल्यावर, बज्याबा सिरोलकर व शंकर जोर्सी व खंडोपंत वर्तक याचें दोन घटिका बोलणें जालें. मग रंगराव त्रिंबक व व्यंकटराव रास्ते याचे घटिका येक बोलणें जालें. नंतर नारायेणराव वैद्य व अजमतदौला याचें अर्ध घटिका बोलणें जालें. नंतर स्वारी करून काल्या हवदाजवल बागांत गेले. तथून बेलबागांत आल्यावर श्री विष्णूचें दर्शण करून, सांयेकाली घरास आले. गोपालराव मुनर्सी व आण्याबा जुनरकर व बाळाजीपंत सहस्त्रबुधे व गणपतराव माधव इतकियांचे नमस्कार जाले. बज्याबा तिसरा प्रहरापासोन वाड्यांत आल्यावर, स्वारीबरोबर जाऊन अल्यावर, फिरोन संध्याकालापासोन आद्याप बसले आहेत. छबिना नित्याप्रमाणें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer gives the names of the persons who interviewed Nana Fadnis during the day. Nana was keeping mounted guards about him to prevent mischief.*

---

*No. 18*] [*15-7-1799*

पौ छ ११ सफर मयातैन.

**श्री**

विज्ञापना तागायत इंदुवार साईकाल अस्तमान वर्तमान कुशल असे विशेष. राजश्री कासीराव होलकर यांची स्वारी पुण्यात त्याचा वाडा आहे तेथें आजी दोन प्रहरा आली. नंतर रो चिमणाजी खंडेराव याजला बलाऊन नेले. चिमणाजीपंत व कासीराव व पाराजीपंत व नथू काले चौघांचे चार घटिका खलबत जाहाले. उपरांत खंडोपंत आले. नंतर अर्ध घटिकेनें चिमणाजीपंत निघोन गेले. उपरांत कारभारी होलकर यांचे येथें आहेत हे वगैरे झाडून कारभारी खलबतास येऊन बैसले. सहा घटिकापावेतों बोलणें जाहाले. शेवट आजीचा बेत सरकार-वाड्यांत यावयाचा राहिला. कारण ऐकण्यात दाजीबा व श्रीपतराव यांचे येण्यास सरकारांत अनमान पडतोसें वाटतें. कासीराव यांची स्वारी निघोन माघारी लष्करांत अस्तमानी गेली. आतां यावयाचा बेत प्रतिपदेवरी गेला म्हणून लोक बोलत होते. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*It is reported in this paper that Kashirao Holkar came to his residence in Poona to hold a consultation in order to decide certain important issues.*

---

*No. 19*] [*10-12-1799*

**श्री**

अपत्यें हरिनें चरणावरीं मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत मार्गशीर्ष शुा १३ पर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. पेशजी पत्रें पाठविलीं

तीं पावलींच असतील. मेस्त्र पालमर येणार म्हणून वंदता होती. परंतु त्याचे एवजीं तीन इंग्रज मोठे माणूस आले. मेस्त्र मुकीलसाहेब याचे घरीं त्याचें जाणें फार. कांहीं मसलतींत आहेत ऐसें दिसतें. इतके दिवस मुकिलास येथें कोणी पुसत नवता. हालीं त्याकडे इंग्रेज लोक जाऊं लागले, तेव्हां त्यास हिकडे संमत होऊन भडोजेवर मसलत करणार, म्हणोन बाजारी वर्तमान दाट आहे. टोपीकराचा विश्वास येत नाहीं. टिपूची मसलत जिंकोन आले, त्यामुळे त्यांस अहंकार बहुत जाला आहे. पागडीवाले यासी मोजीत नाहीं, ध्यानात असावें. यानंतर कंपूचे लोकानी आपणांस अडविलें यास्तव पळून कोकणांत आला म्हणोन बातमी येथें दोन दिवस दाट होती. चौकसी करितां भाऊ वैज्यनाथास आले आहेत खरें, तेव्हां चित्ताचें समाधान जाहालें. मी लेकरानें काय ल्याहावें ! परंतु बंदोबस्त लौकर जाल्यास सर्वांचें कल्याण; नाहीं तरी येथील लोक मनस्वी गपा बोलतात त्या कागदीं कोठवर ल्याहाव्या ! श्रीहरिनें बंदोबस्त लौकर करून सर्वांचीं पारणी फिटतील तेव्हां चांगलें. दीढ वर्ष जाहालें, येक वेळ चरणाजवळ आल्यानें सर्व निवेदन करीन. मार्गसीर्ष अखेर येणार होतो परंतु बिराडीं चोरी जाहाली, त्याचे चौकसींत आहे. दैवानरूप पता लागेल तेव्हां खरा. चोरी जाली हा मजकूर पेशजीं सविस्तर लिहिला आहे. दोघा चौघांची वस्तभाव सर्वस्व जाऊन, आपले नुकसान दोन हजार रुपयांचें जालें. वकिलीचें नांव करून वडिलानी दिलें, परंतु चौकी पाहाऱ्यास सिपाई नाहींत. समई सिपाई देखील महिना पंधरा दिवस जवळ नसतात. याप्रमाणें सेवकाचें वर्तमान आहे. बहुत काय लिहूं ! सेवेसी श्रुत होय हे विज्ञापि.

*The writer Hari Damle gives news of three Englishmen of note having arrived and met Michael Fillows with a view to attack Broach. The English, the writer says, have become overbearing in their attitude since the overthrow of Tipu.*

---

*No. 20]* *[1799*

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री
नानासाहेब खिजमतीस

समस्त सिंदी जमादार सलाम विज्ञापना येसीजे. गव्हार जमादार वगैरे सिंदी सरकारात चाकरी सखाराम घाटगे याचे मारफातीनें करीत असता पोटास मागावयासी घाटगे याजवळ गेले. त्याणी दौलतराव सिंदे याजवळ जाऊन गैरवाका समजाऊन सिंदी जमादार जीवेंच मारिले. त्यासी आम्ही या राज्यांत चालीस

*पनास वर्षे चाकरी करित आलो, परंतु येसे कधी जाहाले नाही; आणि आतां* हा प्रकार जाहाला. त्यास साहेबी मनास आणून आम्हास आज्ञा काये ते करावी. स्वामी आमचे इनसाफ मनास आणीत नाही, तर सर्वत्र सिंदी मरून जाऊ हे विज्ञापना.

¶*The Sindhi Jamadars complain against Sakharam Ghatge having put to death some of their comrades and implore justice at the hands of Nana Fadnis. These are probably the Arabs.*

---

*No. 21*] [*1803 ?*

श्री

चिरंजीव राजश्री नारायणराव व जनार्दनपंत भाऊ यासी प्रति केसो रघुनाथ वझे आसीर्वाद उपरी येथिल क्षेम ता। छ ३ रजब सुखरूप असो विशेष. इंग्रजी पलटणं पुणियाहून कुमकेस येणार म्हणून एकतो, याजकरितां वाट पाहत बसलो आहो. त्यास ती येनात किंवा नाही हे समजत नाही, तर आपण खचित काये ते लिहून पा।. येथील मार तर तिकडून कुमक आल्यास हे उमेदवारी धरणार, नाही तर काही येथील सुमार दिसत नाही. रा। धोंडोपंत गोखले काही येत नाहीत. मला तिकडे या म्हणून पत्र आल्यास तिकडे येईन, नाही तर कोंकणची हावा पाहावयासी जाईन. बहुत काय लि।। हे।। पत्री वामनाजीपंत यासी आसीर्वाद लि।। परिसोन लोभ करावा हे आसीर्वाद. वझे मंडळी कोण तेथे आहे हे लिहून पा।। हे आसीर्वाद.

¶*Keso Raghunath Vaze writes to Narayanrao Vaze inquiring whether British regiments were coming from Poona for the writer's succour.*

---

*No. 22*] [*1799 ?*

श्रीपांडुरग

सेवेसी बाळोजी कुंजीर दंडवत विज्ञापना ऐसीजे. आज राजश्री दौलतराव बाबाकडील बाजारचे व लशकरचे लोक दोन यो[1] ब्रा। वाणी उदमी लोक पुन्यात गेले, ते रा। मानाजी सिंदे याणी आडथळा केला म्हणून बोमाट आला. त्यास आम्ही बोलली की ही गोस्ट घडनार नाही. याकरता येथून रो। रामाजीपंत

---

१ दोनपा पा। (?)

याजकडील प्यादा दाखवयास आला त्याजबराबर आपला हुजुऱ्या देऊन खरेखोटे हेहि पाहावे. बसविले आसतील त्यास आज्ञा व्हावी; आणि पुढे निक्षून ताकीद जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Baloji Kunjir urges upon Bajirao an inquiry into the disturbance created by the soldiers of Daulatrao Sindia.*

---

No. 23] [21-1-1800

श्री

अपत्यसमान हरि सदाशिव दामले चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत पौष वद्य ११ भौमवारपर्यंत वडिलांचे आसीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. पेशजीं तीन च्यार पत्रें पाठविली आहेत तीं पावलींच असतील. येथून इंग्रज पेशजीं पुणयासी पाछायाचीं पत्रें घेऊन गेले होते ते माघारे येऊन साहा दिवस जाले. त्यास मनोदयानरूप जाबसाल जाहाला नाहीं, म्हणोन बाजारी वर्तमान आहे. येक वेळ कोंकणपटींत गडबड करावी याप्रमाणे येथील लोकांचे सांगण्यांत बातमी आहे; परंतु तूर्त होतां दिसत नाहीं. तेथील विचार यथास्थित आहे; तरी याच्यानें कांहीं उचल करवत नाहीं. हा खंबीर पका. येथील लोक खबरा नेत असतील त्या खोट्या. इंग्रज लोक आपले ठिकाणी म्हणतात कीं प्रस्तुत आम्हांस कोण्हा शत्रु नाहीं; परंतु फरासीसाचें भये मोठें बाळगतात. त्यासी याची लढाई अद्याप होत आहे. वलंदेज याणी मोडला म्हणोन सांगतात. त्यावरून याचा त्याचा सलूक होणार म्हणोन बातमी आहे. दुसरे वर्तमान अधिकोत्तर ल्याहावें ऐसे नाहीं. मी निघोन लौकर येणार आहे, सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Sadashiv Damle writes from Bombay to Poona, giving news of the English casting a covetous glance upon the neighbouring districts of Konkan.*

---

No. 24] [June 1800

श्री

पुरवणी सेवेसी माहादाजी अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना. कितुर तालुक्याचीं ठाणीं मलप्रभेचे उत्तरतीरींचीं घातलीं, व पलीकडील कसबे बेलवडी व उडकिरे दोनी ठाणीं बसविलीं आहेत. देसाई याचा जमाव संगोळी, व शिंगेंहळी व देगाव मिळोन पांच सा हजार आहे. इकडे पर्जन्याचे दिवस जवळ आले. ठाणीं बसविलीं आहेत; परंतु गांवगनाच्या रयता परागंदा होऊन, गुरें दाणा चीजवस्तसुद्धां सरकार तालुक्यांत जाऊन राहिलीं आहे(त). तेव्हां देसाई याचा बंदोबस्त जाहाल्याशिवाय रयतेस भरवसा पुरोन पुढील लावणी होणें कठिण

7000

दिसतें. आम्ही निकड केली तर देसाई झाडींत जाईल; मुलकाची वस्ती फौज नसल्यास होऊं देणार नाहीं. तेव्हां देसाई यास पोटाची बेगमी व काटक लोकांच्या पहिल्या ज़मिनी चालत आहेत त्यांची चौकशी करून, वाजवी चावयाच्या असतील त्या देऊन, काटक व देसाई यांजपासून बदफैलीविशी जामीन पक्का घ्यावा, तेव्हां परिणाम लागल. मुलकाची लावणी होऊन, सरकारकिफाईतहि अमल चांगला करणार असला तर होईल असें वाटतें. कोणताहि प्रकार निश्चयांत येतां ऐसें दृष्टीस पडल्यावर स्वामीस विनंती लिहीन. सावनुराकडे कोणी गृहस्थ आहे, त्याणें आजच पत्र पाठविलें आहे कीं धोंडजी वाघ फौजसुद्धां कितुरकरांस येऊन मिळणार अशी बातमी पक्कीच लिहिली आहे. आम्ही हुषारीनेंच आहों. देसाई व काटकाचे बंदोबस्ताचा लिहावयाचा मजकूर. कारण पर्जन्य समीप आला, तो झाडींत गेला असतां फौजेचा उपाय पर्जन्य काळी चालणार नाहीं; व रयत आहे ती त्याचे लक्षाचे, मुलकाची लावणी होणार नाहीं, याजकरिता लिहिलें आहे. राजश्री भिमाजी बाबूराव निकडे गेले आहेत; आल्यानंतर मागाहून विनंती लिहितों. आज्ञा होईल त्याप्रमाणें करीन. इकडील आढळला मजकूर स्वामीस समजावा याजकरितां विनंती लिहिली आहे. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Mahadaji Anant reports the disturbed condition of the Taluka of Kittur.*

---

*No. 25]* *[June 1800*

**श्री**

पुरवणी सेवेसी माहादाजी अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री सर्वोजी काटे व आनंदराव बाबर व राजश्री धोंडो बल्लाळ गोखले याणी काटकाचे पहिले लढाईत, व बलवंडीस रात्रीस राहून, दुसरे दिवशी हल्ला करावयास व कितुराजवळ काल लढाई जाली यांत शिपायगिरीची बशर्त केली ती काय लिहों ! स्वामीचे समक्ष अशीं कामें जाहालीं असतीं तर त्यांत बहुत उपयोग पडता. असो, त्याची पराकाष्ठा जाली आहे, यास्तव स्वामीचें दर्शन जाहालियावर विनंती करावयाची ती करीन व संगोलीजवल लढाई जाहाली तेव्हां विनंती लिहिली आहे, ध्यानास येईल. सारांश, ही चाकरी स्वामीचे रुबरू जाहाली असती तरी ठीकच जाहलें असतें. चाकरीविशी सालमजकुरीं शर्तच केली आहे. तपशील लिहितां फारच होतो. दर्शन जाहालियावर समक्ष विनंती करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Mahadaji Anant reports the courage and valour of Dhondo Ballal Gokhale and Anandrao Babar to the Peshwa.*

No. 26] [June 1800

श्री

पुरवणी सेवेसी माहादाजी अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री धोंडो बल्लाळ गोखले बदामीचे स्वारीस मजबराबर होते. आलीकडे राजश्री परशरामपंत भाऊचे स्वारीबराबर होते; परंतु इतकी शिपाईगिरीची शर्त आजपर्यंत कळली नव्हती. सर्वांबरोबर लिहिलेंच आहे; परंतु लढाईविशीं मोठी जुवामर्दी. सरकार लक्ष बहुत मोठ्या कामांत असावें. सरदारी योग्य सरकार दौलतींत बहुत उपयोगी अशी खातरजमा आहे. समक्ष निराळी विनंती करीन. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*Mahadaji Anant recommends Dhondo Ballal Gokhale to the notice of Bajirao.*

---

No. 27] [1800

मसुदा

श्री

यादी अपराधी

१ श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेब स्वारीस निघाले. गारपिरावर कचेरीचे डेऱ्यांत बसले होते. दीप लावावयाचे समयास मुसाफरजंग गाड्याचा जमातदार जवळ बसला होता. डेऱ्यांत कोणी नाहीं असा समय पाहून भाऊसाहेबांवर कटार चालविली ती कुसीस लागली. भाऊसाहेबानी कटारेचा हात धरिला. पुढें त्यास ठार मारला.

२ श्रीमंत कैलासवासी नारायेणरावसाहेब यांस मारावयाचें प्रकर्णांत होते, त्यांचीं पारपत्यें :—

२ सुमेरसिंग व खरगसिंग पळून गेले होते ते स्वारींत हरिपंत फडके यास सांपडले. त्यांणीं ठार मारलें.

१ तुळाजी पवार पळून गेला होता, तो पाण्यांत गलबतांत धुळपानीं धरून पुण्यास पाठविला. त्याचें पारिपत्य केलें. तपशील

१ हातांस काकडे बांधून तेल घालून आग लाविली. मणगटांपर्यंत हात जळाले.

१ पायांस नालबंदी केली.

१ आंगास सुया दाभण टोंचून मिठाचें पाणी घालून रोज मार मारावा, याप्रमाणें करीत असत.

१ सेवटीं हत्तीचे पायास बांधून शहरांत फिरऊन कातरजेचे मार्गावर मुर्दा टांगून ठेविला होता.

---
४

---
३

२ तोतयाप्रकर्णी पारपत्यें

१ ऐन तोतया याणें दरोबस्त कोंकणपटींचे किल्ले घेऊन सिंहीगडपर्येत आला. सिंहीगडचा किल्ला घेतला. पुढें माहादजी शिंदे देशीं होते त्यांणीं स्वारी करून सिंहीगड घेऊन त्यास धरून पुण्यास आणिला. त्याची चौकशी पुरातन वृद्ध मुच्छदी वगैरे लोक भाऊसाहेबांजवळ राहाणार त्यांस पाठऊन केली. खोटा असें ठरल्यावर त्यास मेकम् खालीं मारला.

१ तोतयाजवळ दौलतगीर गोसावी होता, त्यास हत्तीचे पायीं बांधून मारला.

---
२

कारकीर्द थोरले रावसाहेब.

४ श्रीमंत कैलासवासी माधवरावसाहेब यांचे कारकिर्दीत पारपत्यें केलीं :—

१ गंगोबा तात्या दिवाण निसबत होलकर यांणीं रावसाहेबांस थेऊरचे मुकामीं श्रीगणपतीच्या दुर्वा उचलून दिल्ह्या कीं होळकर यास दादासाहेब यांजकडे जाऊं देत नाहीं. अशा शपता होऊन होळकर यांस घेऊन दादासाहेबांकडे गेला. पुढें दादासाहेबाचा मोड करून पुण्यास घेऊन आले; नंतर गंगोबा तात्यास धरून आणून वाड्यांत छड्यांनीं मारला. ब्राम्हण ठार मारूं नये याजकरितां किल्यावर ठेविला.

कारकीर्द थोरले रावसाहेब

१ मुरारराव जाधव भुइंजकर संपत टाकून गोसावी होऊन फिरत होता. पुढें त्याचें नांव करून कोणी येक आला, त्यास कैद करून ठेविला होता. पुढें खरा मुरारराव फिरत फिरत, त्यास बातमी कळली कीं आपलें नांव करून, खोटा तोतया होऊन कोणी पुण्यास गेला आहे म्हणोन तोच आला. त्यास सर्वांनी वळखिला. नंतर यास ठार मारिला.

१ तळेगांवकर सिकलगार मुसलमान ब्राम्हणाची बायको घरांत घातली, त्यास धरून आणून हत्तीचे पायीं बांधून ठार मारला. बायकोस मारूं नये असें आहे म्हणोन तिजला किल्यावर टाकिली.

१ मानसिंग खलाटा सरकारचा पाग्या याणें कोणी येका कुणब्याची बायको घरांत घातली. तिचे नवऱ्यास मारून मुर्दा घरांत पुरला. ही बातमी सरकारांत कळल्यावर त्याची पागा काढून त्यास किल्यावर टाकिला. तिचें नांक कान कापिले.

१ पटवेगार वाड्यांतील याणें श्रीमंतांचे कंठींतील मोत्यें चोरून मोबदला मोत्यें कंठींत घातलीं. हें वर्तमान सरकारांत कळतांच त्याचे आंगीं मुद्दा शाबूद करून हत्तीचे पायांशीं बांधला.

१ घाशीराम कोतवाल याणें श्रावणमासची दक्षणा घेऊन ब्राह्मण तैलंग देशास जात होते, त्यांस आणून आपले पेठेंत चावडीचे कोठडींत कोंडून टाकिले. येक दिवस होते. ते आंत ओरडूं लागले. त्यावाटेनें मानाजी फांकडे जात होते, त्यांणीं तें ऐकिलें. नंतर पालखींतून उतरून हातांतील तरवारेनें कोठडीचें कुलूप तोडून, ब्राम्हण बाहेर काढिले. दाहांपांच मेले, दाहावीस जिवंत होते. त्यांस साखरपाणी पाजून वारा घातल्यावर ते वांचले. नंतर तसाच वाड्यांत येऊन, जाला मजकूर श्रीमंतांचे कानावर घातला. गांवांतील ब्राह्मणांस वर्तमान कळल्यावर तैलंग ब्राह्मण तेथें जाऊन ब्राह्मण वळखिले. सायंकाळीं नानाचे वाड्यापाशीं ब्राह्मण जमा जाले आणि वाड्यावर दगड मारूं लागले. नानांनी दाजीबा फडके यास व भास्करपंत कानिटकर यांस पाठऊन ब्राह्मणांपाशीं घाशीरामाचे पारपत्याचा ठराव केला. च्यार घटका रात्रीस घाशीरामास हत्तीवर बांधून रमण्यांत ठेविला. दुसरे दिवशीं तो जिवंत आहे असें कळल्यानंतर ब्राह्मण सरकारचे वाड्यांपाशीं दोन हजार जमा जाले. श्रीमंत उपाशी ब्राह्मणांकरितां बसले. मग घाशीरामास रमण्यांतून अणून चावडीवर पाट काढून उंटावर बसऊन शहरांत फिरविला. गुलटेकडीस नेऊन ब्राह्मणाचे हवाली केला, त्यांणीं दगडांखालीं ठार मारिला.

१ बाजीरावसाहेब यांचे कारकिर्दीत बाजीपंत मराठे गाडद्यांकडील याचे सदाशिवपंत दत्तपुत्र याणें आपले आईस ठार मारून घरांत पुरून टाकिली; आणि आपणच बाळजीपंत गोखले यांचें घरीं जाऊन

फिर्याद केली कीं दोन दिवस तिचें ठिकाण लागत नाहीं. इतक्यांत घरांतील माणसांस घाण येऊं लागली. बोभाट जाल्यावर त्यास धरून आणिला. चौकशी करितां त्याचे अंगीं मुदा लागला, पुढें त्यास किल्यावर घातला.

१ अंकुशखान याणें कर्नाटकप्रांतीं काटकाई करून बंड करीत होता, त्यास धरून आणून तोफेचें तोंडीं दिल्हा.

१ गुलाम कादर व इस्माल बेग यांणीं दिलीपति पातशाहा यांचे डोळ्यांत सळया फिरविल्या. नंतर फौज धरून गजेरजवाडे यांस सामील करून चमेलीपर्यंत अंमल बसविला. पुढें सरकारांतून अली बहादर यांस पाठऊन शिंदे व ते येकत्र होऊन गुलाम कादर यास अलीबाहादर यांणीं धरिला, आणि शिंदे यांचे स्वाधीन केला; त्यांणीं ठार मारिला. नंतर पुढें अली इस्माल बेग याच्या लढाया जाल्या. त्यांस शिंद्यांनींच धरून आणून मारला.

¶ *This paper enumerates several offenders who were punished, during the regimes of the last four Peshwas, and describes the savage punishments inflicted on them. The prominent amongst them are Mujfarkhan, Sumersing, Khargsing, Tula Pawar, the Pretender of Bhausaheb, Gangoba Tatya Chandrachud, Ghashiram Kotwal, Gulam Kadar and Ismail Beg.*

---

*No. 28*] [*9-3-1801 ?*

श्री

सेवसी बाळोजी[१] सदासिव वैशंपायन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ २३ सवालपावेतों मुाा लस्कर नजीक किले कोरीगड येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. हाजी अहंमद आरब रूपरामाचे दिमत जमातदार आरबाचा आहे. त्याचे आमचे बोलणे आज एक मही जाहले होते. त्यास जेव्हां त्याचे डावांत गोष्ट आली तेव्हां त्याणे वरील आरबास बोलाऊन त्याचे याचे बोलणे छ १३ सवाली जाहाले, ते प्रमाण असी त्यांची खातरजमा जाहाली. यावर त्याचे आमचे फिरोन बोलणे जाहालें. तेव्हां पके संधान आहे असे वाटले, म्हणोन छ २१ सवालीचे पत्री विनंती सविस्तर लिहिली. त्यास तरावे सवाली ते आरब वर जाऊन आपले भाईबंदात विचार केला कीं आपले जातीचा जमातदार म्हणोन त्याणें आमचे कल्याणाची गोष्ट आम्हांस सांगितली ती खरी. पृथ्वीपतीसी भांडून आपला परिणाम लागत नाहीं असा त्याणी आपले जागीं निश्चय ठरऊन, रास्ते वर आहेत त्यास येविसी साफ सांगितले कीं आम्ही तुम्हाबरोबर सरकारासीं कोठवर भांडावें? यांत आमचा परिणाम लागत नाहीं म्हणोन आम्ही

१ जिऊबाई नाना फडणिसाची बायको इचा भाऊ.

आपले बोलण श्रीमंताकडे लाविले. आम्ही खालीं जातो असा वरील आरबांचा निश्चय आज आठ दिवस ठरला असे रास्ते यांस जेव्हां समजलें, तंव्हां सर्वाचा धीर सहज तुटला. दरकदार व रास्ते मुलेसुधा सारीच गलबली. ज्या आरबाचे आश्रयानें आजपर्यंत हिमत बांधिली होती तेच जेव्हां परभारें समजतात असें जेव्हां जाहालें, तव्हां त्यांची स्वामीचे पुन्यप्रतापेकरून कमरच बसली. त्यास जर आरब परभारे समजले तर हे आमचे चाकर असता आमचे मुसक्या बांधून आम्हास खावंदाचे हवाली करितात, त्यापक्षीं आपले बोलण्याची जर सुर्स्ती करावी तर हे आरब आपल्ये तलबेची तलब घेऊन, आम्हांस खाली नेऊन बाळाजी-पंत पटवर्धन याचे हवाली करितात याचा संदेहे राहिला नाहीं. तंव्हां मग आपले बोलणे चालणार नाहीं. याजकरितां तुम्हीं आमचे चाकर, तुमचे जिवाचा बचाव जाहला पा। म्हणोन तुम्हीं खावंदासी संधान लाविले. त्यास आतां असे करूं नका. आम्हीच बोलणे लावितो. आमचे बंदोबस्ताचा दारमदार ठरल्या-वर यांत तुमचा बंदोबस्त सहजच जाहला. आम्हींच खाली बोलणे लावितों. असा आरबांचा व त्यांचा विचार ठरला. बोलावयासी खाली कारकून येताहे. हाजी अहमदानें काल मला येऊन सांगितलें की च्यार रुपये बाळाजीपंतास दरबार-खर्च अधिक उणा द्यावा; आणि सरकारातही च्यार रुा कबूल करावे. एक दुसरा किल्ला द्यावा आणि आपले दौलतीचा बंदोबस्त करून घ्यावा. या बोलण्यास कारकून येता त्याप्रमाणें आज च्यार घटका दिवसास मी खाली येतों. तोफा बंद कराव्या. असें गोविंदपंत पानशानें वरून गोसावीबावाचे मोर्च्यात हाक मारून सांगितल्यावर गोसावी यांणीं दादाकडे निरोप पाठविला. याणीं त्यास घेऊन येणे अशी परवानगी जाऊन तो प्रहर दिवसाचे सुमारें डेऱ्यात (डेऱ्यान) आला. दादाचे भोजन होऊन आडचा प्रहराचे सुमारे तो वर गेला. याप्रमाणे वर्तमान जाहाले. त्यास कालचे विनंतीने तोफ चिठ्या याव्या म्हणोन लिा आहे त्याप्रा तर जल्द याव्या. जसा प्रसंग पडेल तसे करावयास येईल. येविसीं दादानी विनंती त्याचे आमचे बोलणे काय जाहले असेल त्याविसीं त्याणी लिाच असेल. तेही ध्यानात आणून जसी मर्जी असेल तसी आज्ञा व्हावी. कदाचित मागे याचे गोविंदपंताने एकवेळ मूलथाप दादास दिलीच आहे तसेच कांही संधान असल्यास ते चिठ्याचे संधान मजपासी पाहिजे, याजकरितां विनंती लिा आहे. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना. बोलावणे आले याजवर केवळ जाण्याचे नाहीं. गोपाळपंत बाबाची रवानगी सत्वर व्हावी हे विज्ञापना.

¶*Report of a scuffle at Korigad, between the Arabs of Nana Fadnis and the Peshwa's forces and of the negotiations that followed about their release is sent by Balaji Sadashiv Vaishampayan.*

7006

No. 29] [30-6-1801

श्री

सेवेसी गोंदजी ससाणा जासूद सा। दंडवत विज्ञापना. ता। छ १८ सफर मंगळवार मु।। कोरेगांव वर्तमान येथास्थित असे विशेष. हिकडील वर्तमान रा। सखाराम घाटगे व आपा निपाणकर व इंग्रज वकील संगमावरील या तिघा जणाची मसलत येक प्रहर जाहाली. नंतर संगमवाले पुण्याकडे गेले. येथे जमाव भारी पडणार असे दिसत आहे. पूर्वेकडून फौज दाहा हजार येणार ऐसे बोलत आहे. जमाव करून पुण्याकडे चढाई करून जाणार ऐसे वदंता आहे. चौकडे कद्या कडबा भरून आणितात व घरात सिरून वेरणी काढितात. रा। पुरंधरे याजकडील सिलेदार त्यांचे आडनाव काटकर रोजगाराम आले आहेत त्याची हजिरी होणार या प्रा। वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The news of common consultation of the Ghatge, Nipanikar and the English Resident and also of mobilising of troops is reported in this letter by a certain Jassood.*

---

No. 30] [17-6-1801

**श्रीम्हाळसाकांत**

**श्रीमंत राजश्री पंतप्रधान**
**स्वामीचे शेवेसी**

विनंति शेवक येशवंतराव होलकर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील क्षेम ता। जेष्ट शु।। ६ पर्यंत स्वामीचे कृपाकटाक्षेकरून यथास्थित असे विशेष. इकडून विनंतिपत्रे वरचेवर पाठवितो, परंतु उतराची आज्ञा होत नाही याजमुळे चित सापेक्षित असे. तरी स्वामीनी कृपा करून पत्रोत्तराची आज्ञा केली पाहिजे. तीर्थस्वरूप विठलराव होलकर यानी स्वामीची आज्ञा न घेता श्रीपंढरपुराकडे जाऊन क्षेत्रास उपसर्ग दिल्यामुळे इतराजी होऊन प्रकार घडला तो समजला. त्यास देवाची जागा, तेथे उपद्रव दिल्हा तेव्हा श्रीचे इच्छेने घडले, त्यास उपाय काय ? तथापि स्वामीचे हाते जे घडेल ते शेवक लोकास श्रेयस्करच आहे. आमचे लक्ष कैलासवासी वडिलानी शेवा केली त्याप्रोच जपून शेवा करून दाखवावी हेच आहे. कदाचित आम्हापासोन कोठे काही अधिक उणे दिसोन

आल्यास आज्ञापत्री सूचना करून मार्गास लाऊन लोभ करून शेवा घ्यावी हेच विहित. वडिलानीं येकनिष्टपणे चाकरी केली आणि पूर्वीपासून लोभ संपादन केला त्याप्रा। आम्हीहि चाकरीची उमेद धरून आहो. तेव्हा स्वामीचेहि मनांत ईश्वर प्रेरणा करून लोभच करितील. तीर्थस्वरूप रा। कासीराव बाबा स्वामीची आज्ञा घेऊन इकडे येतात. आम्हास वडिलांचे ठिकाणी तेच आहेत. पूर्वीपासून त्यांचा लोभ आमचे ठाई व आमचीहि निष्टा त्यांचे ठिकाणी आंत:करणपूर्वक आहे. सर्वांनी येकदिल राहून स्वामीशेवेविरितिरिक्त दुसरा अर्थ किमपि नाहीं. इकडील संशय कोणेविसी तिलप्राय मनांत न आणिता लोभयुक्त उतरार्चा आज्ञा होऊन उमेदीने चाकरी घडे ते करणार स्वामी समर्थ आहेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶ *Yashwantrao Holkar writes to the Peshwa expressing his regret at the fate suffered by his brother Vithoji Holkar for the ravages he committed at Pandharpur. As for himself, he adds, he is always ready to obey the Peshwa's commands.*

---

*No. 31*] [*23-7-1801*

श्री

शेवेसी रायो बल्लाळ कादार किल्ले कुकरमुंडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ ११ रोवल पावेतों शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. येशवंतराव होळकर व सिंदे यांची लढाई हांड्याचे घाटानजीक जाहली. आज तेरावा दिवस आहे. तरवारेसी तरवारी भिडोन मातबर लढाई जाली. बहुत मनुष्य उभय दळचे पडले; परंतु मोड कोणाचा जाहला नाहीं, म्हणोन वर्तमान एकिण्यांत आहे. स्वामीकडे डाकेबराबर लिहिले गेलेच असेल. इकडे होळकराकडील बारगळ म्हणोन सरंजामी आहेत, त्यांजकडे तळोदे कुकरमुंड्यानजीक अडीच कोसावर आहे, तेथें बागस (बंगस ?) सिलेदार होळकराकडील नंदुरबार मुलतानपूरचे बंदोबस्ताकरितां आला आहे. बराबर दोन अडीच हजार फौज आहे. त्याणे शह देऊन गावची गुरें वळून नेली; व आणखी खंडणीचा नगादा लाविला आहे. एक दोन लढाया जाहल्या. बागस याची दृष्ट वाकडी दिसते. बनल्यास तळोदे हस्तगत करावें या विचारांत आहे. ते सिधीस गेले तरी किल्याकडे पाहणार म्हणोन वर्तमान आहे. त्यास त्याचे आचरणावरून पाहतां वास्तविकच दिसतें. सबब जाजती सिबंदी ठेऊन मजबुदी केली आहे, व दारूगोळी खरेदी करून ठेविली आहे. उलबाण एक गेले तर एक उभे राहते,

यामुळें सिबंदी वगैरे खर्च जाजती करणे प्राप्त आहे. कारण की सरकारचा नक्ष राहिला पाहिजे. स्वामींस श्रुत व्हावें म्हणोन विनंती लिा आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापि.

*¶Ragho Ballal, Kamavisdar, Kukarmundha, reports to the Peshwa the severely contested battle of Handia between Yashwantrao Holkar and Sindia.*

---

*No. 32]* *[26-8-1801*

**श्री**

**श्रीमंत राजश्री दादा**
**स्वामीचे शेवसी**

विनंती सेवक बाळाजी बापूजी कृतानेक साां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता‍ा श्रावण वाा ३ पावेतों मुाा महेश्वर आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण आषाढ वद्य तृतीयेचें पत्र पाठविलें तें पावलें. गुाा ची वहिवाट व रसदेचा ऐवज लवकर पाठवावा म्हणोन आज्ञा. त्यास इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री कासीराव बाळा नागपंचमीस महेश्वरी गडावर दाखल जाले. आपले महालावर पांच हजाराचा रोखा घासदाण्याचा केला. स्वार प्यादे पाठऊन दंगा बहुत केला. तीन साडेतीनपावेतों निदान आम्ही बोलतों. ऐकत नाहीं. मोठे मिनतीनें साडेतीन ठरविसे केले आहे. राजश्री यशवंतराव होळकर पनास हजार फौजेनिसी सत्वासचे घाटाचे रोखानें सिंदे याजवर दबाव घालून आहेत. सरजेराव घाटगे बऱ्हाणपुरास दाखल जाले. सिंद्याकडील पेंढारी पांच सात हजार नर्मदा उतरून बढवनजीक ओंकारेश्वराकडे आले. त्याचे पाठीवर दहा हजार फौज आहे. महेश्वराकडे रूख आहे; कासीराव बाळा जवळ पांच हजार फौज चांगली आहे. पेंढार उतरल्यामुळें महालचे लोक भयाभीत होऊन कितेक परागंदा जाले. ईश्वरे काय नेमले आहे कळत नाहीं. आपण ऐवजाविसीं निकडीनें लिा. ऐवज तरतूद करून दोन तीन हजार पाठविणार होतों, तों होळकर यांस घासदाण्यामुळें अडचण पडली, व पेंढारी दहापंधरा कोसी आले. येणेकरून साहुकार वगैरे परम भयाभीत आहेत. मासपक्षात स्वस्थता आपले आशीर्वादेंकरून जाली, म्हणजे दिवाळीपावेतों थोडाबहुत ऐवजाची तरतूद करून पाठवितों. पेशजी रामकर्ण बोथरा याजवर पांचहजाराची हुंडी पाठविली होती. श्रीमंतास विनंती करून हा ऐवज उगवल्यास साहुकार आपले उपयोगी फार पडेल. या कार्यास पांच च्यारशे रुाो दरबारखर्च पडल्यास करून, श्रीमंतास सख्त रदबदली करून ऐवज वसुलात येई तो अर्थ करावा. महालची

वहिवाट आठ च्यार दिवसीं रवाना करीन. इकडील वृत श्रीमंतास व कारभारी यांस कळऊन जेणेकरून परिणाम आपला लागे तो तो विच्यार पहावा. वहिवाट आपल्याजवळ पावल्यावर फाजीलहि समजेल. ती॥ राजश्री शेषरावजाच्या गळ्यास गल्याटा जाला, तेणे करून दोनमास फार हैराण जाले. फोड फुटला; आता किंचित आराम आहे. सेवेसी कळावें. वहुत काय लिहिणे, लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विज्ञापना.

*This is another letter about the clash of arms between Sindia and Holkar. Yashwantrao Holkar with an army of fifty-thousand is reported to be hovering about the pass of Satvas. The Pindaris of Sindia and Holkar are ravaging the country, says the writer.*

---

*No. 33]* *[16-9-1802*

## श्री

### रा॥ बाळोजी कुंजर गोसावी यांसीं

आशीर्वाद उपर तुम्ही पत्र पा॥ ते पावले. होळकर याजकडील माहाल तूर्त जप्त केले यात तूर्त सिद्याचा संतोष होईल. पुढे सोडणे जाहले तर पंधरा लक्षाचा सरंजाम सरकारात येऊन मग सोडून देऊ म्हणोन लिहिले; त्यास उतम आहे असेच करावे. होळकर याजकडील माहालाची दाहाबीस पंचवीस कोसाची आपण जप्ती करावी म्हणोन विनंती लिहिली होती, त्याप्रो॥ करतात किंवा मीच करू, जसी आज्ञा होईल तसे करीन म्हणोन लिहिले, त्यास दाहावीस पचवीस कोसी होळकर याजकडील माहालाची जप्ती करणे म्हणोन तुम्ही लिहिल्याप्रमाणे रा॥ नाना पुरंधरे यास आज्ञा केली. त्याणी आज्ञेप्रो॥ मान्य केले; परंतु नानानी मान्य केले या भरवशावर तुम्ही न जाता इकडेहि जितके होळकराचे माहाल असतील तितक्यावर जप्त्या पाठऊन जप्त्या करणे. ज्या महाली नानानी जप्ती करविली असेल असे पके पाहून त्या माहाली मात्र न करणे. नानानी जप्ती केली नसेल तेथील करणे. विलंब न करणे. जाणिजे छ १८ जमादिलवल हे आसीर्वाद.

*+Bajirao Raghunath orders Baloji Kunjar to attach all the lands belonging to Holkar.*

---

+ वरील सबंध पत्र बाजीराव रघुनाथ यांचे हातचे आहे.

No. 34] [26-9-1802?

**श्रीराजराजेश्वर**

**राजश्रिया विराजित राजमान्य**

**राजश्री नारायण रावजी स्वामी**

**गोसावी यासी**

पो॥ लक्ष्मणराव गोविंद दंडवत विनंती उपरी (येथील) कुशल ता॥ छ २८ जमादिलोवलपर्यंत मु॥ नजीक * * * येथास्थित जाणून स्वकीय कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. तुम्ही बहुता दिवसी पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ मजकूर ध्यानास आला. ऐसेच निरंतर * * * * (प)त्री परामृष करावयासी अविस्मर असावे. यानंतर इकडील वर्तमान तरी राजश्री येशवंतराव होलकर फौजेसुधा खांदेश प्रांतांत नारोशंकर यांचे मालेगावावरी मुकाम क * * * हेत. त्याजकडील पठाण माने वगैरे अलीकडे येऊन गंगथडी प्रांतात धामधूम मांडली आहे. त्यास येथील सरकारातून बंदोब * * * न वकील पाठवावयाची त्याजकडेस योजना करितात * * * * व्ही अद्यापि निश्चयात आला नाही. मग काय व * * * * * ते खरे; परंतु होलकर मजकूर याजकडील लोकानी फारच * * * * आहे. त्याचे निवारण जाहालियासिवाय ठीक पडणार * * बंदोबस्त जालियावरी दुसरी मसलत होणे ते होईल. याजक(रि)ता ही मसलत येथास्थित होऊन यावी बहु * * * *

*Lakshmanrao Govind reports the disturbances created by Yashwantrao Holkar and his armies and their arrival in the province of Naro Shankar near Malegaon.*

---

No. 35] [7-2-1803

छ १४ सवाल माघ मास

सन आर्बा मया तैन रा॥

सदाशिव माणकेश्वर सनद लिहिणे.

**श्री**

समुद्रांत फरासीसी जहाजासी व इंग्रजी जहाजाशी लढाई होऊन फरासीसी जहाज इंग्रजानी शिकस्त करून मुंबईस भरून आणिले; त्याचा झाडा घेता तीन सरदार फरासीसी संगमेश्वराचे बंदरी उतरून खुपकीवर आले आहेत, ते सरकारात आणवावे म्हणोन खुषरोजी मोदी दि॥ इंग्रज याणी विदित केले. त्यावरून हे पत्र सादर केले असे. तरी बंदर मजकुरी तीन असामी फरासीस उतरले असल्यास

7011

याची चौकशी करून तेथे असलिया समागमे तुम्ही आपली पंचवीस माणसें देऊन वाटेन चौकी पाहाऱ्याचा बंदोबस्त करून हुजूर पोहाचाऊन देणें. तेथून निघोन गेले असलीया कोणीकडे गेले याचा पत्ता लागेल तेथवर लाऊन, सरकारात विनंतीपत्र लिहिणे म्हणोन संगमेश्वरचे कमाविसदाराचे नावें. पत्र १

सदरहूप्रमाणे खुपरोजी मोदी दिा इंग्रज कलकत्तेकर याणी हुजूर विदित केले त्याजवरून हे पत्र सादर केले असे. तरी फरासीसाकडील तीन असामी बंदर संगमेश्वर ताा रत्नागिरि येथे उतरले असिल्यास याची तुम्ही वाजबी चौकशी करून तीन असामी तेथे असल्यास बंदोबस्ताने हुजूर पोहोचाऊन देणें. तेथून निघोन गेले असल्यास कोणीकडे गेले याचा पत्ता लागेल तेथवर लाऊन हुजूर विनंती पत्र लिहिणे, म्हणून मामलेदार तालुके मार यास पत्र. रुजू सनद देणें.

¶*Mamlatdar of Sangameshwar is ordered to send to Poona under proper escort the three French Officers who were taken prisoners by the English and who had escaped to Sangameshwar.*

---

*No. 36*] [*11-12-1803*

नकल

सिका

श्री

आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान ताा खुसरवजी वलद जमसेदजी पारसी वस्ती कसबे खंबाईत पाा मजकूर तालुके अमदाबाद सुाा आर्बा मयातेन व अलफ शके १७२५ रुधिरोद्गारी नाम संवत्सरे. तुम्ही सरकारकामाचे उपयोगी सबब तुम्हास कुटुंबाचे बेगमीस मौजे वलीपूर पाा जंबूसर प्रांा गुजराथ हा गांव नूतन इनाम द्यावयाविसी सन इसने मयातेनात सनदा लिहिल्या होत्या. परंतु गांव तुमचे सोईचा नाहीं. याजकरिता सरकारात येऊन माल मजकुरी मौजे * * * * ताा लाटाणे पाा पेटलाद ताा अमदाबाद हा गांव सात हजार रुपयाचे बेरजेचा त्यापैकी निमे अमल सरकारात व निमे दादाभाई अमीन याजकडे चालत आहे त्यासुधा तुम्हास कुटुंबाचे बेगमीस खेरीज हकदार व इनामदार करून नूतन इनाम सरकारातून करून दिल्हा असे. तरी मौजे मजकूर हा गांव तुम्ही दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे पुस्त दरपुस्त वंशपरंपरेने इनाम अनभऊन सुखरूप राहाणे. जाणिजे छ २६ साबान आज्ञा प्रमाण मोर्तब.

¶*Bajirao II grants an inam village to Khusru Jamshetji of Cambay for his loyal services.*

No. 37] [13-1-1804 ?

नकल

श्री

विनंती विशेष. माघ शुा १ कुंभेरीनजीक इंग्रजाची व होळकराची लढाई जाली. त्यास इंग्रेज शिकस्त होऊन काही पाच सात पलटणें मारली गेली. बाकीची पळून गेली. नंतर माघ शुा १० पुन्हा पलटणें जमून भरतपुरास जाऊन मोहसरा केला. होळकर व जाट येकत्र होऊन लढाई मारून पलटणें गारत केली. काही जखमी होऊन जिकडील तिकडे पळून गेली. तिघे सरदार इंग्रजाकडील पाडाव जाले; घोडी, उंट, तटे वगैरे समग्र लुटले. लढाईसमई इंग्रजाचे लस्करात सोळा रुपये शेर पीठ जाले होते. बहुत नाश जाहाला. पलटणें याउपरी तिकडे राहिली नाही. सिंद्यांनी कूच करून तिकडे जात असतां हरजी होळकर वीस हजार फौजेनिसी सिंद्यास सामील जाहाला; व सिंद्यास होळकरांनी लिहिले की तुम्ही इकडे येऊ नये. उज्यनीकडे जावे. आम्हीहि लौकरच महेश्वरास येतो, म्हणजे भेटी होतील. इकडील जळाची समग्र पराभव केला. काही पलटणें राहिली नाहीत. त्याजवरून सिंद्यांनी सागराहून कूच करून सुरज भेलशानजीक आले. उज्यनीस येऊन बराणपुरास येतात म्हणोन नागपुराहून नारायणराव वैद्य याजकडील श्रीमंतास पत्रे आली; त्याजवरून येथील अधिकारी याणी नेम ठरविला की, वाईस जाऊन माहाडाहून घोडबंदरास जाऊन राहावे असी तजवीज केली आहे. संवत्सर प्रतिपदा अथवा द्वितीयेस जाणार. उंट चराईस होते ते आणविली आहेत म्हणोन येकिले. इंग्रेजाकडील वकिलासहि समागमे घेऊन जाणार म्हणोन एकिले. व सिंद्याचे लस्करची पत्रे आली त्यात मजकूर की इकडील पलटणें काही होळकरानी राहू दिल्ही नाहीत. ममलहत अखेर जाल्या याप्रा दिसत आहे म्हणोन लिा आहे. सिंद्यांनी लिहिले आहे की, जळाकडील बोलणार येऊन कलमबंदी ठरविली आहे. त्यास कर्नाटकचे कलमाची भानगड पडली आहे. सुलतान याची चीजवस्त वगैरे न वसूल आजपर्यंत व खंडणीचा एवज मागो नये. यात ठराव जाहला म्हणजे जिकडील तिकडे जातील म्हणोन लिहिले आहे असे एकिले. याहून विशेष नाही. लोभ कीजे हे विज्ञापना.

¶*The writer gives an account of the battle of Bharatpur between the English and Holkar and the Jats combined and adds that the English suffered heavily in the contest.*

No. 38] [24-4-1804

नकल

श्री

विनंती ऐसी जे. होळकरानी जळोंचा समग्र फडच्या केला. मागील लढाई भरत-पुरसमीप जाली म्हणोन आपल्यास सूचना पूर्वी लिहिण्यात आली होतीच. त्यात तीन सरदार मातबर सापडले तेव्हां तह ठरला. दोन सवस्थानापौ येक स्थळ द्यावे असे ठरले. नंतर सिंद्यास पत्र पा। की पत्र पावतेक्षणी सडे होऊन यावे. त्याजवरून सिंदे राघोगडानजीक लस्कर ठेऊन सडे पाच च्यार हजार फौजेनिसी स्वार होऊन दरकूच होळकराचे भेटीस मथुरेनजीक गेल्याची पत्रे आली. इकडे पेंढार व जोत्याजी माने रवाना जाहाले आहेत हे ग्वचित, काही येक तथा नाही. छ १० मोहरमी श्रीमंताकडे अस्तमानी इंग्रेज आले होते. बाईस तूर्त जाऊ नये, यशोदाबाईस तेथून आणावे म्हणोन आग्रह पडला तेव्हा कलेज्यास आणितो असे ठरले. वराणपुराकडील पलटणे नगरास आली. नबाबाकडील फौज पलटणे हैदराबादेस महिपतरावसुद्धा चालले. विचूरकर विचुरास गेले. नगरचे किल्यातील सरंजाम समग्र बाहेर काढिला. तह जाला असे दिसते. साहुकारी पत्रे आली त्यात तह जाहला पत्रे करार करून आणावयासी पधरा दिवसाचे मुदतीने कलकत्यास पाठविली आहेत. काल छ १२ मोहरमी येथे प्रहर रात्रपर्यंत विचार जाहाला. बहुत ग्लानि दिसोन आली. येकूण जळानी जळात राहावे, खुसकी समग्र सोडून द्यावी असे जाहालेसे दिसोन आले. चिंतामणराव मिरजकर सात आठ हजारानिसी जामखेडी तालुक्यात गेले. फौज ठेवीत आहेत. सांप्रत विठल बाबाजी व लाडकोबा व मोरोपंत दातार वगैरे दोन तीन हजार जमले आहेत. करकंबपर्यंत त्याचे रोख आले आहेत. येथील मडळीस बहुत विचार पडला आहे म्हणोन ऐकिले. होळकर सिंदे छावणीस देशात येत आहेत. तथा राहिली नाही. येथून जे होईल त्याप्रा। आपल्यास कळेल. हे विज्ञापना. औरंगाबादचे वर्तमान आद्याप आले नाही, आणखी गेले आहेत. वर्तमान येताच सूचना करितो. हे विज्ञापना.

¶[News-letter communicating the reverses which the British sustained at the hands of Holkar near Bharatpur and the consequent sensation it produced in the Deccan.*

---

+ जलचरांचा.

No. 39] [20-6-1804

(नकल)

श्रीशंकर प्रा

चिरंजीव राजश्री कृष्णराव यासी खंडेराव नीलकंठ आसीर्वाद उपरी. येथील जाणून स्वकीयें कुशल लिहीत जावें विशेष. मुंबईहून करनेल लोदनसाहेब इंग्रेज वसईच्या मार्गे सुरतेस जावयास वसई बंदरी उतरून जातील. त्यासी हरएकविसी दिकत न होता जात ते करावें. येविसींची श्रीमंताची आज्ञा जाहली आसे. याजवरून तुम्हास लि॥ आहे, तरी मारनिले इंग्रेज खोलंबा न होता जाऊ द्यावे. रा छ ११ रावल सु॥ खमस मया तैन व अल्फ. बहुत काय लिहिणे हा आसीर्वाद.

¶[*Khanderao Nilkanth Rastia to Krishnarao communicating the Peshwa's instructions to give free passage to Col. Lodan in his journey from Bombay to Surat.*

---

No. 40] [1804

श्री

यादी बाजीराव गोविंद बर्वे सु॥ खमस मयातैन व अल्फ प्रांत कर्नाटक येथील कामकाज सरकारातून सांगितले.

१ फौजेचा सरंजाम.

| | |
|---|---|
| १५००००० | स्वार ५००० |
| १७६००० | गाडदी २००० |
| ६०००० | तोफखाना दरमहा ५००० |
| १२०००० | पागाचे स्वार २०० पा |
| १८५६००० | |
| ४४००० | पीलखाना व उष्टरखाना वगैरे |
| १९००००० | |

८ यासी माहाल

| | |
|---|---|
| २९७१९३॥≈ | पा गदक व बंकापूर दुमाले खेरीजकरून. |
| ९५०९८२।॥= | तालुके सावनूर माहाल १९ पैा वजा दुमालेकरून बाकी अमल. |

7015

३०००००  सरदेसकत मामले तोरगल
९६३०९॥≡ जुनी हुबळी
१८०८९०८≡ गस्ते याजपैकी पो अथणी व जत व करजगी.
११४७०३॥- तालुके धारवाड व कितूर वगैरे माहाल पैकी.

१९०००००

१ सरसुभा सरकारी माहाल कमाविसीचे आहेत ते काम.

२

फौजेचा संरजाम व सरसुभा कर्नाटकचा सांगितला होता त्याप्रमाणे करून त्यावयाचा.

¶*This is a detailed assignment of territory granted by the Peshwa to Bajirao Govind Barve for the maintenance of his contingents.*

*No. 41*]  [*3-5-1808*

पौा वैशाख वद्य ९ बुधवार
प्रातःकाळ च्यार घटका दिवस
सन समान मयातैन

**श्री**

**राजश्री गोविंदपंत भट व**
**तात्या आभेकर स्वामीचे सेवेसी**

पौा पांडुरंग रामचंद्र सां नमस्कार विनंती विशेष. आम्ही पुणियांहून निघालों ते वैशाख शुध ८ मंगळवारी च्यार घटका आस्तमानचे दिवसी पावलों. आम्हा सिवपुरी येताच चिरंजीव गो हरिपंत भाऊचे पत्र वाईहून आले. त्यात लिा आहे की राज्याभिशेक जाला म्हणजे तोफा व्हावयाचा सिरस्ता तालुके हाय व पुणियातील तोफखानियांत वगैरे कसकसा आहे, त्याचा दाखला चौकसी करून येकयेका ठिकाणीं तोफेचे बार किती किती ते तपसीलवार लेहून जलद पाठवावे. तूर्त अथवा तरी पुणियातील तोफखानियाचा व आणखी दोन च्यार ठिकाणचा येसा आधी लेहून पाठवावा; व मागाहून झाडून लेहून पाठवावा. वाईहून गडी आला आहे तोच पाठविला आहे; तरी याजबराबर येक दाखला

व डाकेबराबर येक दाखला यैसा पाठवावा. कलावे. मिा वैशाख वा। ८ मंगलवार पाहाटेची रात्र च्यार घटका. श्रीमंतास वस्त्रे माहाराजाकडील होतात तेव्हा तोफा किती सुटतात त्याचाहि दाखला लहून पाठवावा. वाईहून चिरंजीव राजश्री हरिभाऊ याचे पत्र आहे, तेच आलाहिदा पाठविले आहे. जलद पाठवावे हे विनंती.

¶*Pandurang Ramchandra writes to Govindpant Bhat and Tatya Abhyankar to supply Haripant Bhau of Wai with information regarding the number of cannon-shots to be fired on the occasion of the King's Coronation.*

---

*No. 42*] [*1806*

ड. क. रु. १२५

मुछदी

१ चिंतो वामन देशमुख सन सीत मयातैन साल १९
१ रावो केशव ठोसर सन आर्बा मयातैन १७
१ नारो गोविंद सन इसने मयातिन १९
१ परशराम खंडेराव सन खमस मयातैन १६
१ रामाजी भुजंग सन खमस मयातिन
१ विठल मल्हार पुरंधरे सन सलास आबैन ७८
१ नारो नीलकंठ मजमदार सन सीत खमसैन ६५
१ विष्णु आपाजी चिटणीस.
१ बापूजी नारायण पारसनीस सन आर्बा सितैन ५७
१ नारो हरि
१ विठलराव मोरेश्वर गोळे सन इसने समानीन ३९
१ जिवाजी रघुनाथ समानीन ४१
१ महिमत मल्हार समान सितैन ६२
१ गोविंदराव भगवंत तिसैन ३१
१ सिवराम रंगनाथ इहिदे मयातैन १०
१ अंताजी सदासिव सान आर्बा मयातैन १७
१ बालाजी लक्ष्मण ०
१ बाबुराव गणेश इहिदे मयातैन २०
१ दिनकर अनंत
१ विनायक नीलकंठ सन सबैन ५०
१ पुंडलीक नाईक रास्ते अजमास ६०
१ गंगाधर नारायण इसने मयातैन १८
१ नारो रामचंद्र देवस्थळे खमस मयातैन १६
१ रावो मल्हार तिसा मयातैन ११

7017

१ गणपतराव माधवराव जाधवराई सन इसने सबैन ४९

१ सखाराम भगवंत याची स्त्री सन समानीन ४०

१ बालाजी लक्ष्मण आठवले सन सबा सितैन ५४

१ गोपाल बलाल बाव सन इसने मयातैन १९

१ रामचंद्र नारायण वाखंर अजमासे ५५

१ जगनाथ केशव बोक सन मयातैन २१

१ बलवंतराव नागनाथ अजमासे ५०

१ रामचंद्र व्यंकटेश खमस सितैन ५६

१ लक्ष्मण कृष्ण कोलटकर अजमास ६५

१ माधवराव गंगाधर तिसा खमसैन ६२

१ बालाजी केशव सन आर्बा समानीन ३७

१ लक्ष्मण हरि पारोलकर तिसा खमसैन ६२

१ नारायणराव यादव भागवत सबा सबैन ४४

१ रामचंद्र माहादेव नगरकर सन समानीन ४१

१ बाळाजी गोविंद बुंदले मासे ६५

१ माधवसेट तुलसीसेट अजमासे ६८

१ देवराव माहादेव हिंगणे अजमासे ६०

१ नारायण बाबूराव वैद्य समान सबैन ४२

१ नीलकंठराव गोविंद ०

१ नारायणराव आपाजी माहाराजाचें देणे १००

१ लक्ष्मण वामन बक्षी आजमासे ६०

१ माधवराव कृष्ण पानसी इहिदे सबैन ४९

१ यशवंत सखाराम पानसी इहिदे सबैन ४९

१ पुंडलीकराव गोपाल पानसी इहिदे सबैन ४९

१ अनंदराव जिवाजी सन खमस खमसैन ६७

५० खंडेराव राम वगैरे सन सबा सितैन ५४

7018

५१ मोरा चिंतामण वोकर (ओंकार) अजमासे ७०
५२ गोपाळ नारायण येकबोटे
५३ श्रीराम श्रीधर अजमासे ७०
५४ सदासिव दामोदर
५५ सदासिव रामचंद्र ग्वमस ग्वमसेन ६७
५६ गोविंदराव काळे ०
५७ कृष्णाजी माणकेश्वर व मल्हारजी १६
५८ कृष्णराव नारायण अजमासे ३५
५९ विनायक आबाजी अजमासे ४५
६० बाळाजी अनंत भिडे अजमासे ६५
६१ जनार्दन सिवराम
६२ भिकाजी बाबूराव अजमासे ७५
६३ भास्करराव यादव अजमासे ८५
६४ धोंडो नारायण

¶*This is a list of notable persons at the time of Bajirao II. The figures perhaps denote the period of the recognition of the families by Government.*

---

*No. 43*] [*20-5-1809*

**श्री**

**अखंडितलक्ष्मीआलकृत राजमान्य**

**राजश्री**

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार सुरु तिसा मयातैन व अलफ. पागा दिमत बाजीराव गोविंद याजकडे मौजे खेडद ताा नारायणगांव येथील अमल जार्तास व मौजे नारोडी ताा माहाळुंगे येथील अमल पागेचे बेगमीस होता, त्यास ते मृत्य पावले, सबब त्याजकडून दूर करून साल गुदस्त सनें समान मयातैना-पासून कमावीस तुम्हाकडे सांगितली असे. तरी इमानेइतबारें वर्तोन अमल चौक-सीनें करून जमाखर्चाचा अजमास आलाहिदा करून दिल्हा जाईल त्याप्रमाणें वर्तणूक करणे. व सन सबा मया तैन अखेर बाकी बाजीराव गोविंद याचे कारकी-र्दीची गावाकडे येणे असेल त्याची रुजुवात चौकसीनें करून घेऊन वसूल करून ऐवज सरकारांत पावता करणे जाणिजे छ ५ रबिलाखर.

¶*Bajirao Raghunath appoints (name not mentioned) to take charge of the assignment belonging to Bajirao Govind Barve who had recently died.*

7019

No. 44] [Before 9 February 1811

श्री

विशेष. इकडील वर्तमान डाकेचे वगैरे येत, त्याप्रो इा २९ जिल्हेज ताा छ १४ मोहरमपावेतो विनंतीपत्रे सेवेसी पाच पाठविली. ती प्रविष्ट होऊन वर्तमान निवेदन जाले किंवा विनंतीपत्रेच प्रविष्ट जाली नाहीत हे काहीच समजत नाही. त्यास मी आज्ञांकित. आज्ञेप्रमाणे वर्तनूक करून वरची कलवीत असावी, हा माझा धर्म. प्रथम छ २९ जिल्हेजी विनंतीपत्र पाठविले त्यात विनंती की, गुजरदरी व कालदरी येथे दाहा बारा हाज्या भिलाच्या नेहेमी राहून सरकारी माहलाचे गावास व मोगलाईतील गावास मनस्वी उपद्रव करून गुराच्या वोळत्या केल्या. त्याचा पाठीलाग ठाणेदार याणी केले. तसमई भिलानी गाईच्या कुच्या मारून भील निघाले. हार्टात गेले. याप्रा उपद्रव करितात म्हणून या प्रांतीचे व देव्या (?) प्रांतीचे गावकरी येथे येऊन सागू लागले. त्याजवरून भिलाकडे बोलावयास भले माणूस पाठविले की गावगना रयतेस उपद्रव न करित सरकार चरणी लक्ष ठेऊन वर्तनूक करावी हे चांगले. ऐसे बोलावयास पाठविले. त्यासी भिलानी उत्तर केले की, आम्ही वणराजे, आमचे प्रकर्ण निराळे, त्यात तुम्ही मन घालू नये. ऐसी कितेक प्रकारे उन्मतपणाची बोलणी बोलून, समेटाचा अर्थ दिसेना आणि रयतीस तो उपद्रव होतो. हा बोभाट हुजूर आल्यास मजकडेस माहाराज दोष ठेवितील की, त्याप्रांती असोन रयेतीचा बोभाट येतो हे काय? ऐसे जाणून भिलाविसीचा वाका सविस्तर पत्री लिहून स्वारी करितो म्हणून विनंती लिहिलीच होती. त्याप्रा भिलावर स्वारी करून तेथे लढाई होऊन से दोनसे भील मारले व से दोनसे कड्याखाली उड्या टाकून मेले. पाच सात नाईकहि मारले आणि सर्वाचा नाईक खंड्या यास दोन वार मजकडील नारवा ताकटे यानी करून तो धरून आणि त्यातील गुरे च्यार पाचसे व सेरडे से दोनसे व घोडी लाहानमोठी मिळून चवतीस आणिली. हेहि विनंती सेवेसी लिहून पाठविली. त्याजवर चत्रसिंग भोसले हे गुजराथेहून निघोन नागपुरास रघूजी भोसले याची विहीन घेऊन जात होती, त्याचा मुकाम लोहेनेर ठगाउ येथे होता हे बातमी समजली. यावर याजपासी दोन च्यार लोकाचा जमाव होता. तो युक्तीनें फोडून जिकडेतिकडे लाविला आणि त्यास भेटीस बोलाविले. मालेगावास आले तरी बराबर पंचवीस तीस घोडे व पनास माणूस बराबर होते. याची भेट घ्यावी तो त्याची चंचलवृति दिसो लागली. तैसेच ठेवावे तरी तो उठोन गेल्यास माहाराज काये म्हणतील हा आंदेशा मणात आणून त्यास आटकेत ठेऊन सेवेसी विनंती लिा. त्याजवर लस्करची वर्धी आली ती

व त्यातील माराचे पत्र यैसी च्यार पाच विनंतीपत्रे पाठविली ते प्रविष्ट होऊन आज्ञा येईल त्याप्रो पुढे वर्तनूक करीन. आज्ञेव्येरीज कोणतेहि करता येत नाही, आणि आज्ञा तो येकाहि पत्राची येत नाही. यास्तव आदेशा पडला की, माहाराजास पत्रेच प्रविष्ट जाली नाहीत. यास्तव हाली विनंती लिहिली आहे तरी पेशजीची विन(ती)पत्रे निवेदन जाली त्याचे उत्तर द्यावयास आज्ञा व्हावी अथवा मजकडील कारकुणास आज्ञा केली म्हणजे उत्तर लिहील. त्याप्रो पुढे वर्तनूक करीन. हाली इकडील मजकूर कितेक वारी मोठे आहेत ते निवेदन जाले पाहिजेत व रेवा उत्तरतीरास पेंढारी याजकडील खबर होती, ते दक्षणतीरास मुकाम करून आहेत. त्याचा जमावहि दाहा बारा हजारपर्यंत आहे.

¶*This is a news-letter reporting the disturbances of the Bhils in Khandesh and the movements of the Pindaris. A reference is also made to the capture of Chatrasing Bhonsle while going over to Nagpur from Gujarat.*

---

*No. 45]* *[9-2-1811*

श्री

चतरसिंग राजे यास ल १४ मिनहून बारा घटका रात्रीस धरले. तेसमई त्यास धरतेसमई गल्बल जाली, परंतु त्याचे गोटास चौकीहि शे दोनशे बसविली. मी चतरसिंगाजवल राहिलो. मंडली तिकडे होती. त्या गल्बलीत जागा जागा निराले निराले उतरले होते ते व पठाण वगैरे लोक होते. मात्र पाच पंचवीस घोडे व ते निघोन तेच वलेस गेले. याचा बंदोबस्त करावयास मी इकडे लागलो होतो. पा तो ते गल्बल होता तुटून दूर राहिले ते कोणास न समजता तिकडे मंडली ते गेले. वरकड पथकास समजू द्यावे तरी प्रसंगी गल्बल होऊन हास्तगत होईल न होईल या आदेशामुले सरकारचे लोक माझे निसबतीस आहेत ते घेऊन गेलो, आणि बापू मजकूर घर पथकचे लोक पाइद्ल हास्तगत केले. मजला ठेवावयाची आज्ञा जाली. ते नंतर सर्व मंडलीस सागोन चौकीपाहाऱ्याच बंदोबस्त केला. कारण दिवसाचा प्रसंग आसता आणि चतरसिंग याजवल पाच हजार फौज आसती तरी त्याची खातरजमा करितो, परंतु रात्रीमुले गल्बलीत निघोन गेले. माहाराजाची आज्ञा की जे सरकार आनकूल जाले आसतील ते खेरीजकरून बाकी मंडलीचा बंदोबस्त करावा. त्यास त्याजकडील कोन्ही आनकूल जाला नाही. [१]मजकडील लोकाची फोड करावयास लोहेनर रगोडे (?)

---

१ हा मजकूर मुळांत खोडला आहे. पत्र अत्यंत घाईनें व शोधपूर्वक लिहिले असल्यानें बरेच ठिकाणीं मजकूर विसंगतसा दिसतो.

येथील मुकामी गेला. त्याणे फौजची वगैरे दाव दाखविला. त्याच भयाणे ते उठोन गेले. मग चतरसिंग मडलीसुधा आला तो स्वामीचे पुन्यकरून कारस्थान होऊन हास्तगत जाला. माहाराजाचे प्रतापे सर्वाचा गर्व परिहार होऊन हस्त. सारे कारस्थान स्वाम चरणप्रतापे जाले. जे जाले ते स्वामीचे पुण्यप्रतापे जाले.

¶*Trimbakji Dengle reports to the Peshwa how Chatarsing Bhonsle was captured.*

---

*No. 46]* *[16 2-1811*

श्री

शेवेसी बालाजी लक्ष्मण व नायकूजी गुजर रामराम विज्ञापना येथील क्षेम ताा छ २१ मोहरमपावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण श्रीमंत माहाराजाचे नावाचा लाखोटा व आम्हास पत्र पो ते पावले. चतरसिंग राजे धरून केद केले हे वर्तमान पत्रात होते त्याजवरून माहाराजाचे नावाचा लाखोटा माहाराजास प्रविष्ट केला. माहाराजानी पत्र वाचून पाहून आपले नांव उतर लिहून लाखोटा करून दिल्हा आहे त्यात मजकूर लिहिला, की चतरसिंग भोसले बलवंतराव भोसले मुाा तुझे बरापुढे राहातो त्याचा बाप आहे किंवा दुसरा कोणी आहे खचित लिहून पाठवणे. स्वासा स्वारी कोपरगावास फाल्गुन मासी येईल, असा मजकूर लिहिला आहे. आम्ही येथे खातरजमा करून सांगितले की, बलवंतराव भोसला त्याचाच बाप आहे. दुसरा कोणी नाही. चतरसिंग भोसले खचित आहे. याप्राा त्रिंबकजीचे पत्रच आम्हास आले. नंतर माहाराज बोलले की, तुजला पत्र कसे आले ते दाखवावयास आण. त्याजवरून आमचे नावचे पत्रहि नेऊन दाखविले. ते वाचून पाहिले आणि बोलले की, जो आमचे पत्रात मजकूर तोच ह्या पत्रात मजकूर आहे. चतरसिंग असल्यास धरून कैद केला हे चांगलेच जाले, परंतु तोच खचित असे त्रिंबकजीचे उतर आले पाहिजे, याप्राा आज्ञा जाली. त्याजवरून आपणास लिा आहे. त्यास आपण माहाराजांस पत्र ल्याहावे त्यात मजकूर चतरसिंग भोसले बलवंतराव भोसले यांचे बाप आहेत व बलवंतराव भोसले यांची मातुश्री ती ह्याच चतरसिंग भोसले यांची बायको माझे बराजवळ आहे, यांत आंतर किमपि नाही, असे खातरजमेचे पत्र ल्याहावे म्हणजे येथे माहाराजाची खातरजमा होईल. स्वारीचा बेत तूर्त सिवरात्रीस जाण्याचा राहिला आहे. बरकड सविस्तर मजकूर राजश्री सदासिवपंत भाऊ व हरिपंत आबाचे पत्री लिहिला आहे, त्याजवरून ध्यानास येईल. येवजाच्या वराता * * *

¶*The writers Balaji Lakshman and Naykuji Gujar communicate to the Peshwa the news of the capture of Chatarsing Bhonsle and ask the addressee to convince the Peshwa that the captured person is Chatarsing, father of Balwantrao Bhonsle.*

No. 47] [23-2-1811

श्री

विशप. स्वामींनी आज्ञापत्रें छ २९ जिल्हेजचें व छ २१ माहे मिनहूचीं तीन येकूण च्यार पाठविलीं तीं छ २८ मिनहूस पावोन सिरसा वंद्य करून परम संतोष जाहाला. पत्री आज्ञा कीं, मकरसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते आत्यादरें सिरसा वंदून भक्षिले व चतरसिंग भोसले व त्याचे बराबरच्या आसाम्या कैद केल्या, त्याचे पायात बेड्या घालून पक्या बंदोबस्तानें मालेगावचे किल्यात येकाची येकास भेट न होऊ देता तुम्ही आपल्या जिमेस ठेवणें. चतरसिंग त्रिंबकजी भोसले वाबीकर याचे पुत्र व बळवंतराव भोसले पुण्यात तुमचे घरासमोर आहेत त्याचे बाप व सातारियाचे पहिले राजे होते त्याचे भाऊ, तेच जर सापडले आसले तर तुम्ही ही चाकरी आमच्या मर्जीस खूप करावयाजोगी केली. जर हे चतरसिंग ते नसले आणि दुसरे बंडवाले आसले तरी बंड मोडले इतकाच संतोस, तर हा मजकूर सविस्तर लिहून पाठवणें. ग्यासा स्वारी फाल्गुनचे सुमारे त्या प्रांती येणार आहे. तेथे तुमची हुजुरात भेट जाहाल्यावर जसें ठरण्यांत येईल तसे येविशी केले जाईल व चतरसिंग याचे लस्करात फितूर करून त्यास मंडळीसुध्धा कैद केले, त्यास त्यांजकडील सरदार व स्वार व गाडदी जे सरकारात आनकूल जाले आसतील ते खेरीजकरून बाकी त्याचे सोबतीचे सरदार व स्वार व गाडदी यांची जफ्ती करून गोट लुटून घेऊन जे काय सापडेल ते सरकारात जमेस करून यादी लिहून हुजूर पाठवणें; व तुम्हाबराबर सरकारची फौज आहे त्यापैकी सिलेदार दिमत हाय

असामी

२२४ दिा जनार्दन नारायण
१४८ दिा विनायक वासुदेव निा बापू गोखले
८७ दिा बाजीराव पाटणकर
७४ आनंदराव बाबर खुद पथकसुध्धा
१४ आबाजी माहादेव खुद पथकसुधा
१७ दिा गंगाधरपंत कानडे

---

५६४

येकूण पाचशें चौसष्ट असामी सिलेदार यास हुजूर पाठऊन देणें. पुण्याचे मुकामी आथवा जेथे स्वारी आसेल तेथे त्याणी बातमी राखून येऊन पोहंचावें. ग्यासा स्वारी माघ मासात पुण्यातून निघत नाही. फाल्गुनात कोपरगावाकडे जावें आसा विच्यार आहे. याजकरिता सदरहू स्वारास माहे मोहरम ऊर्फ माघ

मासचा रोजमरा देऊन पाठविल्यास तैसेच लिहून पाठवणे. तेथें रोजमरा न देता पाठविले तर तैसेच लिहिणे म्हणजे हुजूर दिल्या जाईल म्हणोन च्यारी आज्ञा पत्रात मजकूर. त्यास चेतरसिंग भोसले हे कैलासवासी माहाराज याचे बधु. माईसाहेबाचे दीर. बलवंतराव भोसले माझे वाड्यासमोर पुण्यात राहतात त्याचे बाप, त्रिमकजी भोसले वावीकर याचे पुत्र, हेच जाणून केद करून सेवेसी विनती लिहिली. दुसरे बंदवाले नाहीत. याची स्त्री माझे जिमेस आहे तेच हे. याज-बराबर मंडली आहे. त्याची नावनिसी विता :—

११ मंडली

१ रघुनाथराव गुजर
१ आपाजी इंगले
१ बापू फडणीस
१ गोपालराव न्यायाधीश व बक्षीगिरी
३ आपाभट पुणतांबेकर त्रिवर्गबंधू पोतनिसी व पोतदारीचे काम
१ बाबाजी केशव पाडलीकर बापू फडनिसाचे हाताखाली लिहिण्याचे कामास
१ लाडखान जमादार
१ बापू जगथाप हवालदार
१ रघुनाथराव गुजर याचा लेकवला उा वर्ष ९

११
१ जामदार कुसाजी
१ महादू मडक्या खिजमतगार

१३

सदरहू मंडलीसुध्धा केद करून किरकोल सिबंदी कामगार माणसे होती त्याजवल झाडे घेऊन चोकशी करून लाऊन दिल्ही. तेच समई मारनिले जवल घोडी थोर रास १२, तटे सिंगरे रास १७ व रोही १ येकूण तीस व उट नफर दोन आहेत त्याचा तपसील क १९ मिनहूस विनंतीपत्री लिहिला आहे. वरकड चीजवस्त वस्त्रे त्याचे आंगावर व बिछाने मात्र आहेत ते त्याजवलच आहेत.

¶*The writer probably Trimbakji Dengle gives to the Peshwa the identification of Chatursing Bhonsle captured by him. "He is the same Chatursing," says he, "who is the brother of the late Chhatrapati and the father of Balwantrao Bhonsle living at Poona." The writer confiscates his baggage and enumerates the persons arrested.*

No. 48] [February 1811

मजला सरकारातून पथक ठेवावयाची आज्ञा जाली होती, ते वर पथकाचे स्वार व पायदल मी बराबर घेऊन चतरसिंग हस्तगत त्याचे मंडली सुधा केला. नंतर चौकी पाहाऱ्याचा बंदोबस्त कर्नेसमंई समजले की, पठाण वगैरे लोक वेगलाले उतरले होते ते निघोन गेले. त्याजवलहि लाहान मोठी घोम पचवीस घोडी होती. वरकड पथकास समजू द्यावे तरी बद्दा होईल याजमुळे हस्तगत होई तोपावेतो कोणास समजू दिल्हे नाही. जे जाले ते स्वामि पुण्यप्रतापे जाले.

¶The writer reports how Chatarsing Bhonsle was captured.

---

No. 49] [March 1811

श्री

सदरहू स्वारास गाजमरा देऊन कबज घेऊन माहाराजाचे स्वारीची बातमी ठेऊन स्वारी जेथे आसेल तथे पोहचावे म्हणून पथकास ताकीद केली आहे. छ मजकुरी निघाले. सत्वरच येऊन पोहचतील. सांप्रत पेंढारी याची खबर रेवा उतरणारास होती, ते रेवा उतरोन ब-हानपूर जैनाबाद येथे मुकामास आली आहे. जमाव सात आठ हजार आहे म्हणून छ २६ मिनहूस बातमी आली आहे. पुढे कोणीकडे जातील ते बातमी आल्यावर सेवेसी विनंती लिहीन. घरी मुलीचे लग्न. स्वारी कोपरगावी येणार म्हणून फाल्गुन शुा ९ नवमीचा निछय केला होता. परंतु स्वारी आली नाही व इकडे पेंढारी याची आवई यामुले, तव्हा नवमीची तिथि रहीत जाली. आता वद्य ५ पंचमीची तिथि आहे. इतक्यात स्वारी आल्यास उतमच आहे. नाही तरी आज्ञा आली तरी इकडील बंदोबस्त ठेऊन वाा पंचमीस लग्नास च्यार दिवसाचे अवसराणे इकडील बातमी पेंढाऱ्याची निवल आली तरी निवगावास जाऊन कार्यसिध्धि करीन. याउपरी आज्ञा येईल तैसे करीन.

चतरसिंग भोसले याजबराबर चीजवस्त किरकोल वस्तभाव आहे, त्याची याद आलाहिदा त्याचे कारकुनाचे विद्यमाने पाा आहे. हे बंड, जे उत्पन्न करावे ते यार्णी बराबरचे मंडलीसुध्धा खावे, कोठे पोशाग कोठे काही इकडे मेलवावे, इकडे खावे. याची नजर दुसऱ्याचे पागोट्यावर, तव्हा याजवल दौलत ती कशाची? बंडपण मात्र करून पोट भरावे हीच दौल(त) याची. घोडी बसावयाची मात्र ताजी हुशार नामी दोनतीन चांगली खासी आहेत. बाकी राबती घोडी व तटे आहेत. मी स्वामिचरणारविंदी लक्ष ठेऊन वागतो हे (अपूर्ण)

¶This is Trimbakji Dengle's letter to Bajirao informing him of the capture of Chatursing Bhonsle and describes how Chatarsing used to secure his livelihood.

7025

No. 50] [28-4-1811 ?

पुरवणी ग्वालेर

१ होळकरांकडून पत्रें आलीं, त्यांत मजकूर आमचे फौजेंत बखेडा आहे. बंदोबस्त करण्यायोग्य मनुष्य नाहीं. त्यांत मीरखानही येत आहे. तो आल्यावर बखेडा अधिकच होईल. कपुरखां रुसून गेला तो त्याचा आप्त, याजकरितां आमचे दौलतीचा बंदोबस्त करण्याचा अधिकार आपल्याकडे आहे. त्यापेक्षां शाहाणा कारभारी पाठऊन बंदोबस्त राखावा म्हणोन, त्याजवरून शिंदे याणीं मीरखांस पत्र पाठविलें कीं तुम्ही आहा तेथें असावें. तुम्ही आल्यानें संशय उत्पन होऊन बखेडा होईल, याजकरितां तेथेंच असावें, असें पाठऊन आत्माराम शिवराम वाकडे यास होळकरांकडे पाठवावयाचें बोलण्यांत आलें आहे.

१ हतरसवाले व इंग्रज याचा तह होऊन येक गोरा व दोन कंपणी इग्रजां-कडील ठेवण्याचा करार ठरला आहे.

१ मंदोसरकर कमाविसदार याचें पत्र आलें, त्यांत मजकूर, तुळसाबाई होळकर कडील पत्र आलें की आम्हास मंदोसरास घेऊन जावें. त्याजवरून च्यारशें स्वार रवाना केले, आणि विनंतीपत्र लिहिलें आहे, तरी उत्तर येईल त्याप्रमाणें बाईस येथें आणवयाचें करूं.

नागपूर

१ श्रीधरपंत बापू याची स्त्री निवर्तली. सर्व कार्शीत, श्रीमंत रावसाहेब याणीं आग्रह करून लग्न करविलें. आधीं सडे कार्शीत राहून म्हटलें दरोबस्त नागपुरास रा केलें.

१ रावसाहेब चित्रकोटास येऊन राहिले. तो माहाल त्याचे सरंजामास खर्चाकडे लाऊन दिल्हा.

१ मुधोजी भोंसले यास छ ४ रविलाखरीं लग्नाची हळद लागली.

बाळाजीपंत वाव मुकाम नाशीक. पुलावरील वाड्याचे दोन मजला गिलावा सफेदी सुद्धां इमारत तयार जाली. वर छयावणी करावयाची. चैत्र मासीं पर्जन्य पडतो, याजकरितां स्वारी येथें आल्यावर समक्ष पाहाण्यांत येऊन आज्ञा होईल तसें करावें, म्हणोन वाट पाहिली. हालीं पर्जन्य समीप आला. काम भिजलें असतां खराब होईल. येविशीची आज्ञा येईल तसें करीन. माझे बुद्धीस सुचलें तसें नकाशे लेहून पाठविले आहेत म्हणोन.

7026

## मुंबई

१ जैयपूरकर याजकडून वकील दिल्लीस गेले होते, त्याणीं इंग्रजाचे मार्फतीनें कलकत्यास लेहून पाठविलें, कीं दरसाल तुम्हास देनगी देत जाऊं. तुम्हीं आमचा पुस्तपना राखावा. या कामाबद्दल दोन वकील दिल्लीहून मथुरेस आले आहेत. उत्तर यावयाची वाट पाहत आहेत.

१ जोतपूरकर यांणीं मीरखान यास दोन लाख रुपये देऊन फौज सुद्धां त्यास सरहद आपली पार करून लाऊन दिल्याची अकबार आली म्हणून.

१ दौलतराव शिंदे व जोतपूर व जैयपूर त्रिवर्ग येकत्र होऊन आपली येखलासी[१] करून घेतली; आणि ममलत योजिली आहे कीं ज्याजपासून आपल्यास उपद्रव होईल त्याचें पारपत्य त्रिवर्ग मिळोन करूं. म्हणोन आकबार.

### लष्कर होळकर

१ पलटणें व कपुरखां चंदवशापलीकडे दोन कोशावर मुकाम आहे. चंदवशापासून आठ हजार रुपये खंडणी घेतली, व गंगराडचे किल्यांतील चीजवस्त व दरोबस्त गांव लुटून फना केला. दोन अडीच लाख रुपयाची लूट जाली. लष्करांत मेवाती व पुर्बे याची चौकशी करून राहूं देत नाहींत.

१ मीरखांकडे पत्रें रवाना केलीं. गणेश कृष्ण मुजरा केला. शाखभाजी पाठविली.

१ राजे जयसिंग सोपारवाले याणीं कोटेवाल्याकडील दाहावीस गांव लुटिले.

१ मीरखांची व जैपुरकराचे सरदाराची लढाई जाली. जयपुरकराचीं दोन मोठीं माणसें कामास आलीं. मीरखांचे फौजेनें शिकस्त खाली. राजे जगतसिंग जैपूरकर कांहीं नमस्त व गादीवर बसत नव्हते, सा हालीं बसूं लागले.

१ मीरखां याजकडून पत्रें आलीं जे इकडील प्रांताचा बंदोबस्त करून पंधरा विसां दिवसांत मी येतों म्हणून.

१ आंतरवेदींत भरतपुरापलीकडे हतरस संस्थान दयाराम जाट यांचें आहे, तेथें त्याचा याचा विवाड होऊन इंग्रजाची पलटणें येऊन लढाई सुरू आहे.

१ लाला ख्यालीलाल व येक कारकून व दोन हलकारे जोड्या मीरखान याजकडे बोलण्या(स) रवाना केले.

¶*This is a summary of many news-letters received from several quarters concerning the activities of the English in northern India, and the affairs of Holkar, Sindia and the Bhonsle of Nagpur.*

---

१ स्नेह.

7027

No. 51] [22-8-1811

श्री

श्रीमंत माहाराज राजेश्री बाबासाहेब
साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक रूपचंद नाईक व भवानजी नाईक सुतार निा सरकार विज्ञापना. सरकारवाडा पेठ बुधवार शहर पुणें येथे पश्चमेकडील सोपा दुघई व पुढे आडीच गजाची पडवी अथवा सोप्याबराबर दुमजला जसी सरकारची आज्ञा होईल तसे खण सुमारी ९ नऊ व चांपखण दाही (दोही?) बाजूचे दोन येकूण अकरा खण व उतरेकडील सोप्याचे चालीचे खण च्यार येकघई व पुढे पडवी अडीच गजाची अथवा सोप्याबरावर दुमजला येविसी सरकार आज्ञा होईल त्याप्रमाणे, याचे काम खांब सुरूदार महरापासुधां व भिंतीचे आंगचे खांब चौरस लाकूड सागवानी चांगले निकोप लाल उतम नामी विश्रामबागचे दिवाणखान्याचे मासल्याप्रमाणे व चुना मसाला व विटा पक्या लाल चांगल्या उतम लाऊन ह्यापासून साडेसाहा महिन्यात काम तयार करून द्यावयाचा आम्ही उभयतांनीं करार करून मक्ता कबूल केला. रुपये २२००० मदरहू बेवीस हजार रुपये मक्त्याचे स्वामीनी रा त्रिंबकजी डेंगले याजकडून देविले ते भरून पावलो. वर लिहिल्याप्रमाणें साडेसाहा महिन्यात काम उतम चांगले तैयार करून देऊ. मिति शके १७३३ प्रज्यापति नाम सवछरे भाद्रपद शुा ३ गुरुवासरे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. हास्तआक्षर खुद भवानजी नाईक.

¶*Contract-bond passed by Rupchand and Bhawanji Naik Sutar for constructing the Budhwar Palace in Poona at an estimate of Rs. 22,000—the work to be finished within 6½ months.*

---

No. 52] [13-7-1812

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री भाऊ व हरिपंत आबा स्वामीचे सेवेसी

पोा बाळाजी लक्ष्मण सां ना विा विा. सासवडचे मुकामी श्रीमंत महाराज याणी आज्ञा केली की आंबे खरदी करून पंढरपुरास आणावयाचे खर्चाबदल रुो २००० दोन हजार चांदवड राजश्री विठल नारायण लिमये यांचे हवाली करावे म्हणोन, त्यावरून तुम्हास लिहो आहे. तरी पत्र पावताच विठल नारायण लिमये याचे हवाली सदरहू आज्ञेप्रो दोन हजार रुा करून पावती जलद

पाठऊन द्यावी. पंढरपुरास आंबे आषाढ शुा येकादसीस येऊन पोहोचले पाहिजेत. सरकारचा शब्द न लागे असे करावे. सारांश श्री पत्रदर्शनी बक्षीसचे हवाली करून पावती पाा म्हणजे आपल्याकडेस दोष नाही. यैवज बिनदिकत द्यावा. राा छ ३ रजब सुरु सलास अशर मुा सासवड. बहुत काय लिा लोभ करावा हे विनंति.

¶*Bajirao II intended to distribute to the pilgrims at Pandharpur mangoes worth Rs. 2,000 on the auspicious day of the Ashadhi Ekadashi. The above letter from Balaji Lakshman Salkade issues the order for execution.*

---

*No. 53]* *[1-9-1812 ?*

**श्रीगजानन**

**राजश्री सदासिवपंत व**

**हरि भगवंत गोसावी यांसी**

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री त्रिंबकजी पाा डेंगले रामराम विनंती. उपरी, रुप्याची झरझरी व चिलीम व तोटी व नेच्यां+ कलाबतूचा घरचे जामदारखान्यात राा हैबती जामदार याजवळ आहे ते सरंजाममुधा पत्र पावताच कोपरगावचे मुकामी मुजरद सिपायाबराबर देऊन पाठऊन देणे. येक क्षणाचा विलंब करू नये. नेच्या झरझरी चिलीम तोटीसुधा रातोरात येऊन पोहोचे असे सिपायास निक्षूण ताकीद करावी. व पाा बारागाव नांदूर येथील कुरणात व रानात घोडनदीवरील इंग्रजाचे बारातील उदिमी यांचे व गवलीयांचे गुरे पाचसाहा हजार आज दोन महिने चारणी करून आहेत. कुणब्याचे ऐकत नाहीत. कुणब्यास मारहाण करितात. साा गावकरी आम्हाजवल आले. त्यांचे म्हणणे की, आमच्याने राहावत नाही. गाव उज्याड करून जातो. इंग्रजाचा उपद्रव मोठा याजकरिता लिा आहे. तरी राजश्री भाऊसाहेब व मोदी यांचे कानावर घालून चगदा पाठऊन द्यावी. येविसी पेशजी उरळीचे मुा तुम्हास सांगितले असता तुम्ही आलस करून चगदी पाठविली नाही. त्यास नुकसान जाले ते आमचे जाले. तुम्हास कालजी कशास आसावी? तरी आता चगदी आधी आधी पाठऊन देणे. पारगावचे कुरणास उपद्रव होत असल्यास तेथीलहि बंदोबस्त ठेवावा. राा छ २४ साबान. बहुत काये लिा हे विनंती.

¶*Trimbakji Dengle writes to Sadashiv Pant, requesting among other matters that the hukka be sent at once to Kopargaon.*

+ The pipe of a hukka.

No. 54] [6-2-1813

श्री

श्रीमंत राजश्री त्रिंबकजी पा तात्या डेंगले साहेबाचे शेवेसी

ऽ आज्ञाधारक मल्हारराव भोसले रामराम विनंती विज्ञापना. ता माघ शुा ६ शनिवारपावेतो साहेबाचे कृपावलोकणेकरोण येथास्थित असो विशेष. काल बसंतपंचमीस विश्रामबागेत स्वारी श्रीमंत बाबासाहेब आले होते. केसरी रंग जाला होता. शास्त्री पुराणिक याची बैठक भोजनउत्तर होऊन सायंकाली मागील च्यार घटका दिवस राहताणी ग्रहस्त लोक व मानकरी वगैरे याची बैठक जाली. नाचकलावंतणी व्यंकटनरसी होती. दुसरे शेनवारचे वाड्यात श्रीमंत आपासाहेब याणी रंग करूण चार लोक वगैरे त्या मंडळातील जितके होते तितक्यास रंग जाला. आज शनवारी पाषाणास स्वारी जाणार या करिता शुकुरवारचे वाड्यापासून बेलबागेपरियंत स्वार व लोक दोन अडीच प्रहर परीत उभे होत. नंतर स्वारी विश्रामबागेत आली ती सायंकाळ परीत तेथेच आहे. पुढे होईल ते लिहून कळऊ. थोरल्या वाड्यातील लोकाची हजरी होऊन रोजमरे आज काहीं जाले. राहेल्याचे उदईक होणार. सेन्याचा तपसील—

१ बारगीर लोक याचा दर ७ प्रो

१ पायेदल मराठे दर ६ प्रो

१ कानडे व परदेसी दर ७ व सा प्रो

येकूण सदरहू प्रो आले. मुसलमानाचे रोजमरे उदईक होणार त्याचा शेरा पडेल तो लिहून पाठऊ. याप्रमाणे साहेबास श्रुत होये. रात्री गस्तीस आबाजी पा व आम्ही आसतो. चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त आपले आज्ञेप्रो आहे. रात्री हजरीस रावजी बापट असतात. साहेबास कलावे बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶[*Malharrao Bhonsle informs Trimbakji Dengle how the Peshwa and his brother celebrated the Vasantpanchmi. This may be taken as a specimen of Bajirao's manner of life.*

---

No. 55] [24-4-1813

सरदार अलीशान खुदावंद न्यामत हनगवल

मोईष्टवारीट इलपिसतनसाहेब बाहादुर याम

मकबलहुर

अर्जदास्त फिदवी बापूजी सदासिव आदाब तसलिमात बज्या आऊरदे मारुज मे रसानद दिगर आकी. यथील खैरसला आमंदार देवडी श्रीमन्माहाराज राजश्री छत्रपति बाहादुर याची स्वारी मुा करवीर छ २४ इप्रल सन १८१३ इसवी मुताबिक छ २२ रबिलाखर सन १२५८ हिजरी रोज शनवारी सुक्रवारी दोन

7030

घटिका दिवस राहिला तेव्हां श्रीमंत सिवाजी माहाराज यास देवआज्ञा जाली. तेव्हां कारभारी व लोक वगैरे याणी शोक केला. रत्नाकर आपा व रायाजी जाधव व नारायणराव पाटणकर, हैबतराव गाइकवाड, व श्रीगुरुमाहाराज याणी विच्यार करून श्रीमन्माहाराज संभाजी माहाराज छत्रपति याची दुराई गावांत फिरविली आणि श्रीभाऊमहाराज यास व दिनकरराव गाइकवाड यास पत्रे पुण्यास व खलिता येक सांडणीस्वाराबराबर रातोरात्र पुण्यास रवाना केला. किले पन्हाला व पावनगड व प्रसिध्धगड वगैरे ठाणियास पत्रे माहाराजाचे नावे रवाना जाली. दोन घटिका दिवस राहिला, तेव्हा दरवाजे बंद करून परवानगीखेरीज कोण्ही माणूस गावात घेतले नाहीं व बाहेरील गावात येऊ देत नाहीं. प्रहर रात्री कृष्णरावजी यास जाहले वर्तमान सांगितले. नंतर कृष्णरावजी निरोप घेऊन गेले. च्यार प्रहर रात्र ज्यागरण सर्वत्रानी केले. शंकरराव सिंदे सेनाखासकील तोरगलकर व चिंतामणराव आपा व सरस्वतीबाई पटवरधन यास पत्रे रात्रीं रवाना केली. नंतर सूर्य उदय होऊन नंतर सिवाजी माहाराज यास पालखीत घालून वस्त्रें सिरपाव बांधून समारंभानिसी घेऊन निघाले. समागम हैबतराव गाईकवाड व रत्नाकरपंत आपा व रायाजी जाधव वगैरे लोक होते. वाड्यात श्रीमंत बाइसाहेबा-जवळ नारायणराव पाटणकर व नारायणराव पंडित दोघे राहिले व रामचंद्र जोसी-राव पंचगंगातीरी संभाजीमाहाराजाचे देवलाचे दक्षणभागी सार्थे(क) केला. श्रीमन्माहाराज छत्रपति व बाबासाहेब उभयतास घेऊन गेले. सार्थक बाबासाहेब भोसले खानवटकर याणी केले. दोड प्रहरी सार्थक होऊन स्नाने केली. नंतर दोन प्रहरी माहाराज मंडलीसहवर्तमान वाड्यांत आले. नंतर भोजन करून आराम केला. रत्नाकरपंत आपा व नारायणराव पाटणकर तिसरे प्रहरी पुन्हा पंचगंगातीरी सार्थक केले त्याचा समाचारास गेले. रात्रीं ज्यागरण जाहाले यामुळे वाड्यात कोण्ही फारसे आले नाहीत. च्यार घटिका दिवस राहिला, तेव्हा माहाराज जागे होऊन वाड्यात श्रीमंत बाईसाहेब याजकडे उभयता गेले. रायाजी जाधव सरनोबत वाड्यात आले व नारायणराव पंडित वाड्यात आहेत. श्रीमंत बाईसाहेब याजकडे समाधानार्थ कोण्ही येतात तो शोक ऐकवत नाही. रत्नाकरपंत आपा व नारायणराव पाटणकर अस्तमानी वाड्यात आले. च्यार घटिका रात्रपर्यंत राहून चौकीपाहाऱ्याचा बंदोबस्त करून नंतर आपले घरास गेले. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*Bapuji Sadashiv sends to Elphinstone a report of the death and funeral of Shivaji, Raja of Kolhapur on 23rd April 1813.*

१ वाड यांनीं करविलेल्या नकलेची नक्कल. मूळ नकलेवर 'कर्नाटक रुमाल नंबर ९६७' व 'तपासले १९-६-९७' असे दोन शेरे आहेत.

*No. 56*] [*4-5-1813*

पैवस्ती छ २१ जमादिलाखर जेष्ट सन आर्बा मुकाम पुणें.

श्री

सेवेसी विनंती. सेवक रघुनाथ रणछोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ४ माहे जमादिलाखरपावेतों स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान येथास्थित आहे विशेष. बंदर मजकूरचे अखबारीची दोन च्यार विनंतिपत्रें राजश्री लक्ष्मण गोविंद याजकडून जासूद सेवेसीं पत्रें घेऊन जात असतां त्याजसमागमें पाठविलीं तीं पोहचली न पोहचलीं याचें सेवकास समजलें नाहीं. पत्रांत मजकूर राजकारणी यास्तव मध्यें गल्लत न व्हावी म्हणोन विनंती लिहिली आहे. शेवेसीं पत्रें किती पावलीं याची आज्ञा आली पाहिजे. आलीकडे विलायेथेहून इंग्रेजास पत्रें आलीं आहेत, त्यांत बातमी आहे कीं पेसजीं रुशान व फरासेन याची लढाई जाहली होती ; ते समई रुशान याचे फौजेचे मोड जाहाली. आलीकडे बातमी कीं फरासेन याच्या फौजा त्याचे मुलकांतून रुपन याजवर येतां मार्ग चुकले, ते वेलेस प्रातःकालचें बर्फहि पडलें होतें. ती संध रुशान याणी पाहून त्यांचे अंगावर फौजा पाठऊन तुंबळ लढाई केली. तेथें फरासेन याचे फौजेची मोड जाहाली म्हणोन वर्तमान आहे. दुसरा मजकूर करवीरकर माहाराज यांचा किला भरतगड म्हणोन मालवणानजीक आहे. तो वाडीकर सावत याणी नवीन घेतला, तें वर्तमान माहाराज याणी इंग्रेज यासी सांगताच येक पलटण तेथें रवाना करोन रेडी व भरतगड वरचेवर सही करोन ठाणे घेतले म्हणोन बातमी आहे. व विलायेथेहून पांच तरांडी माल भरोन बंदर मजकुरीं दाखल जाहालींत. त्यामधें विलायेथी जिनस तोफागो वगैरा बहुत आला आहे. साहेबाचे सेवेसीं निवेदन व्हावें. याजवर बातमी निघाली म्हणजे सेवेसीं विनंति लिहून पाठवितों. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghunath Ranchod reports to the Peshwa from Bombay that the ruler of Kolhapur obtained the aid of the English and recovered the fort of Bharatgad from the Sawant of Wadi. The writer also gives news received in Bombay of a severe battle having been fought between the French and the Russians in which the former were defeated.*

*No. 57]* *[29-7-1813*

पैवस्ती छ ३० रजब सन आर्बा
श्रावण

श्री

साहेब साहेबांचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एल्फिन्स्टन वकील दिंमत इंग्रेज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

छ ९ रजबची, येरहोड्याचे मुक्कामिहून दोन पलटणें व घोड्याच्या तोफा दोन, टोपकर मंडळी सुद्धां प्रात:काळीं निघोन खडकीचे पुलानें लांकडी पुलावरून शहरांतून बुधवारांतील सरकारवाड्याजवळोन भवानीपेठेचे रस्त्यानें घाशीरामाचे तळ्याजवळ जाऊन उभीं राहिलीं. तेथें बंदुकांत बार भरून तोफेचे संदुकाचीं कुलपें काढून संदुका मोकळ्या केल्या. तोफेंत बार भरले नाहींत. गारपीरचे लष्करांतील दोन पलटणें तयार जाहालीं होतीं, तीं चार तोफा सुद्धां निघालीं. एकूण च्यार पलटणें सहा तोफांसुद्धां बराबर निघोन वानवडीनजीक निपाणीकर यांचे फौजेलगत जाऊन वेगळालीं मुक्काम करून राहिलीं आहेत. बापूजी गोपाळ सानें येऊन, मशारनिल्हेशीं दोन घटका बोलणें करून मोधीकडे येऊन गेले. करवीरकरांकडील मोरोपंत चिटणीस व श्वरूपजी हुजरा तिसरे प्रहरीं येऊन मशारनिल्हेशीं एक प्रहर बोलणें केलें. कांहीं कागदपत्र बराबर आणिले होते ते मशारनिल्हेस वाचून दाखवून बाहेर येऊन बसले. कपतान क्लोज बोलण्यांत होते. मागून निपाणीकर यांजकडील आपाजी लक्ष्मण व लिंगोपंत सायंकाळीं आले. मशारनिल्हेशीं व कपतान क्लोज यांशीं च्यार घटका बोलणें करून दोन घटका रात्रींस गेले. नंतर करवीरकराकडील कारकून गेले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व बऱ्हाणपुरचीं पत्रें डाकेबराबर आलीं. जाब रवाना जाले. खुसरवजी मोधी कोणाचेंही बोलण्यांत नव्हते. आंगरेयाजकडील बापूभट सोमण येऊन दोन आननस मशारनिल्हेकडे पावते करून गेले. गांठ पडली नाहीं. हरि चिंतामण दीक्षित येऊन माणीक जमादार यांसीं बोलून गेले. मुंबईहून एक पलटण गोऱ्याचें व शिरुरनजीकचे लष्करातून एक पलटण एकूण दोन पलटणें आणवी येणार म्हणून बातमी आहे.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Bayaji Naik, Bajirao's informant, gives an account of the military postings of the English at Poona. The names of the persons who interviewed Elphinstone and the several affairs executed by him are also mentioned.*

No. 58] [29-7-1813

पैवस्ती छ ३० रजब
श्रावण सन आर्बा

श्री

साहेब साहेबांचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एल्‌फिन्स्टन् वकील दिंमत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

१ छ ६ रजबचें वर्तमान. नागपुरकर भोंसले यांजकडील गणपतराव येऊन मशारनिल्हेशीं दोन घटका बोलून गेले. बापूजी गोपाळ साने येऊन मशारनिल्हेशीं दोन घटका बोलणें करून गेले. करवीरकराकडील श्वरूपजी हुजरा येऊन कपतान क्लोज यांशीं बोलून गेला. बाळाजीपंत पंडसे यांजकडील भगवंतपंत येऊन मोधीसी बोलून गेले. जानराव नाईक निंबाळकर यांस मशारनिल्हेनीं पत्र लिहून थैली तयार केली. ती मोधी यांणीं प्रभाकरपंत जोशी यांचे हवालीं करून निंबाळकर यांस पावती करावयास सांगितलें. त्याजवरून थैली घेऊन प्रभाकरपंत गेले. निपाणीकर यांस मशारनिल्हेनीं पत्र लिहून थैली तयार करून जासुदाबरोबर त्यांचे लष्करांत पाठविली. मीर इभराम दिंमत गोविंदबक्ष यांणीं च्यार डाल्या भरून आंबे व दोन आननस कारकुनाबरोबर पाठविले, ते मशारनिल्हेस पावते करून कारकून गेला. आंग्रे यांजकडील बापूभट सोमण येऊन दोन आननस मशारनिल्हेकडे पावते करून गेले. गांठ पडली नाहीं. श्रीमंत राजश्री आपासाहेब यांजकडील चिंतोपंत जोशी व महंमद हुसेन आली येऊन माघारे गेले. मशारनिल्हेची गांठ पडली नाहीं. कपतान फोर्ट+ यांणीं सरकारी पलटणाचे भरतीस हिंदुस्थानांतून लोक आणविले होते, ते तीन च्यारशें आसामी बाळापूर आकोल्याचे मुक्कामी आले, तेथें आकोलेकर गांवकरी याणीं कजिया करून मारामार केली. सबब भरतीचे लोकांपैकीं सात आसामी जखमी जाले म्हणोन डाकेबराबर कपतान यांजकडे वर्तमान आलें. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व बऱ्हाणपुरचीं पत्रें डाकबराबर आलीं, जाब रवाना जाले. कपतान बिली बिबीमुद्धां व दुसरा एक टोपकर छ ५ मिनहूस सायंकाळीं निघाले, ते थोरला सरकारवाडा डावा घेऊन बुधवारांतील, व शुक्रवारचा सरकारवाडा पाहून हिराबागेंतून श्रीपर्वतीस गेले. देवळाबाहेरून चहूंकडे पाहून ठिकाणास आले. त्रिंबकजी डेंगळे यांजकडील प्यादा परवानगीत बरोबर होता.

+ Ford.

7034

१ छ ७ रजबचें वर्तमान. मशारनिल्हे प्रात:काळीं गणेशखिंडीपावेतों जाऊन सहल करून आले. खुसरवजी मोधी प्रात:काळीं थोरले सरकारवाड्यांत आले. दिवाणखान्याचे पश्चिमेकडील खोलींत बिछाईत होती, तेथें श्रीमंत राजेश्री आपासाहेब यांसीं एक घटका बोलणें केलें. जेठाबा व विनायकपंत सबनीस व रामचंद्रपंत पेंडसे ऐसे बोलण्यांत होते. आपासाहेब यांणीं मोधीस विडे दिल्हे. नंतर मोधी वाड्यांतून निघोन राजश्री सदाशिवपंत भाऊ यांजकडे बुधवारांतील गजऱ्याचे वाड्यांत आले. च्यार घटका भाऊशीं बोलणें करून निघाले. ते घरींहून बंगल्यांत आले. हरमोजीशेट दोन प्रहर दिवसास राजश्री भाऊ याजकडे गजऱ्याचे वाड्यांत जाऊन दोन घटका बोलणें करून बंगल्यांत आले. मल्हार रेणुराव व आनंदराव मल्हार बोलण्यांत होते. करवीरकरांकडील श्वरूपजी हुजरा येऊन मशारनिल्हेसीं बोलून गेला. निपाणीकर यांजकडील आपाजी लक्ष्मण व लिंगोपंत येऊन मशारनिल्हेशीं दोन घटका बोलणें केलें. निपाणीकर यांस पत्र लिहून थैली तयार केली ती पावती करावयास मशारनिल्हेनीं आपाजी लक्ष्मण यांचे हवालीं केली, ती घेऊन गेले. बापूजी गोपाळ साने येऊन, मशारनिल्हेशीं च्यार घटका बोलून गेले. मशारनिल्हे व कपतान फ्रोज सायंकाळीं गारपीरचे लष्करांत जाऊन आले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व बऱ्हाणपुरचीं पत्रें डाकबरोबर आलीं. जाब रवाना जाले. भाऊ भिडे यांजकडून एक तबक भरून आंबे मशारनिल्हेकडे आले.

२

दोन राजां वर्तमान निवेदन जालें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bayaji Naik in this news-letter mentions the names of the persons that had come to visit Elphinstone and gives an account of their interviews.*

---

*No. 59]* *[30-7-1813*

पैवस्ती छ १ साबान
मुक्काम चिखलठाण
सुा आर्बा.

**श्री**

साहेब साहेबाचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एलफिनूस्टन वकील दिमत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

छ २ रजबची. मशारनिल्हे प्रात:काळीं गणेशखिंडीपावेतों जाऊन सहल करून आले. बापूजी गोपाळ साने तिसरे प्रहरी येऊन मशारनिल्हेशीं

दोन घटका बोलणें करून गेले. करवीरकरांकडील श्वरूपजी हुजरा व रामचंद्र परशराम पटवर्धन यांजकडील बाळकृष्णपंत व प्रभाकरपंत जोशी व चिंतामणराव पटवर्धन यांजकडील सदासिवपंत ऐसे वेगळाले येऊन कपतान क्लोज यांसीं बोलून गेले. रूपराम चौधरी यांजकडील कारकून येऊन खुसरवजी मोदी यासी बोलून गेले. खुसरवजी मोदी बंगल्यांतून निघोन हरेश्वर साहूकार यांचे घरात जाऊन दोन घटका बोलून आपले घरास गेले. त्रिंबकजी डेंगळे बोलण्यांत होते. कपतान फोट व हुरमोजी शेट प्रात:काळचे बारा घटिका दिवसास शुक्रवारचे सरकारवाड्याजवळ तालीमखान्यांत गेले. कपतान यांणीं भोजन करून श्रीमंत महाराज साहेबाजवळ दोन घटिका बोलणें केलें. सरकारांतून कपतान यांस दोन हजार रुपये बक्षीस दिल्हे. नंतर सरकारआज्ञा घेऊन ठिकाणास आले. मुंबई व हैद्राबाद व श्रीरंगपट्टण व ब्न्हाणपुरचीं पत्रें डाकेबराबर आलीं. जाब रवाना झाले. शामराव रास्ते यांचा खिजमतगार लयनेत दारू पिऊन मशारनिल्हेकडील रावजी कारकून यांचे घरांत तिसरे प्रहरीं जाऊन कांहीं पांघरुणें चोरून घेऊन चालला. सबब शिपायांनीं धरून कपतान हेर यांजवळ आणिला. कपतान यांनीं बांधून कोरड्यानें मार देऊन नदीपार करून दिल्हा. गारपीरचे लष्करांतील पलटणें रात्रीं तयार असतात म्हणोन बातमी आहे.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bayaji Naik writes news that the English detachment stationed at Garpeer was kept ready by night. The names of the persons who obtained audience of Elphinstone are also mentioned.*

---

*No. 60]* *[30-7-1813*

पैवस्ती छ १ साबान श्रावण
मुक्काम चिखलठाण सुरु सन
आर्बा अशर

**श्री**

साहेब साहेबांचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एलफिनूस्टन वकील दिंमत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

छ ८ रजबची. निपाणीकर यांजकडील आपाजी लक्ष्मण व लिंगोपंत तिसरे प्रहरीं येऊन मशारनिल्हेशीं चार घटका बोलणें केलें. करवीरकरांकडील श्वरूपजी हुजरा येऊन बसला होता. त्यास मशारनिल्हेनीं बोलाविलें.

त्याचें एक घटका बोलणें जाहालें. नंतर आपाजी लक्ष्मण व लिंगोपंत निघोन खुसरवजी मोघी यांसीं बोलून गेले. मागून श्वरूपजी गेला. शिरूर नजीकचे लष्करांतून दोन पलटणें मशारनिल्हेनीं आणविलीं. तीं पलटणें दोन व पन्नास तुरुकस्वार व घोड्याचे गाड्यावरील दोन तोफा ऐसे येऊन मौजे येरवडेनजीक मुक्काम केला आहे. त्या पलटणांतील कपतान मेन बंगल्यांत येऊन मशारनिल्हेस भेटले. पलटणें उद्ईक येरवड्याहून निघोन गारपिरास येणार. सबब खडकीचे पुलावरून लाकडी पुलानें शहरांतून जावयाचा रस्ता दाखवावयाकरितां मशारनिल्हेनीं आपलेकडील एक जासूद व सरकारचा जासूद एक एकूण दोन जासूद येरवड्यास पलटणांत पाठविले. गारपीरचे लष्करांतील गाडदी असामी साठ दररोज बेटांत बंगल्यानजीक रात्रीचे चौकीपाहाऱ्याकरितां येत होते, ते छ ७ मिनहूपासून लष्करचे सरदारांनीं पाठविले नाहींत; व सरकारी पलटणांतील नवे लोकास कवाईत शिकवावयास गारपीरपैकीं गाडदी होते तेहि गारपिरास नेले. गारपीरचे पलटणांत दररोज रात्रीं तयारी असती. सबब नेमणुकीस लोक होते ते एके जागां जमा केले. गोपाळ खंडेराव रास्ते यांजकडील श्रीनिवासपंत व जनार्दनपंत व विश्वास खंडेराव रास्ते यांजकडील बाळाजीपंत नातू व प्रभाकरपंत जोशी व गोपाळपंत रानडे ऐसे येऊन मोधीसीं बोलून गेले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्रम्हाणपुरचीं पत्रें डाकेबराबर आलीं. जाब रवाना जाले. श्रीमंत राजश्री आपासाहेब यांजकडील चिंतोपंत जोशी व माधवराव रास्ते यांजकडील गोपाळपंत व आंगरे यांजकडील बापूभट सोमण ऐसे वेगळाले येऊन माघारे गेले. मशारनिल्हेची गांठ पडली नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bayaji Naik reports that the English have brought over two Companies from Sirur to Poona. The names of the persons who interviewed Elphinstone in the course of the day are mentioned.*

---

*No. 61*] [*30-7-1813*

पौ छ १० साबान
श्रा शुा १३ सन आर्बा
अशर शके १७३५

**श्री**

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणसोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १ माहे शाबानपावेतो स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें

वर्तमान यथास्थित आहे विशेष. येथील अखबारींत बंदर मजकुरची बातमी नेहमी सेवेसी लिहून पाठवीत आहेच. अलीकडील बातनी आबरक्रांबी विलायेतेहून सेनापतीचे कामावर मुंबईस पाठविले होते; नंतर त्यांस मदरासेची सेनापति देण्याविशी हुकूम आला; तेव्हां येथून मद्रासेस गेले तो मजकूर पेशजीचे अखबारींत सेवेसी लिहिला गेलाच आहे. अलीकडे त्यास मदरासेची जनरालगिरी देण्याविशी हुकूम आला. त्याजवरून जनरालगिरीवर कायम होऊन तेथील जनराल पहिला सर बार्लो म्हणून होता तो विलायेतेस जाणार आहे, व आबरक्रांबी यांसी मुंबईचे सेनापती होती ते मदरासेस गेले; तेव्हां त्यांचे ठिकाणीं येथें दुसरा सरदार विलायेतेहून रवाना जाहाले. त्यास अमारिक टोपीकर यांची गांठ पडोन, लढाई शिकस्त करून, आपले मुलकांत धरून नेले, ते व मेम्र फर्बस इंग्रज साऊकार याचा माल विलायतेहून भरून मुंबईस येत होते, त्यांस समुद्रांत वादळ पडून, जहाज वादलानें हाणून, बतामीचें+ बंदरांत आणून टाकिलें. तें जहाज फुटलें, तेव्हां जहाजावरील दर्यावर्दी व खलाशी व कपितान यांणीं गळबतांतून मात्र नख्त ऐवज काढून दुसरें गलबतावर घालून घेऊन जात असतां आपसांत खटला करून दर्यावर्दी यांणीं कपितान यांसीं ठार मारून टाकिलें. हे वर्तमान बतावीचे अमलदार यांसीं समजतांच त्यांणीं दर्यावर्दी वगैरे धरून जाणून अटकाव करून ठविले आहेत. याप्रमाणें बंदर मजकूरची बातनी आहे. सेवकास आढळला मजकूर विनंतीपत्रीं सेवेसी लिहिला आहे. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*This is a news-letter which gives an account of an English ship laden with cargo being damaged by a storm. The names of the transferred military officers of Madras are given.*

---

*No. 62]* *[23-9-1813*

पैवस्ती छ २७ रमजान
भा सन आर्बा
मुक्काम फुलगांव

**श्री**

साहेब साहेबांचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एल्फिन्स्टन वकील दिंमत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी :—

छ २९ साबानची राजश्री बापूजी गणेश गोखले याणीं मोरो बाबूराव फडणीस यांचे बागांत मशारनिल्हेस मेजमानी केली. सबब मागील एक प्रहर दिवस राहातां मशारनिल्हे व कपतान क्लोज व कपतान हेट व खुसरवजी मोधी वगैरे मंडळी निघोन लाकडी पुलावरून बागांत गेले. बंगल्यांत बिछाईत केली होती.

+ Bantam ? Batavia ?

तेथे गोखले बंगल्याबाहेर पुढें येऊन सलाम करून बिछाइतीवर घेऊन गेले. खैर आफीयेतचें बोलणें जाहालें. रमी कळवांतीण इचा नाच दोन घटका पाहून त्रिवर्ग टोपकर उठोन बंगल्याखालील दालनांत जाऊन भोजन केलें. गोखले परामर्षास जवळ बसले होते. भोजन जाहाल्यावर मागती बिछाइतीवर आले. दोन घटका नाच जाहाल्यावर गोखले यांणीं पोषाख व जवाहीर दिल्हें. बितपशील.

खुद वकील मवसुफ यांस

३ शिरपंच व जेगा व कंठी मोत्याची एक पदरी ऐकूण रकमा.

१ पोशाख सनगें
  १ तिवट पैठणी लाल
  १ शालजोडी गुल अनार
  १ किमखाप भरगची हिरवा
  २ महमुद्या थानें

———
  ६

खुसरवजी मोधी यांस तिवट पैठणी व शालजोडी व महमुदी व किनखाप मिळोन चारा सनगाचा १ पोशाख दर असामीस दुपटा व तिवट एकूण दोन सनगेंप्रमाणें

१ बापूजी गोपाळ साने सनगें २
१ शामजी खंडेराव सनगें २
१ सदानंद डाकवाले सनगें २

—
३

कपतान क्लोज यांस

१ शिरपेंच
१ पोशाख तिवट पैठणी व शाल-जोडी व किनखाप थान व महमुदी मिळोन सनगें चार

कपतान हेर यांस तिवट पैठणी व शालजोडी व किनखाप निमें व महमुदी ऐकूण साडेतीन सनगाचा १ पोषाख. दर आसामीस तिवट व शालजोडी व महमुदी व किनखाप निमें ऐकूण साडेतीन सनगेंप्रमाणे पोशाख

१ हुरमोजीशेट सनगे ३॥
१ महंमद हतीफ मुनशी ३॥
१ खंडो यादव सनगें ३॥

—
३

सेवकाकडील दाजी त्रिंबक यांस दुपट्टा व तिवट एकूण दोन सनगांचा १ पोशाख

येणेप्रमाणें अकरा आसामीस देऊन फुलाचे हारतुरे गजरे व अत्तरगुलाब विडे दिल्हे. साहा घटका बैठक जाहाली. नंतर निरोप घेऊन मशारनिल्हे मंडळी-सुध्धां गेल्यामार्गें ठिकाणास आले. मोधी मागें राहिले होते, ते कांहींसें बसून निघाले. ते घरास गेले. गोविंदबक्ष दिंमत नवाब यांजकडील मिर इभराम येऊन तिसरे प्रहरीं मशारनिल्हेशीं बोलून गेले. निपाणीकर यांजकडील आपाजी

लक्ष्मण व लिंगोपंत सायंकाळीं येऊन मशारनिल्हेशीं बोलून गेले. करवीरकरांकडील सरूपजी हुजरा व आंगरे यांजकडील कारकून सलाम करून तिसरे प्रहरीं गेले. बोलणें जालें नाहीं. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्ऱ्हाणपुरची पत्रें डाकेबराबर आलीं. जाब रवाना झाले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Bayaji Naik gives an account of the dinner party given by Bapu Gokhale in honour of Elphinstone at the Garden of Moroba Dada.*

---

*No. 63*] [*23-9-1813*

पो छ २० सवाल
आश्विन सन आर्बा

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री
बाबासाहेब स्वामीचे शेवेसी

विनंती सेवक विसाजी देवराव देशपांडे मुा कोपरगांव कृतानेक सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २७ रमजानपावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरोन सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. बारगीर मंडळीची कवाईत करून पाहात असावी म्हणोन आज्ञा. त्याजवरून छ मजकुरी पागा निा राा नारो विष्णु आपटे याजकडील पागेतील बारगीर मंडळी कवाईत पाहावयास बाहीर आली. त्यात बाहादरखान व मुर्तुजाखान दोघे बापलेक आडहत्यारी आहेत, त्यास बंदुखी बांधाव्या म्हणोन सांगितले. त्यांचे म्हणे पडले की आम्हास बंदुख बांधावयाची नाही. मर्जीस आल्या चाकरी ठेवावे, नाही तर निरोप द्यावा. त्यावरून त्यास सांगितले की तुम्ही अडहत्यारी म्हणता त्यास तरवारेची कवाईत दाखवावी. त्यांचे म्हणे पडले कीं मजवळ तरवार नाही, मी सुरी लकडी बाळगितो. त्यास सांगितले की सुरी बाळगिता त्याची कवाईत दाखवावी तेव्हा सुरी काढोन आपल्या लेकावर मारावयास धावला, तेव्हा अली भालदार व जिवाजी सोनवलकर दिा विठोजी कारके दरम्यान धाऊन मुर्तुजाखान यास दूर केले. हली मुर्तुजाखान याचे बोलणे दाहा रुपये चाकरी कोण करितो? शंभर रुपये रोज दिल्हे तरी कोपरगावी राहणार नाही. म्हणोन सांगितल्यावरून निरोप दिल्हे आहे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Visaji Deorao Deshpande of Kopargaon reports to the Peshwa the circumstances under which he had to dispense with the services of one Murtajakhan.*

7040

No. 64] [1-10-1813

श्री

राजश्री त्रिंबकजी डेंगळे गोसावी यासी

ऽ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री बाजीराव रघुनाथ प्रधान आसीर्वाद सुा आर्बा अशर मया तैन व अलफ. श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी व श्रीमंत माहाराज मातुश्री माईसाहेब व श्रीमंत सौ मातुश्री बाईसाहेब व श्रीमंत राजश्री भाऊसाहेब व आपासाहेब व उभयेताच्या स्त्रिया यांस विजयादशमीचे पोषाक पाठविले आहेत, त्यांची यादी आलाहिदा असे त्याप्रा जिकडील तिकडे पावते करून उत्तरे घेऊन पाठवणे व तुम्हांस विजयादशमीचा पोषाख सनगे सुमार

१ तिवट

१ सेला

१ मस्मुर्दी

॥. किमखाप

---

३॥

येकूण साडेतीन सनगे पाठविली आहेत. घेऊन उत्तर पाठविणे. जाणिजे छ ५ सवाल * आज्ञा प्रमाण.

¶*The Peshwa sends dresses to Trimbakji Dengle and asks him to present the robes to the king and other members of the royal family on the occasion of the Dassara day.*

---

No. 65] [25-11-1813

पौ छ ९ जिल्हेज

मार्गशीर्ष सन आर्बा

श्री

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणसोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १ माहे जिल्हेजपावेतों स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचे वर्तमान येथास्थित आहे विशेष. दारूविशी मेस्त्र इलफिष्टण यांची चक्ती जनराल यांसी पाठविली, ती त्यांस देऊन दारूविशी विचारिलें. त्यांणीं पस्तीस हजार रुपयांची पेशवे यांसी द्यावी लागती म्हणोन दारूचे कारखानदार मेस्त्र जुनम यांसी परवानगी सांगितली. त्याणें कौशल ठराऊन सेवकास पहिले

7041

भेटीस उत्तर सांगितलें कीं दारू देऊन तुमची रवानगी सत्वरच करितों. दोहो दिवशीं यावें म्हणून बोलिला. त्याजवरून दोन दिवस गेल्यानंतर मागतीं जाऊन पुशिलें, त्याचें उत्तर जहालें कीं झाडेनशीं दारू मिळत नाहीं. निमशिम देऊं, याप्रमाणें बोलले. त्याजवरून तिसरे वेळेस गेलों तेव्हां उत्तर केलें कीं दारू मुंबईचे कारखान्यांत नाहीं. तीन हजार पिंप बंगालेस देवितों. अशा तीन बैठकेस तीन उत्तरें सांगितलीं. त्याजवरून त्याचें आमचें बोलणें बहुत प्रकारें जाहालें, त्या वेळेस करार केला कीं च्यार दिवशी यावें; तुम्हांस निखालस जाबसाल सांगतों; त्याजवरून च्यार दिवशी पुन्हा गेलों तों गांठच पडली नाहीं. आज उत्तर सांगितलें कीं येथील कारखान्यांत दारू नाहीं. येविशीं मेस्त्र इलफिष्टण यांसी पुणियास लिहिलें आहे, तेथें ठरोन उत्तर येईल त्याप्रमाणें तुम्हांस सांगूं. तुम्ही आपले खावंदांस ल्याहावें म्हणोन सांगितल्यावरून विनंती लिहिली आहे. इलफिष्टण याणें तेथें खास ठराऊन लिहिल्याखेरीज दारू प्राप्त व्हावयाची कठिण. त्यास तेथें ठराव होऊन दारू देण्याविशी मेस्त्र इलफिष्टन यांचें पत्र यावें, अगर पुढें कसें करावयाचें त्याची आज्ञा यावी त्याप्रमाणें करीन. अलीकडील बंदर मजकुरीं बातनी तीन विलायती जाहाजें दाखल जाहालीं, त्यांत माल भरून आला आहे. तांबें, शिसें व लोखंड वगैरे असें बंदरमजकुरीं आलें आहे; व येथून दारूचीं पिंपें सुमार ५०० पांचशें व गोळ्या ऐसें पणवेलीचे मार्गेहून घोडनदीवर पलटणाचे खर्चास रवाना जाहालें आहे; व दुसरा जंगी जिन्नस गुजराथेस जावयास गलबतावर चढविला आहे. याजवर सेवकास बातमी आढळली म्हणजे सेवेसी लिहून पाठवितों. सेवेसी श्रुत होये हें विज्ञापना.

¶*Raghunath Ranchhod, the Peshwa's agent stationed at Bombay, communicates that the General is not prepared to comply with the request of the Peshwa for a supply of gunpowder and adds that three foreign ships laden with cargo have arrived from England.*

---

*No. 66*] [*25-12-1813*

पौ छ ११ मोहरम
पौष सन आर्बा
मुा पुणे

**श्री**

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणसोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १ माहे मोहरमपावेतों स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान यथास्थित आहे विशेष. पेशजीं साहेबांचें सेवेसी विनंतीपत्र

पाठविलें आहे त्याजवरून दारूचें प्रकर्ण व बातनीचा मजकूर सेवेसी निवेदन जाहलाच असावा. अलीकडील बातनी आहे कीं राजश्री गंगाधरपंत शास्त्री हल्लीं गायेकवाड यांची दिवाणगिरी करितात, ते बडोद्याहून मुंबईस यावयासी निघाले आहेत. येथील मुख्याची भेट घेऊन हुजूर जाणार आणि मशारनिल्हे गायेकवाड संमंधें सरकारांत विनंती करून बंदोबस्त करून घेणार असा बेत आहे म्हणून बातनी. याजवर सेवकास बातनी आढळली म्हणजे सेवेसी विनंती करितां. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापना.

¶*The writer reports that Gangadhar Shastri, Diwan of the Gaikwad, has left Baroda for Poona and will have an interview with the Governor at Bombay on his way.*

---

*No. 67]* *[9-2-1814*

पौ छ ९ रोवल

फाल्गुन सन आर्बा

श्री

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणसोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १७ माहे सफरपावेतों स्वामीचे कृपावलोकने सेवकाचें वर्तमान येथास्थित आहे विशेष. बंदर मजकूरचे अखबारीचें विनंतीपत्र जासुदासमागमें सेवेसीं लिहून पेसजीं पाठविलेंच आहे. राजश्री गंगाधरशास्त्री यांस निकडीनें पुण्यास जाऊन पोहचावें म्हणोन येथील मुख्याची ताकीद जाहाली. त्याजवरून माघ वद्य ४ भोमवारीं निघोन पुण्यास जावयासी गेले. कारनल कारानिक कपतान बडोदकर याचा मार्ग मशारनिल्हे पाहात होते. ते येऊन उभयताचीं बोलणी जाहालीं. त्यांतील हांसील पुण्यास गेल्यावर सरकारांत गायेकवाड प्रकर्णी बोलणी होऊन, संकेताप्रमाणें उलगड्यांत आणावें. कमपेश जाबसाल पडल्यास येथें लिहून पाठवीत जावें. त्याचा पुरावा येथून होत जाईल. याप्रमाणे घांट ठराऊन महिना पंधरा दिवस तेथील बोलणी समजण्यांत येत तोंपर्यंत करनेल याणें येथें असावें असा बेत ठराऊन, शास्त्री निघोन गेले. करनेल येथें आहेत. दुसरा मजकूर आबरक्रांबी जनराल मदरासेस होते त्याचे चित्तांत विलायथेस जावयाचें, याकरिता विलायथेहून त्याचे जाग्यावर दुसरा जनराल ईस्लुप+ म्हणोन नेमिला आहे. इतक्यात येऊन पोहचेल. यावर मजकूर नवल विशेष आढळेल ते सेवेसीं लिहीत जाईन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghunath Ranchhod writes that Gangadhar Shastri, after his interview with the Govornor and with Col. Carnac, proceeded to Poona.*

+ Hislop.

7043

No. 68] [24-2-1814

श्री

साहेब साहेबाचे सेवेसी आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मिस्तर एल्फिनस्टन् वकील हिमत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी.

१ छ ३ रबिलावलची, मशारनिल्हे प्रातःकाळीं गणेशखिंडीपावेतो जाऊन सहल करून आले. गंगाधर शास्त्री चिंचवडाहून निघोन दोन प्रहर दिवसास बंगल्यानजीक आले. गाईकवाड यांजकडील दोनशे स्वार व एक हात्ती आंबारीचा व एक खुला एकूण दोन हात्ती वगैरे लवाजिमा जिल्बीचा बराबर होता. बंगल्याचे दरवाज्याबाहेर घोड्यावरून उतरून एक घटका उभे राहून पन्नास असामी भले लोक बापू मैराळ यांजबरोबर अगोधर पुढे पाठवून मशारनिल्हेस भेटविले. मागून जातीनें बंगल्यांत आले. पुढील बंगल्याचे दालनांत मशारनिल्हेनी खुरच्याची बिछाईत करविली. दालनाचे जोत्यापावेतो मशारनिल्हे पुढे आले. तेथें शास्त्री याणी हातास हात लाऊन मशारनिल्हे व कपतान क्लोज व मिस्तर रसेल व कपतान हेर व खुसरवजी मोधी यांस भेटले. मशारनिल्हेजवळ खुर्चीवर बसून एक घटका खैरआफीयेतचें बोलणे जालें. आनंदराव गाईकवाड यांणीं मशारनिल्हेस पत्र पाठविलें, ती थैली एक व मुंबईकर जनरल वगैरे यांचे इंग्रजी पत्रांचे तीन लाखोटे ऐसे शास्त्री यांणीं मशारनिल्हेजवळ दिल्हे. मशारनिल्हेनीं अत्तर गुलाब विडे मंडळीस देववून आपले हातें बापू मैराळ यांस एक डबा व शास्त्रीबावा यांस एक डबा भरून विडे दिल्हे. नंतर निरोप घेऊन निघाले ते लाकडी पुलाजवळ डेरा दिल्हा आहे तेथें राहावयास गेले. आंगरे यांजकडील बापूभट सोमण प्रातःकाळीं मशारनिल्हेशीं बोलून गेले. करवीरकरांकडील मोरोपंत वगैरे तीन असामी कारकून व प्रभाकरपंत जोशी ऐसे कपतान क्लोज यांसीं बोलून गेले. श्रीमंत राजेश्री आपासाहेब नाशकास जावयाकरितां निघोन वाकड्याचे बागांत राहिले. सबब सरकारांतून दोनशें स्वार व पायदळ देवावें म्हणून त्यांजकडील जासूद येऊन मोधीस सूचना करून गेला. त्याजवरून दोनशें स्वार व दोनशें पायेचे लोक बरोबर द्यावयाचें ठरले आहे, त्याप्रमाणें द्यावें म्हणून मोधीनीं सरकारचे जामृदाबरोबर खंडो मल्हार यांजकडे निरोप पाठविला. नंतर तिसरे प्रहरी चिंतोपंत जोशी व राघोपंत वेव्हारे येऊन मशारनिल्हेशीं बोलून गेले. सावनूरकर नवाब यांजकडून मशारनिल्हेशीं पत्र आलें. ती थैली त्यांजकडील कारकून येऊन मशारनिल्हेस पावती करून गेला. मुंबई व

हैद्राबाद व श्रीरंगपटण व ब्र्हाणपुरचीं पत्रें डाकेबराबर आलीं. जाब रवाना झाले. माधवराव रास्ते व मिर इभराम व गोपाळराव रास्ते व गणपतराव पटवर्धन व मुरापूरकर व शिवराव हरि झांशीकर व गणपतराव परमु व जिऊबाई भानु व रामचंद्र परशराम पटवर्धन यांजकडील कारकून ऐसे येऊन मावार गेले. मशारनिल्हेची गांठ पडली नाहीं.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Bayaji Naik in communicating the daily happenings at the Residency reports that Gangadhar Shastri, Diwan of Baroda, had his first interview with Elphinstone. The names of other visitors are also mentioned.*

---

*No. 69*] [*18-2-1817*?

मुक्काम घोडनदी

१ वेजापूरचे मुक्कामाहून तोफखाना व मोर्चीखाना बोलाविला; व किनेऊ[1] व मणसाहेब मावार येणार.

१ बाळापूरची पलटणें पंधरा कोश पुढें गेली. पेंढारी यांचा दंगा भारी आहे. पंधरा हजारांचा जमाव त्यांचा आहे.

१ जालन्यावर छयावणीची तयारी होत आहे.

किता अखबार

१ पुण्यातील ग्रहस्तानीं कृष्णराव याजबरोबर निरोप पाठविला कीं त्रिंबकजी फौज ठेऊन प्रांत लुटून आणखी फौज जमा करणार. हे सरकार मनावर धरीत नाहीं तव्हां आंतून इतला असेल असें वाटतें.

१ भाऊ व दीक्षित यांचे सख्य फोटसाहेब याणी केले, आणा भापा जाली. भाऊनी दीक्षिताचें व अलफइस्टन याचें सख्य करून द्यावें, येविसी भाऊकडील कारकून व कृष्णराव व फोटसाहेब याणी बोलणे केले. थोरले साहेबाचे म्हणणे दीक्षितानीं इमानेइतबारें सरकारकाम करून आम्हास कळवीत जावें, याप्रमाणें कबूल असल्यास त्याची आमची भेट होईल.

१ दीक्षित याणी आलफईस्टीन यास मेजवानी केली. त्यासमंधे कोणास काय दिल्हे त्याची याद आलाहिदा आहे.

१ भाऊचे व दीक्षिताचे बोलणे जाले, त्याची याद अलाहिदा आहे.

[1] Kennaway.

ग्वालेर

१ येमुनातीरीं इंग्रजानीं घाटबंधा करावयाबा॥ तुरुबस्वार ठेविले आहेत.

१ ग्वालेर मुल्याचे आमदानीच्या यादी बायजाबाईस मनसुखराव यांणी समजाविल्या. त्याजवरून गैरराबता करून बाई व आपण बसोन मनसुखराव याजकडील यादी पाहिल्या. याप्रों पारखाकडे माहालचा वसूल आला म्हणोन सांगितले.

१ इंग्रजाकडील तीन पलटणे हतरसेस† गेली. आठ कोशावर मुक्काम करून आहेत. हतरसकराकडील वकील इंग्रजाकडे आला आहे.

१ बाळाजी इंगळे यांस हलकारा बोलावणेस पाठविला. त्याचे उत्तर आले कीं मी चाकर होळकराचा, बाईस पुसोन त्यांचे विचारे येईन, परंतु प्रथम छ १ रबिलाखरी लष्करात आले, ते वेळेस सामोरे जाऊन भेट जाली आहे.

१ महमुदशहा बादशहा पिसोरवाला अजाराने हैराण आहे. त्याचा विजीर फत्तेखा आटकेजवळ येऊन सिखासी सलुक करावा म्हणोन वकील रवाना केला.

१ छितू पेंढारी याजवर छापा घालावयास पलटणे इंग्रजाकडील नर्मदा उतरून आली, ही बातमी कळताच पेंढारी कूच करून सुजाळपुराकडे गेले. पलटणे सन्वासचे मुक्कामी आहेत.

¶*This is a news letter which supplies news items to the Peshwa from several quarters in connection with the activities of the Pindaris, the English and the Maratha Sardars.*

---

*No. 70*] [*7-4-1814*

**श्रीभास्कर**

राजश्री त्रिंबकजी पा॥

तात्या गोसावी यास

ऽ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री॥ कासी मिश्रराम वेद रामराम विनंती. येथील कुशल ता॥ छ १९ रावर गुरुवारपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत माहाराज मातुश्री माईसाहेब यांच्या आज्ञा जाहाल्या आहेत त्याची तपसील कलमे

१ नवा राजवाड्यात दिवाणखान्यात तख्त आहे, तेथे आमचा दाहिजा चौकीस आहे व तख्तापुढी खोल्यात दोन जामदारखाने ठेविले आहे(त), त्यास मातुश्री माईसाहेब व माहाराज याणी आज्ञा केली की, खाली माजवरचे माहालात टेकूण जाहाले आहेत तरी तख्त व जामदारखाने खाली आणावे व चौकी खाली आणावी आणि दिवाणखाना रिकामा करून द्यावा.

† Hathras.

7046

ते समई मी विनती केली की माहाराज तख्ताजोगी दुसरी जागा नाही. आहे तेथे बरं आहे व जामदारखाने ठेवावयाजोगी दुसरी नव्या वाड्यात जागा नाही व दिवाणखान्यातहि ढेकूण बहुत पहिल्यापासून आहेत हे ध्यानांतच आहे. त्यापेक्षा तख्त काढावयाचे कारण नाहीं. तेव्हा बहुतच अग्रह पडला. ते समई विनंती केली की, माहाराज मी हा मार पुणियास लिहितो. तेथ श्रीमंत राजश्री भाऊसाहेब[१] याचे कानावर घालून उत्तर येईल त्याप्रो विनंती करीन. नंतर आज्ञा जाहाली की, उतर किती दिवसात आणविता ? नंतर विनंती केली पंधरा दिवसी आणवितो. येणेप्रो येथ (मार) * * * * * दिवाणखान्यात तेरा चौदा खिडक्या आहेत. राजवाड्यात चौकी म्हणावयास तेवढीच आपली आहे. ती उठवावयाची सोय दिसत नाहीं. नंतर उतर येईल त्याप्रो करीन. कलम.

१ नव्या राजवाड्याचे पश्चमेस झडीचे सोप्यानजीक खुदा नाइकीण कलवंतीण इचे घर होते. ती कलवंतीण केल्यासवासी माहाराज याणी ठेविली होती. ते घर हाली मुस्याकडे आहे. त्यात चौकी आहे. अजीराचा पाहारा म्हणतात. राजवाड्यास लगत राजवाड्याची व पाहाऱ्याची भित मात्र मध्यें. पेशजीचे घर हुजरातीकडील होते. त्यास हाली मातुश्री माईसाहेब याचे म्हणणे पडले आहे की, हाली कलवंतीण राजवाड्यात आत आहे तरी मुसलमान माणसाची सोय पडत नाही. तरी पेशजी आमचे घर रिकामे करून देणे. तेव्हा मी विनंती केली की, माहाराज आज्ञेप्रो घर देणे, परंतु कलवतीण इणे बाहेर राहावे, बाहेरून वाटेने वागावे. तेव्हा माहाराज याचे म्हणणे पडले की, मागील घर आमचेच आहे त्यापेक्षा आम्ही राजवाड्यात वाग आहे त्या भितीस चौकट लाऊन वाट आतून जाण्यायेण्यास कलवंतिणीस करून बाहेरील वाट बुजऊन टाकू. तेव्हा मी विनंती केली की, आतून वाट पेशजीपासून आहेच, परंतु हाली * * * पाहारा आहे. या वहीवाटीप्रो केल्यास पाहारा रिकामा करून आपले घर देतो. आम्ही दुसरा पाहारा त्या सेजारी बाधू. व्यत्यय काय आहे. ते समई आज्ञा जाहाली की, कलवंतीण लोकाच्या द्रिष्टीस पडून बाहेरून वागावयाची सोय पडणार नाही. बाहेरील चौकटीस भित घालून दरोबस्त बुजऊन आतील चौकट मोकळी करू. याप्रमाणे जाहाल्यास आमचे घर आम्हास द्यावे. आत मुसलमान * * * मुले आडचण जाहाली आहे. ते समई विनती केली की, पाहारा नवा करावा लागतो, हा मार

१ सदाशिव माणकेश्वर.

पुणियास लिहून उतर आणोन विनंती करीन. त्यास याचे कसे करावें. पाहारा दुसरा करून त्याचे वर रिकामे करून द्यावे किंवा बाहेरील वाट बुजविणार आतून पाडणार याचे कसे करावे, ही आज्ञा लिहावी. येथे निकड बहुत आहे. कलम

१ कैलासवासी शाहू माहाराज याचे श्राध वैशाख शु॥ ९ नवमीस आले आहे. ते दिवसी आकरा पितर मराठे लागतात व दाहाच मराठणी जेवावयास येतात व दाहा पाच भोसले खाली येतात. त्यास सालाबादप्रो॥ श्राधाचे दिवसी यावयाचे आसल्यास श्राध होईल, त्याचे कसे काय ते आताच सागणे म्हणौन आज्ञा जाहाली. त्याजवरून विनंती केली की, पुणियास लिहून श्रीमंत राजश्री भाऊच्या कानावर घालून उतर येईल त्याप्रो॥ विनंती करीन. येणेप्रो॥ येथे बोलणे पडले आहे. त्यास सालाबाद पितर आकरा येत असतात त्यास वर घ्यावयाची आज्ञा आली पाहिजे. सवाष्णी मराठणी येणार त्यास त्याचे झाड्याची कटकट पडती. झाडा निरवाळस होत नाही. घतला असता मर्जी राहात (नाही). याचे मनन होऊन आज्ञा होईल त्याप्रो॥ करीन. भोसले दाहा पाच सालाबादप्रो॥ वर घ्यावे किंवा न घ्यावे याची आज्ञा लिहावी. आज्ञोतर येईल त्याप्रो॥ वेत करावयास ठीक पडेल. कलम

१ छ १३ रोजवरी मगलवारी मातुश्री साहेबजीचा वाखा बहुत जाहाला. याजमुळे मी खाली जाऊन रंगमाहालात जाऊन रात्रौ राहिलो. च्यार प्रहर वैद्य दोन च्यार आणून उपाय केले. काले टाकळीचे तळे राजश्री आपाजी पा॥ पानसरे यांणी दिल्हे व दोन च्यार सिपाई बंदोबस्तास दिल्हे. पायास गुडघ्याखाली कळा बहुत लागल्या आहेत. सिरागत वायूची भावना वैद्य बोलतात. ज्वरहि आहे. काहिली बहुत. हा मार मातुश्री माईसाहेब यास निवेदन केला. त्यांणी बायको समाचारास पाठविली होती. त्यास मातुश्री माईसाहेब याचे म्हणणे येक व * * * स साहेबजीस आणून भेटवावे व साहेबजीचे म्हणणे की, मी यातून वाचेन याचा भरवसा काय ? त्यास माझी येक वेळ भेट करावी. हा मार आपाजी पा॥ यास सागितला. त्याचे म्हणणे की, दुखण्याचे काम परिणाम काय होईल याचा भरवसा कोणास ? त्यास येकवेळ वर नेऊन भेटऊन आणावी. त्यास हाली प्रकृत फार बिघडली आहे. काही बरी जाहाली * * * * * खाली पोहचविती. येविसी पेशजी मार येक दोन वेळ लिहिला परंतु आज्ञोतर काहीच आले नाही. हाली येणेप्रो॥ मार आहे. कलम

7048

१ माहाराज याचे जामदारखान्यापैकी किरकोळ मोडके दागिन्याचे रुपे शंभर रुा भार निघाले. त्याचे चुनाळ च्यार करावयाची आज्ञा जाहाली आहे. आज्ञेप्रा सोनार बसऊन मुख्याचे वाड्यातून करून देतो. कलम

१ आपण आज्ञा केली त्या धोरणाप्रा चाकरी करीत आहे. पेश(जी) (आ)ज्ञापत्र आले त्यात साहेबानी (लि)हिले की, तुमचे वागीक मोठे गिल्ये बहुत आले. त्यास सावधपणे चाकरी करणे. त्यास साहेबाचे आज्ञेप्रो धोरण ठेऊन चालत आहे. सरकारकामामुळे सोवर्तीची मंडळी व राजवाड्यात सर्वांनी भलेपणे ठेऊन मजकडे वाईटपणा दिल्हा आहे तरी सरकारकामामुळे वाईटपणा आल्यास भीत नाही. बेमुरवत सरकारकाम करीत आहे. मार्गीन कोणी चालले त्यास * गा * आहे. गैरमार्गे सरकार कामात कोणी केल्यास त्याचे चाऊ देत नाही. त्याणी गैरवाजवी माझा गिला साहेबास लिहिला असता साहेब वाजवी पाहाणार समर्थ आहेत. मी गैरवाजबी चालतो असे मजकडे लागू जाहाल्यास स्वास पारपत्य करणार समर्थ आहेत. फार काय लिहू. कलम

---

६

येकूण कलमे साहा लिहिली आहेत. त्याची उतरे द्यावयास सत्वर आज्ञा पाहिजे. जाबसाल * * सिवाय वागणुकेस ठीक पडत नाही. येथे काय बोलावे असा विच्यार पडतो. मनन होऊन आज्ञोत्तर सत्वर आले पाहिजे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ करावा हे विनंती.

¶*Kasi Shivaram Bandre submits his report on some six items to Trimbakji Dengle and solicits Peshwa's orders on some of them. These show how strict the Chhatrapati's confinement was at the fort of Satara. The six items are :*

*1. The removal of the throne and the Jamdarkhanas to the drawing-room downstairs owing to the nuisance of bugs, as desired by the Maharaja and Maisaheb his mother.*

*2. Whether Dudha—the concubine of the late Chhatrapati—should be allowed to reside within the precincts of the palace.*

*3. The search of the persons of females invited for dinner on the anniversary Day of the late Chhatrapati Shahu.*

*4. Permission for an interview between Maisaheb and the late King's mother who is ill.*

*Of the last two items one pertains to the ornaments of the King and their repairs and the other to his explanation of the complaints carried to Poona against him (the writer).*

7049

No. 71] [7-4-1814

२

(ना) सिकाहून निघोन चैत्र वद्य त्रितीया गुरुवारी नव्याणव वाटे पुण्यास आम्ही दाखल व्हांव. निदान पंचमीपावेतो तर व्हावेच व्हांव. तेथे आल्यानंतर आपली व अल्फइष्टन व मार्थी यांची व आमची भेट होऊन तहनाम्याबरहूकूम फौजेचे रवानगीचा वगैरे मजकूर जसा विचारांत ठरेल तसे व्हावयास अवघड काय? हा इतला मार्थीस करावा. त्याजकडून इंग्रजास करवावा.

*¶The writer has left Nasik for Poona and informs that steps would be considered for despatching troops according to treaty probably against the Pindaris.*

---

No. 72] [8-4-1814

श्री

राजश्री त्रिंबकजी पाटील
तात्या गोसावी यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री गोंदाजी डेंगला राम राम विनंती येथील कुशल ता। छ १६ राखरपर्यंत साहेबांचे कृपेकरून मु॥ किले सातारा वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील वरदीचा मजकूर सविस्तरवार राजश्री कासीपंत दादा यांणी लिहिला आहे त्यावरून विदित होईल. आम्ही साहेबांचे आज्ञेप्रमाणे राजवाड्यात चाकरी करीत आहो. श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी बाहेर कोठे निघत नाही. आबदारखान्याचे दरवाज्यात येकादे रोजी येतात. त्यासमई आम्ही मुजरे करून हात जोडून उभे राहातो. हाली माहाराज व मातुश्री माईसाहेब यांची मर्जी सुप्रसन आहे. जाहाला मा॥र शेवेसी लिहिला आहे. पुढे होईल मा॥र तो शेवेसी लिहून पाठवितो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Gondaji Dengla communicates to Trimbakji Dengla news from Satara about the King.*

---

No. 73] [26-4-1814

श्री

सेवेसी विनंति सेवक रघुनाथ रणसोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ९ माहे जमादिलावलपावेतों स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान येथास्थित आहे विशेष. आलीकडील बातमी राजश्री कानोजी

7050

गायेकवाड यासी बडोद्याहून साष्टीस आणून पाहाऱ्यामुळा ठेविले होते, त्यास मशारनिल्हे गायेकवाड याणी कांहीं येथील मुख्यास अर्ज लिहून पाठविला होता; परंतु इंग्रजानी विचार ठराऊन वरचेवर आज्ञा देऊन, कानोजीस परभारें जाहाजावर चढऊन मदरासेस रवाना केलें. त्याचे खर्चास दरमाहा रुपये पांचसें मदरासेस द्यावे म्हणून तेथील अधिकाऱ्यासी मुंबईकर मुख्य यांहीं लिहून पाठविलें आहे. सारांश जवळ न ठेवितां लांब नेऊन कैदेत ठेविलें. दुसरी बातमी विलायेथीं थोरलें जाहाज येक, त्यास डागडुगी करावयासी गोदीमधें आणून जाहाजास काम मुस्तकीन करून, उधाणाची मेंच पाहून जाहाज पाण्यांत लोटिलें. त्या वेळेस कांहीं पाणी कमती होतांच जाहाज बाजूस खिचून जखमी जाहालें. उपयोगी न पडे म्हणून अडीच लक्ष रुपयांचें जोखीम इंग्रजांस जाहालें. सरकारची नवी पलटणाचे सरंजामाबदल येथें मस्त्र कोठा व त्याचे कारकून खंडो कगावकासी आले होते. त्याणी इंग्रजांचे कारखान्यांतून जंगी जिनस वगैरा सरंजाम घेऊन मावाग गेलेन. याजवर बातमी निघाली म्हणजे साहेबाचे सेवेसीं विनंति लिहून पाठवितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghunath Ranchhod communicates that the English removed Kanhoji Gaikwad from Salsette to Madras and fixed on him a pension of Rs. 500 per month. There is further news of an English ship being stranded in the dock at Bombay.*

---

*No. 74*] [*27-4-1814*

**श्री**

**राजश्री त्रिंबकजी पा तात्या**
**डेंगळे गोसावी यांसी**

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री सटवाजी पा पिंजण राम राम विनंती येथील क्षेम ता छ ६ जौवल बुधवार तिसरा प्रहरपावेतो मुा वाडे येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत माहाराजाची स्वारी सांवरगावीहून दोन प्रहरी मुा मारी आली. येताच गावकरी पाटील कुलकर्णी मी जाऊन गावकरी याजकडून भेट करविली. भाजी वांगीं पाटीभर व हिरवी केळी दोडसे, कारली पाच शेर व नारेळ टोपाची दाहा व उसाची मोळी सुमारी २५ व रसाची घागर व बेल-फुले पिवळे चाफ्याची ब्राह्मणाचे हाती देऊन नायकू गुजर व लक्ष्मण पा याचे गुजारतीने पुढे ठेविले. आज्ञा जाली की हा सरंजाम आसाच तुम्ही आपले माणसा-

१ तयार.

बराबर देऊन वाड्याचे मुा पावत करावा. त्याजवरून आज्ञेप्राा माणसे देऊन वाड्यास पाठविले. गावचा बोभाट काही येक नाही व मर्जीहि बरीच होती. नंतर घोडनदीचे काठी आंब्याची झाडे होती तेथे स्वारी बसली. गाणार मंडळी गात बसली. साईकाली संध्या करून वाड्यास जाणार होती. ती लौकरच श्रीहरिश्चंद्राचे दर्शन घेऊन गेली. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति.

शेवसी बालाजी लक्ष्मण राम राम विज्ञापना सदरहू लिहिण्यावरून ध्यानास येईल हे विज्ञापना.

¶*Satwaji Patil Pinjan writes to Trimbakji Dengle, reporting the presents offered to Peshwa Bajirao at Ghoda and the manner in which the Peshwa spent the day.*

---

*No. 75]* *[23-5-1814?*

**श्रीगजानन**

राजश्री सदासिव भिकाजी व हरि भगवंत
गोसावी यासी

॥ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री त्रिंबकजी पा डेंगले रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष. जेनाबादकर देशमुखाचा जामीनकतबा लिहून घ्याल त्यात ऐसे लिहून घ्यावे की शेख डलाची व पेंढाऱ्याची लुटीची गुरेढोरे वगैरे जिनस देशमुख ख्याा घेत होते त्याजकडून मोडतोड करीत होते हा दोष देशमुख याचे आंगी लाऊन सरकारात धरून आणिले, त्यास जामीन आसा आसा जामीनकतबा आमीलदाराजवळून लिहून घ्यावा. दुसरे रतनगिरी गोसावी व चिमण्या सिंपी व खंड्या परीट ह्या तीन्ही आसाम्या देखतपत्र पाठऊन याव्या. दुसरे राजश्री भाऊचे व माधीचे साधन चांगले ठेवावे. एवजाविसी माधीसी व भाऊसी बोलणे करावयाचे ते विठलपंत मामासी मी बोललो आहे ते समई तुम्ही नवता, त्यास जे बोलणे ते मामास पुसून त्याप्राा भाऊचे व माधीचे साधन ठेवावे. म्हणजे वाड्यात लोक जावयाचे ते एवजाचे दोन्ही कामे उलगडून येतील. थोरले वाड्यांत चांगला कारकून पाहून उगाच ठेवावा. त्याणे वाड्यातील कची वर्दी रोजचे रोज लिहून तुम्हाजवळ देत जावी. तुम्ही मजकडे पाठवीत जावी. वर्दी फार बारकाईने ठेवीत जावी. आपल्याकडील लोक फोडून त्यांत कांहीं कमीजास्त आसल्यास बारकाईने शोध काढावा. सारांष कोणते गोष्टीचे कमी पाहात आसावे आणि वर्दी आम्हाकडे लिहीत जावी.

भाऊचें व मोधीचें साधन चांगलें ठेवावें. हें पत्र कोणास दाखऊं नये, फाडून टाकावें. गा छ तीन जाखर बहुत काय लिहिणें हे विनंति. ता। पारगावीहून गाई चांगल्या दुधाच्या चिरंजीव भागाबाईकरितां पुण्यास आणवाव्या.

¶*Trimbakji Dengle in a confidential letter to Sadashiv Bhikaji directs him to execute the following orders (1) to compel the Deshmukh of Jainabad to sign a security bond, (2) to despatch at once to the writer three persons, namely, Ratangir Gosawi, Chimnya tailor, and Khandya, washerman, and (3) to engage a special person in the Shanwar Palace to convey to him minute news of all occurrences there. Khusru Modi referred to in the letter died in February 1815.*

---

*No. 76*] [*29-5-1814*

पाौ छ ७ साबान
सन खमस अशर मया तैन
व अलफ श्रावण मास.

**श्री**

सेवेसी विनंती सेवक रघुनाथ रणमोड मुकाम बंदर मुंबई कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ९ माहे जमादिलाखरपावेतों स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान येथास्थित आहे विशेष. पेशजीं दोन विनंतीपत्रें बंदर मजकुरचीं अखबारांसुद्धां सेवेसी पाठविलीं आहेत. राजश्री लक्ष्मणराव याणीं सरकारांत विनंती करून प्रविष्ट केलींच असावीं. मशारनिल्हेकडून पत्रांचीं उत्तरें अद्यापि आलीं नाहींत. सेवकाचे हातांशीं विनंती केल्याअन्वयें वसई व बेलापूरपैकीं प्यादे अद्यापि आले नाहींत. सबब अखबाराचीं पत्रें परभारें सरकारांत रवाना करीत असतों. आलीकडील बातमी विलायतेहून बंदर मजकुरीं पांच जाहाजें दाखल जाहालींत. साल दरसाल जिनस येत असतो त्याप्रमाणें आला आहे. तेथील बातनी इंग्रज बोलतात कीं फरांसिज यांजसीं पुन्हः लढाई घेऊन त्याचा येक गांव सही केला; व कांहींक तोफा काबीज केल्या. मुंसा बोनापार्ट फौजसुद्धां आपले मुलकांत पळोन गेला, अशी बातमी याजकरितां येकवीस तोफांची सरबती येथें केली. दुसरी बातमी राजश्री गंगाधर शास्त्री यांचे पत्र राजश्री शिवरामपंत त्याचे व्याही निसबत कारनल करनेक बडोदेकर यांसी आल्यावरून मशारनिल्हे जलदीनें पुण्यास गेले, व करनेल येथें बहुत दिवस होते, तेहि परवांचें रोजीं बडोद्यास निघून गले. इराणकर वजीर बंदर मजकुरीं आले आहेत, ते हैदराबादेस नबाबाचे भेटीस जाणार. चित्ती आहे कीं माहाराजाची

भेट घेऊन पुढें जावें. येविशीं येथील मुख्यांचीं पत्रें तयार होतात तीं जाहलीं म्हणजे सेवकाचेंहि विनंतीपत्र सरकारांत ल्याहावयाविशींचा बेत आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This is a news-letter which gives information of the war between France and England in Europe. The Vazir of Persia, says the letter, has arrived at Bombay and will proceed to Hyderabad paying a visit to the Peshwa on his way there.*

---

*No. 77*]                                                            [*3-11-1814*

## श्रीराम

राजश्री त्रिंबकजी पाटील तात्या
डेंगळे गोसावी यांसी

॥ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री॥ आपाजी पाटील पानसरे व बळवंतराव मावाजी रामराम विनंती विशेष. येथील क्षेम ता॥ छ २० जिल्काद-पावेतो येथास्थित असो विशेष. श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी याज-कडील हुजरे आसामी दोन पत्रें व पोषाक घेऊन श्रीमंत राजश्री बाबासाहेब याजकडे आले आहेत. काल संध्याकाळीं किल्यावरून येऊन शहरांत राहिले होते. आज निघोन पुण्यास गेले. त्याजबरोबर आपल्यास निरोप सांगून पाठविला आहे कीं, घोड्याचा सरंजाम अद्यापि आला नाहीं. तुम्हाकडील गोपाळ-पंत किल्यावर येत असतो. त्यास पाचच्यार वेळा समक्ष सांगितलें. परंतु सरंजाम तयार होऊन येत नाहीं. याप्रो॥ हुजरे याजबरोबर निरोप माहाराजानी आपणाकडे पाठविला आहे. राघोपंत जोसी यांणी विनंती केली होती की रायाचे पत्रांत सरंजामाविसीं ल्याहावे. राहातेकर याजकडील सरंजाम येऊन पोहोचला. त्रिंबकजीकडील आला नाही म्हणोन ल्याहावे. त्याजवरून आज्ञा जाहाली की, त्रिंबकजीकडे येकवेळ मागून पाठऊ, त्यांनी नच पाठविल्यास मग रायास ल्याहा-वयास येईल. हुजरे यास राघोपंत विच्यारीत होता कीं तुम्हास कांही निरोप सांगावयास सांगितला आहे कीं काय? हुजरे यांणी सांगितलें कीं, त्रिंबकजी तात्यास मात्र घोड्याचे सरंजामाविसी सांगावयास सांगितलें आहे. राघोपंत बोलला कीं, रायासहि याप्रो॥ निरोप आसेल. हुजरे यांणीं उतर केले कीं, आम्हास रायास सांगावयाविसी सांगितलें नाहीं. येथें सरंजाम तयार करून देण्याविसी नारायण-दास यास नित्य तगादा केला. परंतु तो म्हणे कीं, दोन तीनसे रुपये लागणार यास येवज कोणीकडील खर्च करावा? त्यास आम्ही सांगितलें कीं, च्यार हजार रुपयांची नेमणूक करून दिल्ही आहे त्याप्रो॥ सरंजाम करून द्यावा म्हणोन राजश्री

7054

आबा फडणीस याणी तुम्हास लिहिले आहे त्याप्रो करून देणे. त्याजवरून सरजी याणी आजमास करून दाखविला. त्याप्रो त्याणी आबा फडणीस यास लिहिले होते व आम्हीहि दोन च्यार वेळा लिहिले, परंतु सरंजाम तयार करून दिल्हा नाही. मोठे नेट लाविले तेव्हा खोगीरमात्र तयार करून दिल्हे. ती प्रा केली आणि विनंती केली की, जो सरंजाम तयार होईल तो बरोबर आणून पोहोचवीत जाऊ. दोन च्यार दिवस खोगीर ठेऊन घेऊन माघारी पाठऊन दिल्हे. साग सरंजाम आल्यावर घेऊ याप्रो आज्ञा जाहाली. जाहाले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. रघुनाथराव भो। व हवालदार दिा पालख्याना हुजरात याची जमीन गोंडवणीस आहे. त्याची जप्ती करून येवज घ्यावा म्हणोन राजश्री कासीपंत बद्रे याजवरोबर आज्ञा आली त्याजवरून जप्ती करून जप्तीचे काम बद्रे याजकडे सांगितले आहे. त्याची जप्ती आम्ही परभारा केली म्हणोन नारायण-दास म्हणू लागले की, हे काम आम्हाकडे आसावे. परभारा तुम्ही जप्ती करू लागल्यास आम्ही आमल तो कशाचा करावा ? त्याजवरून आम्ही त्यास सांगितले की, तात्यानी काम आम्हाकडे परभारा सांगितले आहे. त्यात तुमचा इलाका नाही. काल पत्रे पाठविले आहे त्याजवरून सर्व विदित होईल. बापू माली करजेकर याणे म्हालू गडी नि॥ विठलपंत फडणीस यास मेनात निजल्या जागी डोईत धोंडा घालून ठार मारिला. त्यास धरून आणून बेडी घालून ठेविला आहे. सर्वत्राचा आक्षेप आहे की, याचा सिरछेद करावा. येविसी पेशजी येक दोन वेळा विनंती लिा होती. आज्ञा आली नाही, त्याजवरून हाली विनंती लिहिली आहे, तरी सिरछेद करावयाची परवानगी पाठवावी. बहुत काय लिा लोभ असो द्यावा हे विनंती.

*¶The writers report to Trimbakji Dengle that in spite of the oft-repeated demands from the Chhatrapati for the accessories of a harness, etc., no arrangement is yet made from Poona to supply them. They therefore ask him to arrange to send the accessories promptly. They also communicate to him the complaint of Narayandas against the Peshwa's order of attachment of the lands of Raghunathrao Bhonsle issued not in his name but in the name of Kasipant Bandre. Finally they ask for orders in connection with a case of murder.*

---

*No. 78]* *[20-12-1814*

**श्रीराम**

**राजश्री त्रिंबकजी पाटील तात्या**
**डेंगले गोसावी यासी**

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो आपाजी पाटील पानसरे रामराम विनंती विशेष. येथील वर्तमान ता। छ ७ मोहरमपावेतो येथास्थित

असो. यानंतर इकडील मजकूर तर्री संतुकी दालवाला याजपासून नारायणसेट यार्णी दीडसें रुपये घेतले होते. त्याची चौकसीविसी राजश्री परशरामपंत बोक यास आज्ञा जाहाली होती. त्याणी चौकसी करून सेटे माहाजन याचे साक्षी-निसी जबानी घेऊन सेटजीस समजाविले, त्याजवरून सेटजीने दीडसे रुपयाचा हवाला रा। विठलपंत फडणीस याचा येका माहिन्याचे मुदतीचा दिल्हा. ऐसे आसता हाली दालवाला याजवर दुसरे निमित्य ठेऊन त्यास तगादा लाविला. ते वर्तमान किल्यावर समजले. त्यानी हुजऱ्या व चोपदार यास खाली पाठविला की संतू दालवाला यास तगादा केला आहे तो मना करून घेऊन यावा. याचे आगोधर दालवाला याजपासून दीडसे रुपयाची निशा घेतली होती. सिर्पी व हुजरे आले. त्यानी दालवाला यास किल्यावर घेऊन गेले. नंतर जिमेदार याजपासून दीडसे रुा घेतले ते वर्तमान श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी यास कलले. त्याजवरून फार राग भरले आणि आज्ञाहि सांगून पाठविली आसता सेटजीनी येकिली नाही. त्याजवरून आज्ञा जाहाली की आम्ही पुण्यास लिहू. हाली तिलगुलाची पत्रे श्रीमंत राजश्री बाबासाहेब यास जावयाची. त्याचे ममुदे तयार जाहाले आहेत, त्यात लिहिले आहे की, दालवाल्याचा मजकुर राजश्री परशरामपंत बोक समजून गेले आहे ते सांगतील. हे वर्तमान आम्हास समजल्यावर आम्ही सेटजीस सांगितले की हे चांगले नव्हे. रुपये घेतले आहेत ते माघारे द्यावे आणि माहाराजाची मर्जी प्रसन राखावी. त्याजवर आम्हापासी बोलला की, मी उदईक जाऊन माहाराजाची मर्जी प्रसन करून येतो पत्रे पुण्यास जाऊ देत नाही. त्यास दोन तीन दिवस जाहले चुकवाचुकव करितो. किल्यावर जाऊन बदोबस्त करीत नाही. आद्यापि आम्ही त्यास सागतच आहो. परतु जाहाले वर्तमान लिहिले आहे. भोई नगारची रोजमुरा मागावयास आले. त्यास से(ट)जीनी उतर केली की आम्ही पुण्यास लिहिले आहे. तेथून बंदोबस्त होऊन आला म्हणजे रोजमुरा देऊ. हे वर्तमान भोई नगारची याणी कानावर घातले. तेथून मजकडे आज्ञा आली की, भोई नगारची याचा रोजमुरा सेटजी देत नाहीत. येविसी रायास ल्याहावे लागेल. त्याजवरून आम्ही सेटजीसि ताकीद करून साफच सांगितले की, किल्यावरील बोभाट पडला आसता कार्यास येणे नाही. त्याजवर रोजमुऱ्याचा हवाला फडणिसाकडे दिल्हा आहे. आम्ही सांगितले आसता येकत नाही. बोलतो येक करितो येक, यामुले आमलाची पायेमली होती. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब व राजश्री आपासाहेब याची स्वारी छ ९ मोहरमी खाली सिर्के याचे वाड्यांत राजश्री आपासाहेब याचे खासे न्यावयास आले होते. सिर्के याणी मजवानी केली. च्यार

7056

मऱ्हाठेहि जेवावयास बोलाविले होते. कलावंतणीचा नाच जाहाल्यावर उभयतास पोपाक दिल्हे. सध्याकालचा च्यार घटका दिवस राहिल्यावर स्वारी किल्यावर गेली. तेथे रात्री वरात मिरवली. दारू दोन रुपयाची नेहली होती. राजश्री चितोपंत देशमुख छ मारी सातारियास आले. दांडेकराचे घरी भोजन करून मळ्यास राहावयास जाणार. पेशजी पत्रे आपणाकडे पाठविली होती त्यात लग्नाचा वगैरे मजकूर लिा होता. त्याजवरून विदित जाहालाच असेल. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

*¶Apaji Patil communicates to Trimbakji Dengle the affairs at Satara, especially the reluctance of Narayanshet to pay off the arrears of the servants of the King, and requests to report the matter to the Peshwa and to remove the inconvenience to which the King is being subjected.*

---

*No. 79]* *[28-12-1814*

श्री

शेवेसी बाळाजी लक्ष्मण व गोपाळ आत्माराम मुा गुहागर रामराम विनंती विज्ञापना ताा छ १९ मोहरम सायंकालपर्यंत वर्तमान येथास्थित असे विशेष. आपली स्वारी घाटमाथाहून गेलियानंतर खासा स्वारी घाटाखाली उतरून चिपळुणास मुकामास आली. रात्रौ वाड्यात राहून दुसरे दिवसी हज्यामत जाली. यामुळे उसीर जाला. साा परशरामाचे दर्शनास गेले नाहीत. चिपळुणास वाड्याचे इमारतीबदल मोरोबा माने व रघोबा आंक यास तीन हजार रुपये आपले देण्याविसी आज्ञा होऊन स्वारी निघाली, ते गुहागरास आली. रात्रौ फडके याचे वाड्यात राहिले. दुसरे दिवसी नवे वाड्यात येऊन राहिले, ते हाली दोन तीन दिवस तेथेच आहेत. आपलेकडील बिछाईत आली नाही याजकरिता बहुत रागास आले. उतर जहाले की तुमचेकडील बिछाईत येत असल्यास ठीक आहे, नाही तरी दुसरियाकडून करवितो. तेव्हा लक्ष्मण पाटील याणी उतर केले की बिछाईत पुण्याहून निघाली आहे, परंतु मार्गात झाडीमुळे कजामे फाटू लागले, साा मळ्या घाटाहून वाकड घेऊन कुभारल्यानं येत आहे, आज उद्या येईल. परंतु मर्जी फारच जात राहिली. काल ग्रहणाचा दानधर्म फार काही जाला नाही. आपलेकडील सात हजार रुपये मात्र गे(ले) * * किरकोळ हजार बारासे गेले. येकूण आठ हजार खर्च जाला. आपलेकडील श्रीमंत माहाराजास दोन पत्रे व हरि भगवंत यांचे पत्र आले ते आजच पावलें. माहाराजास प्रविष्ट केले वाचून पाहून हरि भगवंत यांचें पत्र व त्याच माराचे आपले दोन्ही कागद माहाराजानी आपलेजवळ ठेविले. दुसरे पत्र लाखोटा बिछाईतीचे माराचा होता तो वाचून आपले

स्वाधीन केला. आज मर्जी बरीच आहे. आज आज्ञा जाली की पुण्यास शुक्रवारचे वाड्यातील भोजनखर्चाबदल पंधरासे रुपये देऊन पावत्या आणावाव्या, त्याजवरून लिहिले आहे. त्यास तेथें रावजी लेले यास पाचसे व बाबाजी खटावकर यास पाचसे व बापू भिकाजी भिडे यास पाचसे येकूण तिघास पंधरासे रुपये देऊन पावत्या पाठऊन देण्यास आबास व भाऊस आज्ञा व्हावी. स्वारीचा बेत शनवारी पंचमीस गुहागराहून निघान चतुर्दसी * * दाहावे रोजी * * जावें असा बेत जाला आहे. खचित समजले म्हणजे मागाहून लिहून पाठऊ. वरकड आज सायंकालपर्यंत यथास्थित आहे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. ताजा कलम पुणियाहून पत्रे डाकेत आली होती ती मागती आपल्याकडे पाहावयास पाठविली आहेत पावतील. सेटजीकडील ही लखोटा तसाच आहे. सरकारची स्वारी पुणियास मार्गसीर्ष वा त्रयोदसी चतुर्दसीस येत आहे. साल गुदस्ताचे हप्त्याचा ऐवज आपलेकडील मिलकतवंदी जमा धरतात त्यास येसू पवार व विठोजी कारके व गणपतराव परभू व बाजी महिपत व मेकोजी खैर यांपैा कोणाकडे किती ऐवज थकला याची याद खास रुजुवात करून आधी पाठऊन द्यावी म्हणजे समजाऊन त्याप्रमाणें जमा कसती धरतील. याद न आल्यास जमा धरल्यावर मग उपाये नाहीसा होईल. आताच आम्ही याद कशावरून समजावी म्हणोन लिा आहे. तरी याद आली पाहिजे व आबा बास याजकडे पांच हजार रुपये दिल्हे. पांच हजार मागीलकडील वसलातीवा ठविले. त्यास याद देशमुखाचे विद्यमाने करून पाठवावी म्हणजे मागनिलेमी बोलावयास नीट पडेल. वरकड बंदोबस्त यथास्थित आहे. कामकाजाचा बोभाट नाही. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Balaji Lakshman Salkade and Gopal Atmaram write from Guhagar probably to Sadashiv Mankeshwar, explaining how Bajirao on his visit to that place was inconvenienced for want of furniture at the new palace at Guhagar where he was staying.*

---

*No. 80*] [*1815 ?*

श्री

विनंती विज्ञापना. करीमखाची सल्तनत तोफा वगैरे मागे थकून राहत गेले ते फौज व पलटण याणी लुटून घेतले. सडा कोश्यास गेला. त्यास आपलेकडील हाल्कर यांस कोश्यास आगर जेथे तो असेल तेथे जाणे प्राप्त. सा खुले लाखोटे

+ मार्गशीर्ष वा ५ मोहरम १८.

7058

हांत त्यास थैलीत घालून थैलीवर मोहर करून वर बकोरा कोटे येथें आपल्याकडील बापूजीना लाड आहे त्याचें नांव लाऊन थैली आपलेकडील हालकाऱ्याजवळ दिल्ही आणि सांगितलें की, मार्गांत पुसनारच नाही आणि कोणी पुसल्यास कोठ्यास जातो म्हणौन सांगून जात जावें. करीमखाचे दड्यांत[2] गेल्यावर थैली फोडून लखोटे करीमखास द्यावे. याप्रो त्यांचे केले व मितूकडील वगैरे लखोट्यांचीहि थैली करून व उज्यनकराचे नांव बकरा लाऊन थैली दिल्ही आणि सांगितलें कीं मितूचे दड्यात गेल्यावर थैली फोडून मग पत्र द्यावी याप्रो केले. कळावे. याचे कारण हेंच कीं, मार्गांत कमाविसदार दर माहाली उगीच पुसतापास करितात, तेव्हा हालकाऱ्यांनी पाऱ्हाळे कशास द्यावे? सा थैल्या केल्या. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This letter describes how secret communications used to be sent to Karim Khan and Cheetoo, leaders of the Pindaries, who were in hiding.*

---

*No. 81*] [*20-2-1815*

**श्री**

सेवेसी गोपाळ गणेश विज्ञापना ता। छ २१ माहे रोवल पो। साहेबाचे कृपावलोकणेंकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील मजकूर ये संस्थानोहून कुंभगर्मीयाचे निा भला माणूस उतर दिसेस गेला. त्याणे मजला पत्र पाा आहे तो माार कार्तिक वद्य ८ निघोण आंतरवेदचे रस्त्याने पाहाडातून अमरसरास[3] आलो. पाहाडी राज्याच्या भेटी होऊन पकाइत करून आलो. रंजितसिंग सीक याची भेट जाली. जितकी खातरीची बोलणी होती तितकी पकी जाली. आणि येथून आटकपार वलिर्टीवाले मीरन नरशा याजकडे हालकारे रवाना केले आहेत. काबलवाले याची व रंजितसिंग याची दोस्ती होऊन काबलवाले याचा वजीर फतेखान व रंजितसिंग याची फौज येकटी[4] होऊन कास्मीरखाली केली. येथे पत्र माघ शुा ११ तिसरे प्रहरी आली. बहुत खुसी होऊण तोफा जाल्या. पलटणची रंजक जाली. पुढे फौजा मुलतान खाली करावयासी जाणार. काबलवाले यांचा व रंजित सिकाचा हा करार ठरला आहे. उभयताच्या फौजा येकठ्या करून तोब्रावर जावे या प्रमाणे कुरान-कसमा जाल्या आहेत. आण आम्हास आज्ञा जाली आहे. मागती आम्हास पत्र यावे म्हणजे आमची तयारी आहे. याजकरिता मुदाम हलकारियाची जोडी पाठविली आहे. जर करिता पत्रे आली तरी आमचे बोलन्याची शोभा आहे. नाही तर उठोन माघारी येऊं. आपण

1 The name of addressee. 2 Ambush, Concealment.

३ अमृतसर. ४ एकत्र.

आज्यारक्षकाकडील पत्रे पाठवितो म्हणोन बात्राणी करार केला होता, त्यास अद्याप पत्रे आली नाहीत. विस्मरणात गोष्ट आलीसी दिसती. तरी पत्रे पाठवावी. पुणे ग्रामीचीहि पत्रे आली असता बहुतच चांगले आहे. आमचे कराराप्रमाणे इकडील सरदार कायेम आहेत. परंतु खावंदाचा भरोसा येत नाही, यामुळे जेथे तेथे कच्चाई पडती. त्यास आतून पुणे ग्रामीचीहि ताकीद आसावी. राजश्री कृष्णाजी नाईक मावारी आले किंवा नाही तहि ल्याहावे. येथे धारण सात शेर पके आहे. चारा मिळत नाही. हे वर्तमान शटकर्णी न जावे म्हणोन शपत पुरस्सर लिा आहे. येथील मजकूर कुंभरासी काल रात्री लग्नसिद्धि करून आले. आज उदईक तिकडील पत्रे तयार होतील. त्यातील मजकूर काही समजल्यात आला म्हणजे तो मजकूर व हे आले पत्र तेच बजिनस शेवेसी रवाणा करितो. सिकाचा इरादा कायेवाचे पकेपणे आहे. मालमजकुरी येक दोन कामे याणे थोरली केली. याची जरब पडली. यात आपणाकडून उभयतास ताकीद व सरस्वतीचा (?) उपराला पुरल्याणे सहजात रूपास येऊन सेवकपणा दिसन्यात येईल, अथवा आपले पत्र तिकडील साधणकरी यास आले तर तितक्यावर तो हुकूम वज्यावील. त्याचे घरचे पत्र पाा आहे, ते पैतेप्रा[1] प्रविष्ट होऊन उतर यावयास आज्ञा जाली पाहिजे. पत्रावर येकवल खाली मी आपले हाते लिा आहे. त्याजवरूण ध्यानास येईल. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Gopal Ganesh the writer appears to be an agent sent by Bajirao to some of the powers in northern India to organise them for making a united attack against the English. He sends news from the Court of Ranjit Singh of Lahore and of Kabul and Kashmere, and asks for money. Certain Code-words such as Kumbha-rashi appear to be used herein.*

---

*No. 82]* *[29-3-1815*

**श्री**

विनंति उपरी. आपण छ १७ राबलचे पत्र पाठविले ते पावले. श्रीहितानी सुचविले कीं खासा स्वारी राजधानीस यावयाचा समारंभ पाहावयाची इछा गंगाधर शास्त्री यांचे चित्तांत बहुत. त्या अनुकाराचे शब्द त्याचे कोंठ निघतात. याजकरितां खासा स्वारी येईल तेव्हा समागमे हुजरात वगैरे फौजेचा भरणा आहेच. तथापि पटवर्धन वगैरे पथके कोपरगावाकडे नेमली आहेत त्यात पटवर्धन जातीने खासे

[1] पत्ता लिहिल्याप्रमाणें.

हजारपाचशानी कोपरगावी विंचूरकरापासी राहून त्याची वरकड फौज खासा स्वारी समागमे पुण्यास आणिली तरी बाध नाही. खासा स्वारी समारंभाने राजधानीस पोहचल्यावर. पटवर्धनाची फौज माघारी कोपरगावास जाईल. स्वारीचा जमाव मातबर असावा म्हणजे शास्त्रीचे समाधान होईल. याआन्वये बोलून स्वामीकडे विनंति ल्याहावी म्हणोन सांगितले. त्याजवरून विनंति लिहिली आहे. खासा स्वारीबरोबर वरकड फौज येतच आहे. पटवर्धन सरलस्कर याची पथके कोपरगावाकडे नेमली, त्यात खासे पटवर्धनानी हजार पाचशानी कोपरगावी राहून त्याची वरकड फौज खासा स्वारीसमागमे यावी. येथे आल्यावर माघारे जातील. गोखले याचे फौजेची तयारी करविली आहे. स्वारी येण्याचे बेतास येक दोन मजली स्वारीत पाठवावयाची आज्ञा आल्यास पाठवीन. हती सूत्रनाला वगैरे स्वारीचा सर्व लवाजिमा बरोबर आहेच. यातून चारणीस वगैरे आन्यत्र स्थली जो सरंजाम असेल तो स्वारी राजधानीस पोहचावयाचे संधीस येक दोन मजला आगोधर स्वारीत येऊन पोहचावा. येथे आसेल त्याची आज्ञा सादर होईल तसी रवानगी करून देईन. गोखले याचे फौजेची तयारी करविली. निपाणीकर याचा जमाव तूर्त येतां दिसत नाही. त्याची रदबदली आलफइस्टीन करितात. अद्याप काही ठरले नाही. स्वामीकडे विनंति लिहिली, आज्ञा येईल तसा इतला करीन, म्हणोन उतर सांगितले. त्यास पेशजी विनंति लिहिली त्याची आज्ञा सादर व्हावी. विंचूरकर निपाणीकर आकलकोटकर कितुरकर याची पथके पुढे खानदेशात आहेत ती तसीच जेथील तेथे आसावी. रा। नारोपंत आपटे व विसाजीपंत वगैरे हुजरातीचे पथके त्या प्रांती आहेत ती खासा स्वारीबरोबर पुण्यास येऊन स्वारी दाखल जाहाल्यावर माघारी ज्या स्थलची त्या स्थली गेल्यास चिंता नाही. कोपरगावावर पटवर्धन हजारपाचशानिसी व रूपराम याची पलटणे राहून वरकड स्वारीबरोबर फौज यावी. येथे दाखल होताच दुसरे दिवसी माघारी रवानगी करिता येईल. बारा तेरा तेरा दिवसाचा मजकूर आहे. श्रेहितानी सुचविले व शेवकाचेहि मनांत आले त्याची विनंति लिहिली आसे. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The letter mentions the arrangements to be made for companies of soldiers being sent on attendance of the Peshwa when he enters his capital in procession. This is specially suggested by the writer as Gangadhar Shastri wishes to witness the pageant.*

No. 83] [29-8-1815

श्री

यादी पत्राची रवानगी सुा सीत आशर मयातेन व अलफ सन १२२५ छ २३ रमजान श्रावण वा ९ मंगलवार पत्रें.

१ तीर्थस्वा राजश्री नानासाहेब याचे नावें मुख्य पत्र कलमे सुमार ९ येकूण रवाना टेंभुर्णी पत्र.

बनाजी हैबतराव याचे नावें रवाना भागानगर.

१ मुख्य पत्र: तुम्हीं छ ५ व छ १० व छ १५ रमजानची पत्रें पुरवण्यासहित पाठविली तीं छ १२ छ १६ व छ २१ माहे मजकूर पावलीं. नवाबाचे सरकारची दिनचर्या आखबार इा छ २४ शाबान ता छ १३ रमजानपावेतों पाहाण्यांत आली. तुमचे पत्राचीं उत्तरें व इकडील मजकुराच्या पुरवण्या आलाहिदा पाठविल्या आहेत त्यांजवरून मजकूर समजेल. तीा राजश्री नानासाहेबांची व आमची प्रकृत बरी आहे. गंगाधरशास्त्रीस त्रिंबकजी डेंगळे यांणी दगा केला म्हणोन इंग्रजाकडे कोणी समजाविले. परंतु पता मुदा कांहीं नाहीं. उगाच आरोप दिसतो. चौकसी होत आहे. येविशीं सरकारांत तिकडून सवाल आहे. सत्यमिथ्य कळत नाहीं. रुजुवातीअंतीं ठरेल ते खरें. येविशीं हरदो सरकारांत संशय आले म्हणोन तेथें कोणी गपा उठवितील त्या ऐकूं नये. दोही सरकारची दोस्ती मजबूत. त्यांत अशा रकमा निघाल्या तरी बयान होऊन जे होणें ते होईल. परस्परें बाजारी आवया येकून उगेच विचारांत पडाल म्हणोन लिहिलें असे. तरफैन सरकारचे दोस्तीचे रस्त्यांत बालाग्र अंतर नाहीं व व्हावयाचेंहि नाहीं. सरळ पूर्ववत दोस्ती चालत आहे म्हणोन पत्र.

१ क्षेत्र राजराजेश्वर येथें श्रीमंत माहाराजांचे सरकारांतून आनुष्ठान आहे. तेथे कोनाराव व मिनाराव नागारडी वगैरे जमीदार मुफसद यांचे पारिपत्यास नवाबाचे सरकारातून जमियत गेली. त्याणी क्षेत्रास उपद्रव देऊन गांवची चिंधीचोळी केली. त्याजबराबर आनुष्ठानाचे ब्राह्मणाकडील भांडी वगैरे चीजवस्त गेली. हे वर्तमान राज्याजीस समजताच ब्राम्हणांचा सत्कार उतम प्रकारे करून ब्राह्मणाची चीजवस्त वगैरे काये घेतले ते माघारे द्यावे व पुढें उपद्रव देऊ नये म्हणोन ताकीदपत्रे व चोपदार पाठविले हे तुमचे लिहिल्यावरून

समजण्यात आले. प्रस्तुत श्रावणमासाकरिता क्षेत्रांतील ब्राह्मण आले त्याणी मनस्पर्श गिला केला. आणि पुढे आनुष्ठान चालावयास निर्वेध जाले तर चालेल, नाही तर आज्ञा होईल तसे करू म्हणोन ब्राह्मणानी समजाविले. त्यावरून सरकारची आज्ञा जाली की, वकिलास लिहून कारभारी यासी मजकूर करून क्षेत्रास उपसर्ग न लागे ते करावे. त्याजवरून तुम्हांस लिहिले असे. तरी राजे चंदूलाल बाहादूर यांसी, सरकारचे आनुष्ठान क्षेत्रांत आहे, तेथे उपद्रव हरयेकविशी न लाविता मुफसदाचे पारिपत्य करून बंदोबस्त करावा म्हणजे आनुष्ठान निर्वेध चालेल. बंदोबस्त राज्याजीनी करून दिल्ह्याचे इकडे ल्याहावे. त्याप्रमाणे हुजूर विनंती होईल. तिकडून रक्षणाचा बंदोबस्त चांगला जाला तर आनुष्ठान चालेल. न जाल्यास आनुष्ठान चालणार नाही. येथून रक्षणाची तरतूद आसावी असे तेथील विच्यार जाल्यास दोनसे माणसे रखवालीस सरकारातून पाठऊन रखवाली करिता येईल. राज्याजीचे विच्यारे नेमात येईल तसे उतर पाठवावे म्हणोन पुरवणी.

१ इंग्रजाकडील सिंपी व सुतार यांजकडे शहरातील आसामींचे कर्ज येणे याजकरिता मुबारूजुदौला याणी सिंपी व सुतार यास बसविले, यास्तव तेथे मझला पडला ते वर्तमान छ १९ रमजानपावेतो लिहिले ते सविस्तर समजले. पुढे बहुतकरून मिटले असेल. कसे ठरले हे लिहून पाठवावे म्हणोन पुरवणी.

१ चिरंजीव सखाराम चिमणाजी याजकडे सरलस्कर याचा मोकासा आहे. त्या प्रकरणी त्याणी मजकूर समजाविले. त्याणी पुरवणी आलाहिदा असे.

---

५

१ टेंभुर्णी व नरसिव्हपूर येथील इमारतीचे कारखाने प्रकरणी कलमबंदी पुरवणी आली होती. त्याची उतरे कलमाचे कलमावर लिहून तीच सदरहू पुरवणी वडिलाकडे पाठविली.

---

६

साहा कागद मिलोन लाखोटा तीा नानासाहेब यांचे नांव करून टेंभुर्णीस रवाना डांकेवर.

¶*Copies of a few letters despatched to Tembhurni, probably to some relative of Sadashiv Mankeshwar. One letter mentions that the murder of Gangadhar Shastri had not affected the relations of Bajirao with the British Government, and adds that an enquiry was being made. Nanasaheb mentioned in the letter appears to be a relation of Sadashiv Mankeshwar.*

7063

No. 84] [21-7-1815

डे. क. नं. १७१

घोरपडे सरकारचे कारकून व माणसे समागमेच वाड्यात आले. तदोत्तर लस्करात सरकारचे दोंघे प्यादे व आपला जासूद पाठऊन ग्रहस्त वगैरे काही मंडली आणऊन बिराडाचा बंदोबस्त करून सरकारचा कारकून वाड्यात येऊन प्रेत घेऊन काही मंडली व सरकारचे सिपाईसह नाकेबंदीतून नदीवर पुंडलिकाचे उजवे हाताचे बाजूस दहनविधि करून उज्यडतानी मंडली सारी बिराडास आले. छ १३ रोज आषाढ शुा १५ भृगुवार रोज गुा हजीर वीस कारकून व सिपाई येण्याजाण्याचे नाकेबंदीवर परवानगी दिल्हे. त्याचे काम जाहाले सबब त्यास जावयाचे सांगून त्या कारकुनासमागमे डेंगले याजकडे मोरोपंत व आबा घोरपडे उभयेता होलकराचे वाड्यात जाऊन भेट घेतली. जाहाला मजकूर त्यास आबानी समजाविला होताच त्याप्रा समजाविला आणि सांगितले कीं शास्त्रीबावाचा काल आशा प्रकारे जाहाला. त्यास याची चौवकसी करणे. आपण त्याचे स्नेही व सरकारहि आपण, यास्तव आपणाकडे. त्याचे उतर त्याणी केले की मी आतून बारीक चौकसी करीत आहे, परंतु नाव कोणाचे कशावरून घ्यावे? मुदा काही हाती नाही. तेव्हा हे उभयेता बोलले की शास्त्रीबावाची ही गत जाली. पाठीमागे आपण त्याचे स्नेही व सरकार याजमुले आपणास श्रुत केले व स्नेहाचा धर्म मिलोन मागे करणे हेच योग्य. समक्ष असता भिंडने वडणे ते घडते. त्याचे उतर प्रसंगानुसार परीक्षा समजेल. त्यावर शास्त्रीबावाचे गुणानुवाद व स्नेहभावहि वर्णन करून माहाराजहि बहुत दिलगीर आहेत, आज माहापूजा करावयाचा बेत होता तो राहिला म्हणोन सांगितले. समागमे मनुष्य थोडी, शेपणास माणसाखेरीज बाहेर फिरू नये, तुम्ही कारभार करिता याजमुले मी सांगितले. त्याचे उतर उभयेतानी सांगितले कीं माणसे नव्हती आसा आर्थ नाही. परंतु यात्रेत फार माणसानी यात्राकरीयासी धकाधकी होईल व न जाणो येखादेसमई कटकटहि होईल यास्तव आणीत नव्हते. तसा आपला व श्रीमंताचा स्नेह याजमुले गरजच नव्हती. आमचे दुसमान कोण आहेत याची माहितगिरी आपणास आहे. दगेकरी करनाटकी होते असे वाटते म्हणोन सांगितल्यावर डेंगले याणी उतर केले की स्नेह खरा, परंतु आकाशाचे कुन्हाडीस काय करावे? परभू आहेतच. दुसरे कान्होजी गायेकवाड कर्नाटकात ठेविले आहेत व चेलेहि दुसमान, नांव कोणाचे घेवत नाही, असो. तुम्ही सर्व बंदोबस्त कारखान्याचा वगैरे ठेवावा म्हणोन खातरजमेनी सांगू लागले. नंतर यानी सांगितले बंदोबस्त करणाराची ही गत जाली, तत्रापि आमच्यानी जाला बंदोबस्त केला आहे. आपण माहाराजास

विनंति करून पुणियास शास्त्रीबाबाचे चिरंजीव व राजश्री बापू आहेत तेथे जाण्याची आज्ञा देवावी. पुढे क्रिया होणे सबब. त्याजवरून आता माहाराज स्नानसंध्या व देवदर्शन मिळोन दोन प्रहरपर्यंत गाठ पडणार नाही. दोन प्रहर नंतर आज्ञा घेऊन सांगेन. दोन प्रहरी यावे. याप्रो सांगितलेवर येथे येण्यास प्रतिबंध यास्तव पेशजी प्रो आपलेकडील सिपाई द्यावे, त्याजवरून पेशजीचे व आणखी येक सिपाई दिल्हा तो घेऊन उभयेता बिराडास आले. नंतर दोन प्रहरीं मोरोपंत व बापू चिपलोणकर याजकडे तात्या डेंगले याणी लक्ष्मण पाटील याजसमागमे इशारा सांगून पाठविला त्यावरून गेले. तेव्हाही बोलणी सदरहूचे धोरणानेच जाहाले. मोरोपंतानी पुसिले, जाण्याची सरकार आज्ञा घेतली कीं नाही? त्याचे उतर केले की गुप्त तयारी ठेवावी. मी माहाराजाची आज्ञा घेऊन आपाबरोबर सांगून पाठवितो त्याप्रो निघोन जावे. तुम्ही येऊ नये म्हणून सांगून विडे देऊन रजा दिल्ही. हे वाड्यात आले. नंतर च्यार घटका दिवसास लक्ष्मण पाटील याजसमागमे मोरोपंत यानी सांगून पाठविले कीं आम्ही निरोपाची मार्गप्रतीक्षा करीत आहो. आपा निरोप घेऊन आद्याप आले नाहीत. पुढे कसे करावे? त्याप्रो पाटील मजकूर याणी जाऊन सांगितले. त्याचे उतर सांगावयासी आले की सरकारची आज्ञा घेतली. उदईक कूच करून जावे. त्याप्रो पाटील याणी सांगितल्यावरून मंदवारी प्रातःकाळी कूच करून सरंजामसुधा बुधवारी प्रहर रात्रीस पुणियास आले. दगेकरी याणी कर्नाटकी तऱ्हेचे चोलणे घातले होते, याजमुळे करनाटकी असा भास ज्याणी पाहिले त्यास जाला. परंतु शास्त्रीबावास मारून जातेसमई 'पुरे जाले' हे आक्षरे मराठी भाषेनें बोलले, मग कर्नाटकी असोन मराठी बोलले किंवा मराठे असोन कर्नाटकी वेष हे नकले.

¶*The paper narrates the circumstances under which Gangadhar Shastri was murdered at Pandharpur.*

---

*No. 85]* *[15-8-1815*

श्री

यादी पत्राची रवानगी छ ९ रमजान श्रावण शुध ११ मंगलवार आडीच प्रहर दिवस सन १२२५ सीत अशर मयातैन व अलफ. पत्रे.

१ तीर्थरूप राजश्री नानासाहेब यांचे नांव मुख्य पत्र, हैदराबादेची पत्रं लिहिली आहेत ती आवलोकन करून डांकेवर रवाना करावी म्हणोन.

६ बनाजी हैबतराव याचे नावे.

१ मुख्य पत्र, तुम्ही छ २९ शाबानचे पत्र पुरवण्यासहित पाठविले ते छ २ रमजानी पावले मजकूर समजला. इकडून त्याचे उतरे व

इकडील मजकुराची पुरवणी आलाहिदा पाठविली आहेत. मजकूर समजेल. नवाबाचे सरकारची आखबार छ २० शाबान ताा छ २३ माहे मजकूरची पाठविली ती पाहाण्यांत आली म्हणोन.

१ पुरवणी, श्रीमंत माहाराजांची खासा स्वारी क्षेत्र पंढरपुरास गेली होती. तेथे यात्रा सांग होऊन श्रीचा निरोप घेऊन छ २६ शाबानी कूच जाले ते छ ३ रमजानी राजधानीस आडीच प्रहर दिवसास बुधवारी दाखल जाली. श्रावण मासचा समारंभ साला-बादप्रा प्रतिपदेपासून पंचमीपर्यंत खिचडी ब्राम्हणास वाटून पष्ठीचे दिवशी रमण्यात खासा स्वारी जाऊन दक्षणेस प्रारंभ करून सप्तमीस आस्तमानी तोफा सोडून समाप्ति केली. ब्राम्हणसमुदाय दक्षणेस पुष्कल आले.

१ पुरवणी राज्याजींनी[1] दोस्तीचे विचार तुम्हास घराऊ सुचविले हे दोस्तीचे इराद्यास चांगले. परंतु प्रस्तुत येथील क्रम बोलण्याचा चांगला आहे. त्यांत नालीस कधी मारनिलेची आली नाही व दुसरे द्वार खुलसहि समजला नाही. तुम्ही लिहिल्यावरून ताजूब वाटले. शोध करविला आहे. बोलण्यांत उपयोगी नाहीत व साहेबाची मर्जी असे समजल्यास हुजूर विनंती करितां येईल. कामाकाजांत बोलण्यांत ताडा (लढा) पडून येखादे काम तटावर पडावे असेहि जालियांत नाही. तथापि येथून तेथे उद्गार समजल्याखेरीज तेथे वार्ता कशास निघेल? तुम्ही लिहिल्यापासून त्याच शोधात आहे. याच प्रकारे राज्याजीकडे येथील नूनाधिक समजल्यास दोस्तीचे इराद्याने त्याणी तुम्हांस सुचवीत जावे.

१ कुंजर मारनिले यांचा माझा आति स्नेह. दुसरा विचार नाही. तथापि श्रीमंत माहाराजानी कारभारात वागविल्यास दौलत उमदा च्यार माणसे ममतेतील दौलतीत वागल्यास उत्तमच आहे. माणूस तेथे दौलत कुंजर मनसूफ सरकार लोभातील व पोख्त पहिले वागलेले ते दुसरे रस्त्याने जाणार नाहीत. सर्व कर्णे खाविंदाकडे. जे होणे ते समजोन होईल, राज्याजींनी दोस्तीचे इराद्याने तुम्हांस सांगितले येणेकडून संतोष वाटला.

---

1 Raja Chandulal.

१ श्रीमंत माहाराजास सालगुा जेष्ट मासी कन्या जाली होती तिजला खोकल्याचा उपद्रव होऊन छ ६ रमजानी शनिवारी मागील च्यार घटका रात्री देवआज्ञा जाली म्हणोन.

१ चिरंजीव रा सखाराम चिमणाजी औरंगाबादेस वकिलीचे कामावर आहेत. तेथे गोविंद बक्ष यासी बोलण्याचे मजकुरावरून दुरुस्ती नव्हती. तो आलफिंष्टिनसाहेब सहल करावयास तिकडे गेले त्यासी याणी मजकूर केला, परंतु सफाई जाली नाही. तो साहेब मवसूफ वेरुलाहून माघारे फिरले. त्याजसमागमे चिरंजीवहि पुण्यास आले. माघारे लौकर साहेब फिरले म्हणोन बोलणी तसीच राहिली म्हणोन पुरवणी.

६

७

पत्र सात तीं राजश्री कृष्णराव माणकेश्वर याचे नावे लखोटा करून टेंभुर्णीस रवाना केला असे.

¶*This paper gives some details of Bajirao's movements and actions. It contains short summaries of letters despatched.*

---

*No. 86*] [*8-10-1815*

पो छ १७ जिलकाद
सन सीत आशर

श्री

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**वामनरावजी तात्या स्वामीचे शेवेसी**

पो त्रिबक बाबाजी जोसी क्रुा साा नाा विा. येथील कुशल ताा छ ५ जिलकाद रोज रविवार पो मुा हुबली येथे सरकारचे फौजेत सुखरूप असो विशेष. आलीकडे आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी येणाराबरोबर पत्र पो आज्ञा केली पाा विा. इकडील वर्तमान राा केसोपंत निाा पिराजी सोनवणी याजबरोबर पत्रें पाा तीं पावलीच असतील त्याजवरून श्रुत जाहाले असेल. आलीकडील वर्तमान निपाणकराकडील केरबा सिंदे म्हणून स्वार पायदल घेऊन सरसुभांचे कुमकेस होते. त्याणी आपला जमावसुधा

7067

किलेकरास मिलोन छ २७ सवाली हावेरी पेंठेचे मोर्च्यावर येऊन लढाई घेतली. मोर्च्यावर सरकारचें शंभर स्वार व आबदुल वाहाब आरबाची बिरादरीचे लोक होते तेथे मोठी लढाई जाहाली. सरकारचे लोकानी कस्त चांगली केली, परंतु त्यांचा जमाव फार याजमुले व काटक सरसुभाकडील व कितुरकराकडील निघाले. त्याजमुले आरब फार जाया जाहाले. मोर्चा सोडून मंगलवार पेठेत आले. दुसरे दिवसी छ २८ रोजी किलेकरी व निपाणकराचा झाडून जमाव पेंठेवर आले, तेव्हा काटक लोक झाडून तोंड न घेता मागे सरले ते नीट पेठेतच आले आणि लढाई चालली. सरकारचे लोकाचे मोर्च्यात तोफ होती ती घेऊन लढत गोल बांधून तोफ घेऊन संभाळून निघाले. सरसुभांचे मोर्च्यात जंबुरा होता तो घेऊन ते निघाले, ते वेसीमध्ये जंबुराचे भारकस तुटून तेथेच राहिला. निघाला नाही. त्यांचे लोक पेठ घेऊन बाहेर तल्यात मागे मारीत आले तेथे काटक पलत आसता दाहापाच जाया केले. मग सरकारचे वगैरे स्वारानी तेथे लढाई चांगली दिल्ही. माघारे पेठेत नेऊन घातले ते पेंठेतच उभे राहिले. रा हैबतराव सुभेदार फौजसुधा मागे मौजे आमरगोलास येऊन उतरले. आपण गढीत बसून लोकास आत येण्याजाण्यास आटकाव करू लागले. तेव्हा दुसरे दिवसी लोकानी येक दिवस त्यास धरणे बसून त्याजकडून येकूणतीस हजार रुपयांची जखमान्याबदल व मयतान्याबदल व घोडी ठार जाहली त्याजबद्दल व हात्यारे व दारूगोलीबदल वगैरे सावकारी निशा घेतली. तेच रात्री हैबतराव गावात निजावयास गेले ते मागील दिंडीवाटे रात्री निघोन कोणास न पुसता गेले, आसे प्रातःकाली सर्वास समजले. नंतर फौज बहिरबुनगेसुधा हुबलीस आली. येथेहि हुबलीत हैबतराव आहे नाही कलत नाहीं. किल्यात कोणास घेत नाहीत. कुसेगलासहि गेले आसे म्हणतात. तालुक्यात काटकाई उभी राहिली. तमाम जमीदार जमाव करून ठाणी घेऊ लागले. कलघटगीचे ठाणे देसायाने घेतले म्हणून आताच वर्तमान आले. आसे जाहाले आहे. आजपरियंत लोकसुधा चाकरी हल्यां मोर्च्यात कस्त करून केली. सरदार ह्या तऱ्हेचा. निर्फळ जाहाली. असो. आजपरियंत हैबतरायाचे तैनातेस सरकारचे लोकानी व आम्ही चाकरी केली. हाली मारनिले आदश होऊन बसले. पुढे लोकानी व आम्ही कोणाचे हुकमात वागून कोणाची चाकरी करावी येविसीची आज्ञा यावी. जखमान्याबदल येवज हैबतराव याजकडून लोकानी घेतला तो सावकाराकडेच आहे. येथे आम्ही कोणास देत नाही. मागील जखमान्यांचा पट आकारून पा आहेच. आलीकडील जखमी व ठार यांची यादी आकारून मागून पो. जखमान्याचे व घोड्याचे आख तेथूनच पडून यावे. त्याजप्रो करू; अगर जसी सरकारची आज्ञा

येईल त्याजप्रो करू. सरसुभांचे नेमणुकेस सरकारी दोन हजार लोक व सवाशे स्वार आहेत त्याची हजीरी घेऊन रोजमुरा हातावर द्यावा म्हणून पत्र यावे म्हणजे त्यात सरकारचे काम होईल. येक महिन्याचा रोजमुरा ह्या लोकाबरोबर हुंड्या परभाऱ्या याव्या म्हणजे समजेल. सूचना विनंती लिा आहे. बहुत काय लिा कृपा लोभ करावा हे विनंति.

¶*Trimbak Babaji reports to Vamanrao details of fighting at Hubli.*

---

*No. 87*] [*1816?*

श्री

यादी कलमे दीक्षित याणी सदासिवपंत भाऊ याचे विा ठराऊन द्यावी ते येणेप्रो:—

१ श्रीमंत माहाराज प्रात:काळापासून रात्रपर्यंत काय बोलतात, कोणासी खलबत करितात हे ह्माडून वर्तमान रोजचे रोज कलवीत जावे.

१ जातीने सरकारचा कारभार करितील त्याची वरदी रोजचे रोज द्यावी.

१ सरकारफौजेचे सरदार यास माहाराज आनून बंदोबस्तास कोठे पाठवितात, व सरंजामास मोघम काय देतात ही बातमी कलवावी.

१ श्रीमंतास पत्रे येतात त्याची उतरे काये देतात हे तावार कलवीत जावे.

१ महिन्याची हजरी लोकांची होत्ये त्यास ब्राम्हण व मराठे व मुसलमान किती याची हजरी समजवावी; व सिपाई यास दरमाहा काय देतात व देनगीत तोडजोड कसी करितात हे कलवावे.

१ त्रिंबकजी श्रीमंतास भेटला की नाही ही बातमी पकी काढून सांगावी.

१ पेंढारी उठले आहेत, यास आश्रय कोणाचे हे कळवावे.

१ आमची खासगत गोष्ट श्रीमंत काय बोलतील ते सांगावे.

१ नागपुरवाले भोसले याचे कारभाराविसी माहाराज काय बोलतात ते कलवावे.

सहरहू कलमे लिहिली आहेत, याची बातमी खरी सांगावी; विद्यमान सदासिवपंत भाऊ. याप्रो ठरावाची याद जाहाल्यास सर्व बोलणी बेताप्रो करार करून द्यावयासी येतील.

¶*Instructions issued to Mor Dikshit for supplying news to the British Resident relating to the doings of Bajirao. Sadashiv Mankeshwar was to ask Bajirao's sanction for supplying the required information to the Resident.*

No. 88] [25-1-1816

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री
बाबासाहेब यांसी प्रति

आश्रित मोर दीक्षित मराठे वेदोक्त आसीर्वाद विज्ञापना ऐसीजे. कसबे गुहागर येथील सरकारवाड्यांत पांथस्थ यति व ब्रम्हच्यारी व आथिती व अभ्यागत ब्राम्हण व साधुसंत व दिनांध कृपण समई येतील त्यांस आतृप्ति यथोपपन्न सिधान्नदान व विद्यार्थी भिक्षेकरी समई येतील त्यास चालीप्रमाणें सिधान्न भिक्षा व शुश्कान्न. भिक्षेकरी येतील त्यांस संप्रदायाप्रमाणें शुश्कान्न भिक्षादान व अनाथप्रेतसंस्कार वगैरे धर्मकृत्याबदल सरसालीना नेमणूक अजमासें रुा २००० दोन हजार चांदवड छापी यासी मुदत इा माघ शुा १ शके १७३७ युवनामसंवत्सरे ता पौष वा ३० शके १७३८ धातानाम संवत्सर येकूण बारमाही बेगमी बदल राजश्री आपाजीपंत आगासे याजकडून देविले ते स्वाधीन जाहाले. मिति पौष वा ११ गुरुवार युवानाम संवत्सर शके १७३७ मुा गुहागर तालुके अंजणवेल श्रा होय हे+ विज्ञापना.

*¶Mor Dikshit Marathe acknowledges to Bajirao Peshwa the receipt of Rs. 2,000 sanctioned by way of charity to the poor Brahmans and maimed beggars visiting Guhagar, the native-place of the Peshwa's mother.*

---

No. 89] [21-5-1817

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री बाबूराव गणेश
कादार क्षेत्र पंढरपूर गोसावी यांसी

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार सुरु सबा अशर मयातेन व अलफ. त्रिंबकजी डेंगला कुंपणी इंग्रजबाहादूर याचे कैदेतून पळून बंड करीत फिरतो. त्याची चौकसी करून डेंगला मजकूर याचे ठिकाण लाऊन जिवंत अगर मेला सरकारांत हवाला करून देईल त्याजला बक्षीस दोन लक्ष रुा व हजार रुपायाचा गाव इनाम इंग्रजबाहादर याचे विद्यमाने दिल्हा जाईल. याप्रमाणे खातरजमा राखोन सरकारचाकरी करून दाखवावी. याची पुर्ती चौकसी करून जो त्रिंबकजीस धरून आणून देईल त्याजवर सरकारची सर्फराजी होईल. येविसी कोणी

\+ येथून निराळें अक्षर खुद्द मोर दिक्षिताचें.

अनमान करील त्याजवर सरकारची इतराजी होईल. समस्त गरीब रयत ब्राम्हण व मराठे व वाणी व उदमी व परदेसी व मुसलमान व बेरड भील व मांग व रामोसी व रहदार वगैरे जे कोणी त्रिंबकजी डेंगला याचा पता अमुक जाग्यावर आहे असा प्रत्यक्ष सरकारात दाखऊन देतील त्यास पाच हजार रुपये बक्षीस व येक चाहूर जमीन इनाम इंग्रजबाहादूर याचे विद्यमाने पावेल. डेंगला मजकूर याचा पता ठाऊक असोन जर कोणी सरकारांत समजाविण्यास अळस केला असे विदित जाहाले तरी त्याचे पारिपत्य होईल. त्रिंबकजी डेंगला बंडवाला याचे मिलाफी असामी ब्रीतपा.

१ बापू गायकवाड शेटफलकर
१ नागोजी वाळुंज
१ रविराव सिंदे लोंणीकर
१ माहादाजीपंत नातेपोतेकर
१ तिमापा वडारी
१ गोधाजी डेंगला
१ सयाजी मुळे
१ आपाजी पा। कुरबावीकर
१ निंबाजी जाधव फलटणकर
१ महिपतराव डेंगला
१ बापू बारडकर
१ दाजी डफले

१२

येकूण बारा आसामी याचे कुटुंबाची मुलेमाणसे कैद करून बेड्या घालून बंदोबस्तीने हुजूर पोहोचती करणे व त्याची घरे जमीनदोस्त करून घरातील चीजवस्त सुतळीचे तोड्यासुधा जप्त करून त्याचा आकार होईल तो जाजती सिबंदी वगैरे खर्च लागेल त्याऐवजी घेणे व त्यांची इनामे वतने वृत्ती असतील त्या जप्त करणे. या बारा असामी पै।। जे कोणी त्रिंबकजी डेंगला यास धरून आणून देतील त्याचा आपराध माफ होऊन वर लिहिल्याप्रमाणे बक्षीस पावेल. या बारा आसामी खेरीज करून बंडाचे मिलाफी स्वार व पायदल व कारकून व शागीर्द पेशा वगैरे बंडाची चाकरी सोडून आपलाले घरी येऊन जमीनदार व मोकदमासी रुजू होऊन राहिले असता त्यास बंडाचे मिलाफाचा अपराध माफ केला जाईल. बंडाची चाकरी सोडून आपलाले घरी येऊन जमीदार व मोक-

दमासीं रुजू होऊन राहिले असता त्यास बंडाचे मिलाफाचा अपराध माफ केला जाईल. बंडाची चाकरी सोडून न आल्यास वर बारा आसामीचे पारपत्य करावयाचे लिहिले आहे, त्याप्रमाणे याचे पारपत्य करणे. बंडाचे मिलाफी गरीब लोक यातून कोणी त्रिंबकजी डेंगळा याचा पता लाऊन प्रत्यक्ष सरकारास दाखवून देईल त्यास वर लिहिल्याप्रमाणे बक्षीस पावले जाईल. जाणिजे छ ४ रजब *आज्ञा प्रमाण.

¶*The Peshwa announces a reward for the capture of Trimbakji Dengle and his twelve accomplices.*

---

*No. 90*] [*4-7-1816*

छ २२ साबान

सन सबा

**श्रीगजाननः**

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक लाडोजी वरपे कृ।। वि।। येसीजे. येथील क्षेम ता।। छ ८ साबानपावेतो मुकाम नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान छ ६ मिनहूस साहेबाचे सेवेसी विनंति लिहिलीच आहे. त्यानंतर पुण्याहून राजश्री सदासिव बापूजी घारपुरे याची पत्रे रा। मुधोजी भोसले यास आली ती रा। राघो धोंडदेव नि।। नारायेणराव वैद्य यानी नेऊन गुजरली. त्यांणी वाचून पाहून उत्तरे प्रत्योत्तरे जाली याचा तपसील मा।रनिलेनी नारायेणराव वैद्य यास लिहिला आहे तो सेवेसी विनंति करतील. दुसरे रा। गुज्याबा गुजर याजकडे रसाला व आरब वगैरे पायेदल होते ते काहाडून घरी बसविले आहे, आण फिरंगी याची दोन पलटणं चाकरीस ठेविले ऐसे ऐकत आहो. त्यास * * रोजमरा दिल्हा ऐसे बोलतात. पुढे कार्य घडेल तैसी सेवेसी विनंति लिहीन. व रा। नारायेण येशवंत चिटनीस यास बोलाऊन तेलंगखेडीस नेऊन ठेविले आहे त्याचे जवल च्यार बारीदार ठेविले आहे. त्याचे जवल कोन्हास येऊ देत नाही. यास कोन्हीकडे जाऊ देत नाही ऐसे वर्तमान आहे व सेनासाहेब याची स्त्री बकाबाई यास कैद केले असे दिसते, आण चंद्रपुरास पाठविणार आहेत ऐसे बोलत आहे. साहेबाचे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि.

¶*Ladoji Warpe sends news from Nagpur about Appasaheb entertaining British regiments in his service and of his keeping Bankabai under arrest.*

*No. 91*] [*12-9-1816*

श्री

राजश्री हरबा आबा यांसी प्रति त्रिंबकजी डेंगले रामराम विनंती विशेश. होलकरानें इंग्रजाचा थोरला माणूस मारला सबब आम्हास फासी द्यावया कर्ता मेण्यांत घालून बरोबर पंचवीस गारदी देऊन खार्डाचे काठी आणिले. पुढे फासी द्यावा न समई आम्ही पाहारेकरी यासी बोलिलो की आम्हास मारू नये, जिवंत घेऊन पुण्यास चलावे, मी तुमचे उपकार फेडीन. तव्हा पाहरेकरी बोलिले की आम्हास सोला हजार रुपये द्यावे त्यांत पंधरा हजाराचा मोहरा, रोख हजार, येकूण सोला हजार रुपये पुण्यास जानांच द्यावयाचा हमीदार द्यावा म्हणजे पुण्यास नेतो, या प्रमाणे बोलिले. तों इतक्यामधे हे आपा जोसी तेथे आले. त्यास आम्ही बहुत प्रकारें सांगून हमी दिल्हे की यास जिवंत पुण्यास घेऊन चलावे. पुण्यास जाताच सदरहू सोला हजार रुपये खुद आम्ही देऊ, दुसरे यासी संबंध नाही. याप्रमाणे जोसीबावानी हमी दिल्ही. हमीदार देतांच रात्रीचा दिवस करून ठाण्याहून आज सहावे दिवसी दिवस मावलतां पुण्यास दाखल जाहालो. हे वर्तमान कोणास न कलना पत्राप्रा सदरहू ऐवजाची तर्तूद जलदीने करून आज प्रहरे रात्रीचे आत जोसीबावाचे हातून पाहारेकरी याचे हाती ऐवज गेला पाहिजे तर आम्ही वाचतो, नाही तर जोसीबावा व आम्ही वाचत नाही. याजकर्ता ऐवज घेऊन जोसबिावा-बरोबर यावे. जोसीबावा बेत सांगतील त्या(प्र)माण करावे. उगीच गलबल करू नये. सांगतील त्याप्रमाणे चालावे. ही जिवासी गाठ आहे. याजकर्ता लिहिले असे. येथून सुटलो म्हणजे आपले फडचा * * न न बापू गोखले याचे लशकरात जाणार. कलावे हे विनंति.

¶*Trimbakji Dengle writes all in his own hand to Harba Aba communicating what measures he had concerted in order to effect his escape from the Thana prison and asking Harba to pay the promised amounts to the guards who helped him to escape. This solves the mystery of Trimbakji's escape on 12th September 1816 from the prison of Thana.*

---

*No. 92*] [*17-12-1816*

श्री

राजश्री त्रिंबकजी तात्या गोसावी यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेाे खंडेराव हुजरे रामराम विनंती उपरी. येथील कुशल ताा छ २७ माहे मोहरमपावतो मुाा कोट येथे येथास्थित असे विशेष. आपल्यापासून निघालो ते मुाा माापर्यंत सुखरूप पावलो. आपण

7073

होलकराचे लस्करात ज्या आसामीसाठी पाठविले होते त्यास त्याचा ठिकाण तेथे लाऊन ठेऊन आलो आहो. तो तुलसाबाईने आपले पाठिसी घातला आहे. मीरखान व बाईचे बोलणे पडले आहे की पाठीचे देणार नाही. याजकरिता पाटिचे मागि(त)ले तर देऊ याप्रो बोलणे जाले आहे. आपल्यास कलावे आणि ज्या कामांचे आपल्यासी बोलली आहो त्या कामाची आपल्यास फिकीर आसावी. आम्ही येथे पुढे महाराजानी ज्या कामास पाठविले आहे त्यासच कामास जातो. पंधरा दिवस तीन वारपर्यंत कार्सास जाऊन दाखल होतो. बहुत काय लिहिणे. तेथील काम माहाराज्याचे पुण्यप्रतापेकरून होईल चिंता नाही, हे विनंती. वाघ्या चांगला जाला आहे. आपल्यास कळावे.

¶[*Khanderao Hujrya writes to Trimbakji Dengle saying that the man, whom the writer was sent to take over, has been given refuge by Tulsabai who along with Meerkhan is prepared to sacrifice anything in protecting the individual.*

---

*No. 93*] [*29-12-1816*

**श्री**

श्रीमंत माहाराज राजश्री
बावा साहेब स्वामीचे शेवसी

विनंती शेवक कासी शिवराम बंदरे कृतानेक चरणी मस्तक ठेऊन सिर साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. किले सातारा येथे श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी यांजकडील साल मजकुरचा सन सबा अशर मयातैनचे खर्चाबदल तूर्त ११७०० रुा अकरा हजार सातशे चांदवड माहाराजानी पोतापैकी रा जनार्दन कोंडदेव गाडगीळ पोतनीस यांजकडून देविले ते माझे स्वाधीन जाहाले. मिती पौष शुा १० रविवासर शके १७३८ धाता संवत्सरे छ ९ सफर सन सबा अशर मयातैन शेवसी श्रुत होय हे विज्ञापना. हस्ताक्षर चिंतामण चिटको कारकून निसबत बंदरे.

¶[*Kashi Shivaram Bandre passes a receipt to the Peshwa for a sum of Rs. 11,700 received from him for the expenses of the Chhatrapati at Satara.*

---

*No. 94*] [*9-11-1817*

**श्रीभास्कर**

माहाराजाचे शेवेसी कासी शिवराम बंदरे चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विज्ञापना. तााा छ २८ जिल्हेजपर्यंत सेवकाचे वर्तमान यथास्थित आसे विशेष. श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी याची स्वारी सर्व खाशासुधा व ताई सिर्की

व बया सुरवीन ईसुधा आस्विन वा। ३० मंदवारी पाहाटेस आज्ञेप्रो। निघोन मौजे ताबवीस मुका(मा)स आलो. तेथून रविवारी मौजे इदोलीस आलो. उद्या वर जाणार. गेल्यानंतर मा।र मागाहून लि।। आज वर्जवार, सबब राहिले. श्रीमंत माहाराज छत्रपति स्वामी याणी रात्रौ जागोन लादालाद करऊन, वाटेने मेहनत अवघड जागयास उतरून चालल्यामुळे बहुत जाहाली. मर्जी बहुत प्रसन्न जाहाली. रायास संकट ते आम्हास आसी आज्ञा होऊन रायास लिहावे की, स्वस्थ असावे. ईश्वर येश देईल. शाहू माहाराज याचे स्मरण करून शत्रूचे पारपत्य करावे. बरदीचा कचा मजकूर राजश्री विसाजीपंत फाळोस्कर यास लि। आहे. शेविसी निवेदन करितील. माहाराजाचे शेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Kashi Shivaram reports the movements of the Chhatrapati and communicates to the Peshwa that the Chhatrapati is quite friendly to him (the Peshwa) and wishes success to the Peshwa over his enemy.*

———

*No. 95]* *[1816?*

## श्रीरामचंद्र

सा। नमस्कार. करीमखानाबरोबर कारकून व जासूद बातमीस आहेत. त्यास येथून सांगितले आहे की, जोपरयेंत करीमखान धरला गेला नाही तोपावेतो त्याचे बातमीस राहावे. त्याजवरून ते त्याचे बराबर आहेत. करीमखान होलकराचे लस्करात गेला आहे. तेथे जमत चालला आहे. मीरखानाचा आश्रय त्यास आहे. होलकर याणी वजेरहि दिल्ही व कादरबक्ष गेढे (?) काठाकडे जमावानसी होता तोहि त्यास येऊन मिळणार आहे म्हणून वर्धीची पत्रे आली व करीमखा याणे सरकारात विनंतीपत्र व रा। भाऊस व माझे नावाचे पत्र पो। तेहि सेवेसी पाठविली आहेत त्याजवरोन ध्यानास येईल. मारनिलेकडील वकील येथे खर्च खाऊन बसले आहेत व मारनिलेची पत्रेहि येतात, येविसी जसी आज्ञा येईल त्याप्रो। करीन. हे चोरटेभाई याचे बोलण्याचे प्रमाण नाही. आपले लगामी लाऊन ठेवावे येसेच असल्यास आज्ञा यावी, त्याप्रो। नेहमी लगामी लाऊन ठेवीन. आगर पारपत्याविसी आज्ञा आल्यास पारपत्य करावयास (सिध) आहो. सरकार माहालात खाडोली करू लागल्यास पारपत्यास फौज आलीच आहे. मोकाबलाकरिता फौजसुधा रवाना केले आहे. परतु जन्माचे चाकर ज्याजपासी होते त्यासी फिरून पडले. तेव्हा याचा भरवसा येत नाही.

¶***News is given in this letter about Karim Khan and his pursuit.***

7075

No. 96] [9-1-1817

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री बाबा
साहेब स्वामीचे शेवेसी

विनंती शेवक कासी शिवराम बंद्रे कृतानेक चरणी मस्तक ठेऊन सिर सां नमस्कार विज्ञापना येसीजे. श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी याजकडे व मातुश्री माईसाहेब याजकडे सालाबादा नेमणुकीखेरीज मर्जी खर्चाबा। साल मजकुरी येक साला

७०० श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी याजकडे
३०० मातुश्री माईसाहेब याजकडे
———
१०००

येकूण येक हजार चांदवड पोतापौ। राजश्री जनार्दन कोंडदेव गाडगील पोतनीस याजकडून आमचे तसलमातीस लिहून देविले, ते स्वाधीन जाहाले. मिती पौष वा। ६ भृगुवार शके १७३८ धातानाम संवछरे छ २० सफर सन सबा अशर मयातैन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. हस्ताक्षर विसाजी वेकंटेश शेवडे दि। मशारनिल्हे.

¶*This is a receipt for sums received from the Peshwa for the private expenses of the King and his mother Mai Saheb at Satara.*

---

No. 97] [24-1-1817

पौ छ १९ रबिलावल
इंदुवासर

श्री

विनंती उपरी माघ श्रु। ७ भृगुवारी रात्रौ श्रीमंत राजश्री यजमान स्वामींनी निद्रा केली होती. मध्यरात्रीचे समई येक हुजऱ्या न पुसता आकस्मात बिछान्याजवळ गेला, तो श्रीमंत ज्याग्रत जाले, तो त्याजला पुशिलें की तुझा राबता येथें नसतां तुजला येवढे रात्रौ येथें येण्याचें प्रयोजन काय? त्याजवरून तो चावळून बोलूं लागला, त्याजवरून त्याचे पारपत्य केले. हालीं तो हुजऱ्या राजश्री बापू गोखले याचे स्वाधिन केला आहे. तेथें लोक मनस्वी आवया आणतील; याजकरितां जालें वृत तुम्हांस कलावें म्हणोन लिहिलें आहे. पत्र कोणाचे द्रष्टीस पडूं नये. पाळणपूर झालवाड वगैरे माहालचा मजकूर तुम्ही लिहिला त्याचीं

उतरें आगोधर तुम्हास विस्तारें करून पाठविलीं तीं पावलींच असतील. येथील मुख्य जलचरानें पत्र मुंबईस कारकुनाबरोबर पाठविलें आहे. तो सर्व मजकूर तुम्हांस लिहिलाच आहे. तेथें तुमचे नेट आहे व इकड्नहि उद्योग नेटाचाच आहे. तेथेंच ते तुमचे मनोदयानरूप तुमचा फडसा करितील असें वाटतें. रवाना छ ६ रबिलावल सन सबा आशर मयातेन मंदवार आस्तमान हे विनंती.

¶*The writer makes mention of an entry of a suspicious servant into the Peshwa's room at night.*

---

*No. 98*] [*1-3-1817*

मुकाम ग्वालेर

१ आगऱ्यानजीक येमुनेस नावेचा पूल बांधिला व गव्हाचा आटा तयार होत आहे.

१ शीग्वांकडील वकील जाण्याची जलदी करीत आहेत, सा। दार्जा मोरेश्वर याणी अर्ज केला. उत्तर केलें कीं पांच च्यार रोजीं रवाना करूं.

१ इटाव्यास यमुनातीरीं पलटणें आलीं त्यांचे बातमीवर डाक बसविली. वरचेवर वर्तमान आणवितात.

—

३

छ १२ रबिलाखर.

मुकाम नगर

१ घोडनदीस पूल बांधावयाचा कार(खा)ना चालता जाहाला आहे.

१ नगरच्या किल्यांत दरवाज्याचे वाटेंतील पुलास पालथा दादर+ करविला. आंतील इमारतीची तयारी होत आहे.

—

२

छ १२ रबिलाखर.

ग्वालेर

१ हिंदुराव घाटगे याजकडून बुधसिंग यास दिली आगरा लाहूर येथें पाठविलें.

१ आगऱ्यास च्यार पलटणाची तयारी आहे.

१ ज्यान बतीसाचे वकिलानें खर्चाविशी अर्ज केला. त्यासी उत्तर केलें कीं तुम्हाकडे माहाल मुलूख असतां खर्चाचा किसा सांगता हें काय ? त्याजवरून वकिलानी उत्तर केलें कीं आमचा पैका राघोगडावर गेला याजकरितां अडचण. तरी तुम्हास किल्यावर ऐवज ठेवावयाचें कारण काय ? सर्वांस खर्चास मिळेल त्याप्रमाणें तुम्हास देऊं. माहाल मुलुखपैकी खर्च करावा.

---

+ पालथा दादर = draw-bridge.

होळकर.

१ कपुरखांकडून पत्र आलें कीं आम्ही फौजेचा मुकाम करून आहों. कहीकबाडीची ताकीद केली. पलटणवाले समजाऊन न्यावे. आमचें ऐकत नाहींत. जिनसी तोफखाना लष्करांत आणविला. गंगराडचे किल्यांत नागोरचें ठाणें बसलें.

१ गणेशपंत पिटके महितपुरास गेले होते ते माघारे लष्करांत येऊन भेटले.

१ विंचुरकरांकडील तिळगुळाचीं पत्रें वकिलांनीं आणिलीं.

१ नागपूरचें वर्तमान आलें[१] सां तीन दिवस चौघडा बंद होता.

१ मीरखांची व जैपुरकराची लढाई जाहाली.

—

५

छ १२ रबिलाखरी.

नागपूर.

१ छ १२ रबिलौवलीं मुधोजी भोसले शहरांत दाखल जाहाले. परसोजी भोसले याचें उतरकार्य दानधर्म जाहाला. मनभट उपाद्ध्ये यांणीं गयावर्जनाचें उदक सोडल्यावर काकस्पर्श जाला. इंग्रेज समाधानास आले होते. पंचवीस तीस हजार दानधर्म केला.

१ रामचंद्र वाघ, नागो त्रिंबक व मनभट उपाद्ध्ये यांसी खलबत जाहालें. चंद्रपुराहून नऊलाख रुपये व जवाहीर दाखल जाहालें. सेनाधुरंधर फाल्गुन वद्यपक्षीं दोन लग्नें करणार. तयारी होत आहे.

१ मुधोजी भोसले याणी मायाजाल घालून, इंग्रेज घरांत घालून रघोजी भोसले याची दौलत सर्वस्वें हरण करून दरोबस्त कुटुंबांतील माणसें दाणादाण जाहाली. कोणास जागा राहिली नाहीं. भोसल्याचे घरांत पूर्वीपासून दौलतीचे दोन विभाग भिन्न आहेत, याची पंचाईत होऊन फारखत्यां जाहाल्या, तीन पिढ्या स्वतंत्र सेनाधुरंधर यांजकडे चंद्रपूर, व सेनासाहेब यांजकडे नागपूर, असें असतां हालीचा प्रकार जाहाला, तो शेवेसी लिहिला आहे. सर्वस्वें दौलतींत रक्षणें माहाराजाकडे असें सर्व बोलतात. देखिलें ऐकिलें वर्तमान लिहिलें आहे. कळावे. छ १२ रबिलाखर.

—

३

¶*This is a summary of news received at Poona from the courts of Indore, Gwalior and Nagpur.*

---

1 Death of Parsoji Bhosle on 1st February 1817.

No. 99] [1-4-1817

नकल

श्री

यादी सरकार दौलतमदार कंपनी इंग्रेज बाहादूर सुरू सबा अशर मयातैन व अलफ छ १ माहे आप्रिल वीसवी मुताबिक छ १३ जावल व ३ रोज वीसची मुताबिक छ १५ रोज या दोन रोजात दोन यादी माहाराजाचे खिदमतीस हाजीर केल्या होत्या. त्यांत विनंति केली होती की माहाराजाकडून नवीन सिबंदी ठेवितात व किले कोटाची तयारी चाली आहे त्या प्रा॥ ज्यारी असल्यास कंपिनी बहादूर याजकडूनहि तैसीच तयारी करणे प्राप्त होईल; असे असता तव्हापासून पुणे मुकामी व जागाजागा जवळपास दूर देशात माहाराजाचे मुलकांत फौज चाकरीस ठेवितात आणि किले कोटाची तयारी ज्यारी चालविली आहे हा मजकूर समजण्यात आला, व बंडाचे सरदार त्रिंबकजी डेंगले होऊन त्याचे फौजिचा जमाव विनदिकत ज्याजती होऊ लागला आणि प्रसिद्ध होऊन मुलकात बाहेर मैदानात पडले आहेत आणि माहाराजाचे मुलकातील गावगना कमाविसदार वगैरे अधिकारी यांणी बंडाचा रोख कोठे आहे त्याची बातमी इकडील सरदार कर्णेलसाहेब यास वास्तविक सांगितली नाही. म्हणोन येक वेळ बंड लस्करापासून बच्याऊन गेले आणि येक इंग्रेज सरदार आपले सरकारचे दोस्तीचा मुलूक ऐसे समजोन सडे जात होतो त्याजवर खून करून त्यास ठार केले. या प्रो बंडाने काम ज्यारी चालविले आहे. खानदेशांत बंडाचा जमाव जाला तो घाटाचे अलीकडे येत आहे. तेथे त्या जमावास मिलोन दक्षण दिशेस यावे ऐसा त्याचा इरादा आहे ऐसे दिसोन येते. त्यास माहाराजाचे सरकारातहि तयारीच आहे व बंडाचा फैलावा मोठाच जाहाला. याजकरिता पुणे मुकामी इंग्रजी लस्कर आहे त्याची मजबुदी राखावी, ऐसा पहिलेपासून इतला दिल्हा आहे त्याप्रो हाली नमुदांत आणणे जरूर जाहाले. त्यास त्रिंबकजी फौजेचा जमाव करीत आहे व दुसरे जे कोणी माहाराजाचे हुकुमावरून फौजेची तयारी करीत आसेत ती जलदी करून होऊ न द्यावी यात फाइदा आहे; परंतु इंग्रेजी सरकाराकडून जलदी होत नाही, याचे कारण हेच की कलकत्याहून जबाब आलियावर माहाराज आपले दोनाई[1] विचार करोन फिरोन दोस्तीचे विचारावर येतील ही इंज्यानेबाची उमेद आहे. घोडनदीचे लस्करपैकी खडी फौज पुणे मुकामी आणवावी म्हणजे बंडाचा जमाव येथे आला असता त्याजवर चालून जावयास उपयोगी पडेल. जर बंडाचा जमाव येथे न आला आणि दुसरा काही येक लढाईचा इरादा न जाहाला तरी फौज जसी मागे खडकीचे

१ दानाई = शहाणपण.

7079

पुलाजवळ राहिली होती तसी कलकत्याहून जवाब येई तोपर्यंत हाली मुकाम करून राहील. जर माहाराज पुणे सोडून बाहेर गेले असता माहराजाचे मनांत लढाईचा डौल आहे असे सिद्ध होईल, त्यास लाटसाहेब याचा जवाब येण्याचे पूर्वी माहाराजानी शहर सोडले असता किंवा लढाई सुरू जाहली असता लाट-साहेब याचे मनांत सलूक करावयाचे असेल तत्रापि तो मार्ग बंद होईल. याजकरितां इंज्यानेबाची उमेद ऐसी आहे कीं माहाराजानी शहर न सोडावे व लढाईचा इरादा होऊ न द्यावा. येणेकडून लाटसाहेब याजकडून सुदामत दोस्ती होण्याचा मार्ग बंद होणार नाही.

¶*This an ultimatum from Elphinstone to the Peshwa not to countenance Dengle's revolt, to demobilize his army and to remain in the capital. Breach of any of these terms would be looked upon as a declaration of war.*

---

*No. 100*] [*23-4-1817*

डे. कमि. रु. नं. १२७
ता। २३ आप्रेल
सन १८१७.

**श्री**

साहेबाचे सेवेसी आखबारी मार छ ९ माहे जमादिलाखर रोज बुधवार :—

१ रोज मारी रात्रीस बापू गोखले व आंताजीपंत मामा व बाळाजी लक्षुमण व मोर दीक्षित यासी च्यार घटका खलबत होऊण गोखले यासी फौजेचे खरचाऐवजी पंनास हाजार रु देऊण आज्ञा जाली की, हाजार लोक पौदळ नवे ठेवावे. मग गोखले बरखास्त जाले उपरी, दीक्षित व बाळाजी लक्षुमण यासी दाहा घटका रात्रपरयेंत खलबत जाले.

१ छ मारी भाऊसाहेबास बोलाऊ रामाजीपंत घाटगे यासी पाठविले. याजवरूण प्रथम साहा घटका दिवसानी भाऊसाहेब आले. यासी दोण प्रहरपरियेंत खलबत होऊण भाऊ गेले.

१ सरकार यानी भाऊविसी बहुत साकर पसरली आहे. बरकांतीचे बोलणे म्हणोण भाऊसहि समजले आहे. त्याजवरूण भाऊसाहेबानी बातमीकरिता तिवे कारकूण व पंचवीस तीस जासूद नवे ठेवले आहेत. कलम.

१ सरकार यानी भोजन करून नारोबा आपटे यासी बोलाऊण आज्ञा केली की, तीणसे लोक पौदळ नवे ठेऊण रायगडचे बंदोबस्तास पावे. कलम.

१ तिसरे प्रहरी बापू गोखले व अंताजीपंत मामा व बाळाजी लक्षुमण व मोरं दीक्षित व आबा पुरंधरे आले. यासी संध्याकालपरयेंत खलबत जाले. कलम.

१ चिंतामणराव पटोर्धण यानी मिरज व सांगलीपरयेंत डाक बसविली. मारनिलेस सरकारची आज्ञा आहे की, तुम्ही पटोर्धण मंडली येकदिल आसावे, आनि सरवत्राकडील कारकुणानी आम्हांस नित्य भेटत जावे. कलम.

१ माधवराव रास्ते यानी खजिन्याचे च्यारपाच उंट बरोबर सेभरपंनास स्वार देऊण आपले माहालात करनाटकात रवाणा केले होते. त्यासी येळूचे मुकामी रात्रीस रामुमियानी लुटूण नेले म्हणोण ऐकिल्यात आले आहे. कलम.

सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*News-letter reporting preparations of war undertaken and interviews given by the Peshwa.*

---

*No. 101*] [*13-5-1817*

पो छ ६ रजब सन सबा

अशर जेष्ठ.

**श्री**

साहेबाचे सेवेसी विज्ञापना तागायत छ २५ जमादिलाखर रोज सोमवार मुक्काम लष्कर नजीक भोजखेडी परगणे आकोट. दिनचर्या देवदी राजश्री मल्हारराव होलकर. प्रात:काळी स्नान करून श्री मार्तंडाचे दर्शन घेऊन कचेरीत आले. शागीर्दपेशा वगैरे यांचे मुजरे जाहाले, व दरकदार व रतु पाटील, जोती हुजरे व हवालदार वगैरे याचे रामराम जाहाले. विठोबा जोग याजकडे जोती हुजरे व इंग्रजाकडील आकबारनीस जाऊन खलबत जाहाले. नंतर जोग व जोती हुजरे व आकबारनीस दिवाणाकडे जाऊन दिवाणासी खलबत जाहाले, व खंडबा थोरात व नाना गायकवाड व भगोबा रास्ते वगैरे सिलेदार व सेखजी हवालदार याचे दिवाणासी बोलणे जाहाले. इंगल्याकडील वकीलाबरावर पागा आहे त्याचे चंदीची परवानगी जाहाली. त्याचा मुकाम नदी पलीकडे होता तेथें रात्रौ चोराचा उपद्रव जाहाला. सबब आलीकडे येऊन मुक्काम केला. दक्षणीराव वैद्य

यास बोलावणी गेली होती. ते येऊन लष्करांत दाखल जाहाले. दिल्लीस सिंगरुब्राचे बेगमीची पलटणे प्राचीन पातशाही चाकर आहेत. त्यास बेगमेचा काल जाहाला. तिचे गादीवर दुसरी बेगम बसली. तिजपाशीं इंग्रजानीं आसबाब मागितला. तो तिणे दिला नाहीं. सबब त्याजवर छापा घालावयास बारा पलटणे गेली. तेहि सावध होते. उभयपक्षीं लढाई होऊन इंग्रजाकडील चार पलटणाचा नाश जाहाला, तेव्हां माघारे आले म्हणोन वदंता आहे. दोन प्रहरानंतर दिवाण व जोग व बक्षी व जोती हुजरे व इंग्रजाकडील आकबारनीस व दरकदार व सिलेदार व पागे वगैरे कचेरीत गेले. नाच सुरू जाहाला. दिवाण व जोग व जोती हुजरे व अकबारनीस बाईकडे जाऊन खलबत जाहाले. माखणलाल जोशी कचेरीत जाऊन रामराम जाहाला. रामदीन याचे निसबतीस दोन पागा होत्या त्या ताल मंडावलेस गेल्या होत्या त्यास रामदीन याणी पत्रे पाठविली कीं तुम्ही निघोन आम्हाकडे येणे. लष्करानजीक येऊन बार काढीत येणे. तो पत्रे जोगांनी धरून दिवाणास दाखविली, तेव्हां सेडगे व ताडे व रामदीन याचा दंगा करण्याचा विचार जाणोन, रामदिनाकडील पागा काढोन हुजरातीत लाविल्या. बखताभाऊ याणीं लग्नाबद्दल मेजवानी केली. खाशा मुदबाखान भोजनाचा बेत होऊन, बाई व मल्हारराव व दिवाण व जोग व बक्षी व फडणीस दरकदार वगैरे भोजनास जाऊन, दोन घटिका दिवस राहता भोजने होऊन सर्वत्रास पानसुपारी दिली. गणेशपंत पिटके यांसही आमंत्रण आले; परंतु गले नाहींत. मदरदीन हवालदार याचे शिरी समाधान नाही. सबब दिवाण व जोती हुजरे व रतु पाटील त्याचे डेऱ्यास जाऊन खातरजमा करून कचेरीत आले. तुलसाबाईनीं पांच महार व पांच महारणीस उडदाचे भाकरीचे भोजन घालून लुगडी चोल्या दिल्या, व खुर्दा दिल्हा. सायंकालची रोशनी होऊन सर्वत्राचे रामराम जाहाले. प्रहर रात्रीनंतर दिवाण वगैरे आपले डेऱ्यास आले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer gives an account of the battle between the forces of the English and the army of Begum Sumru and states that the English were made to retreat. The daily happenings at the court of Malharrao Holkar are also reported.*

---

*No. 102*]  [*19-5-1817*

**श्री**

आसीर्वाद उपरी ताा जेष्ट शुाा २ रोज सोमवार प्रात:काल क्षेम आसे विशेष. अलीकडेस तुम्हाकडोन पत्र येत नाही. इकडोन पत्रें निमसोडकर याचे गाड्यासमागमें पाठविली आहेत त्यावरून कलेल. फिरंगियाचे लस्कर रोज गुाा कासें-

गावावर आले. गोपालपुरावर आठचार दिवस राहणार. दाहा पंधरा हजार सारे आहे. यैवजप्रा मार रा नानानी लिा आहे. कलेल. चिंतोपंत तात्या-कडील यैवज बाकी तेरासे निघाली ती व बाजीकडील दोनसे पंधराचे दादाकडेस देविता. वर्षासनचे देणे राहिले त्यास निपाणकराचे लोकाकडेस तीनसेचारसे येणे खर्चास दिल्हे ते यावयाचे ते आठ चार दिवसात येणार. टेंभुर्णीहून नानासो * वास्तू घराचा जाहला. कुंजीर याचा काल वैशाख वा ७स जाहाला हा मार कललाच असेल. मामलतीचे दिवस समीप पत्रावली वगैरे चुकोती होणे आहेत, मग स्वारीत नीट पडत नाही यास्तव तुम्ही येऊन बंदोबस्त पुढील बोलणे करावे, आलस होऊ नये. माहुलीकडील मंडली सौ मुलगीस आणावयाचे त्यास भाऊस पुढे लिहून पाठवावे अगर इकडेस ल्याहावे. घोडी माणसे पाठऊ. यास्तव सातार्‍यास त्याचे घरास कोणी पाठऊन त्यास मार कलवावे. चवदा हजार प्रा मार नानानी लिा आहे कलेल कासार * आणर्वा पत्र भटानी आणिले. नित्य खटखट आहे. रावजी कारखानीस पंचाईत करू म्हणतात. पत्राप्रो कार्य करावे असे कासारबावाचे म्हणणे आहे. नाही तर माघारे पत्र द्यावे. चहूकडे उभयपक्षी अडचण आहे. कौलगीस पत्र दिल्हे, उतम केले. कौलगी याचे भांडण वाजवी नाही असे म्हणतात. परंतु उपाय नाही. परिणाम नीट नाही. सारांश तुम्ही लवकर यावे. वहुत काय लिहिणे. पुढील बेत वाड्याचा वगैरे सूचना व्हावी. विशेष काय लिा हे आसीर्वाद.

¶*The death of Baloji Kunjir is reported by the writer of this letter among various other items of social and political nature.*

---

*No. 103*] [*27-5-1817*

**श्री**

यादी अखबारी पत्रातील मजकूर सुरूसन सबा अशर मयातैन व अल्फ तागा-यत छ १० रजब.

मुक्काम ग्वालेर

१ राघोगडवाला देवासे येथें दहा हजार रुपये खंडणी मागत होता, तों इतकि-यांत आनंदराव भिमाजी बक्षी याचे बंधु फौज सुद्धां येऊन लढाई घेतली. राघोगढवाला मागे हटोन गेला. बक्षी याणीं दहा घोडी पाडाव आणिली.

१ कलकत्यास एक गोरा मोठा माणूस कैदेंत आहे. त्याणे पत्र विलाइतेतील बादशहास पाठविले कीं, आमची येथून सुटका कराल तरी पैसा व मुलुक सांगाल तो देईन. बादशहानें ते वर्तमान कलकत्याचे गोर्‍यास लिहिले. तुमची चौकशी पक्की असतां कैदवाल्याची अर्जदास्त आम्हाकडे आली

तेव्हां मोठे कामाची चौकशी कशी ठेवाल? त्याजवरून कैदेतील गोऱ्याचे चौकी पाहऱ्यावर पहिले लोक होते ते काढून दुसरे ठेविले. वाड्याची दिवाल ठेंगणी होती ती उंची केली म्हणोन.

१ रामचंद्र भास्कर यासी पिछयाडीचे विहिरी जवल खलबत जाहाले.

१ भिवराज गवाजी निसबत चिटणीस याजकडील वकील सीकाचे वकिलाबरोबर देऊन भरतपुरास पाठविले. ते तेथें जाऊन, बोलणे करून, वकिलास घेऊन, भेटीस आले. सीकाकडील वकील सिंगरूप बेगमेकडे जाऊन भेटून इकडे पत्र रवाना केले, आणि लाहूरास गेला म्हणोन.

—

४

१ आमरसरचे सीक देसी गुरुदर्शनास जावयास आले. त्यास दोनशे रुपये दिल्हे.

—

५

मुक्काम लष्कर मल्हारराव होलकर

मीरखा याणी कपूरखा यांस एक लक्ष रुपये सत्वर पाठवणे म्हणोन शफत पुरस्कर पत्र पाठविले आहे. म्हणोन कलम १

मुक्काम मुंबई छावणीतील मजकूर.

१ रणजितसिंग सीक याचे व फतेखान वजीर याचे वैमनस्य पडून परस्परे लढाईचे इराद्यावर आहेत. आज शहाज्यादा कमरान याचाही दुस्मान फत्तेखा आहे. त्यासही सामलात करून घेऊन फत्तेखान याजवर चढाई करून जाणार म्हणोन.

१ विलायतीकडील रयतेवर जलेल जाजती जाहाली म्हणोन तीस चालीस हजारपर्यंत रयत उदास होऊन, पातशहाजवल ज्याजती दस्त घेतात ती घेऊं नये, हे न केले तर लढाई करूं याप्रमाणें म्हणोन.

१ छितू पेंढारी यास जाहागीर होती, ती सिंदे याणी काढली, यामुले निराश्रित जाणोन इंग्रजाचे पलटणावर दगा करणार म्हणोन भय बालगतात.

१ कटकचे नदी लगत इंग्रजाचे दोन किल्ले होते तेथें कोणी एक सरदार पांच हजार फौज घेऊन येऊन दोन किल्ले सर करून सरदार याणी आपले निशाण चढविले म्हणोन.

—

४

¶*This is a summary of news detailing the activities of the English, the Sikhs, the Pindharis, the Sindhia and the Holkar.*

7084

No. 104] [28-5-1817

श्री

चिरंजीव राजश्री बलवंतराव यांसी आसीर्वाद उपरी. येथील कुशल ता। जेष्ट सुध १२ रोज बुधवार दोन प्रहरपावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्ही पुणेकर जासूद याजबराबर पत्र पाठविले ते पावले त्याचे उतर जासुदासमागमेच लिहून पाठविले ते पावले आसेल. हल्ली इमामभाईसमागमे पत्र पा। ते हि पावले. मजकूर सर्व कलला. राजश्री त्रिंबकजी डेंगले यास बंडान कोणी खर्चास पोहचते केले म्हणून सरकारात मा।र इंग्रज बहादूर यांजकडोन बातनी समजली त्यावरून सरकार आज्ञा जाहली की याची चवकसी क्षेत्र पंढरपूर येथे साहुकार हुंडीवाले व बडवे वगैरे आदिकरून सर्वत्रास महाद्वारी मेलऊन वेदशास्त्रसंपन्न रा। विठल पाध्ये तात्या व आफटे याजकडील कारकून रावजी कारखानीस आहेत ते व दरकदार गावकरी याचे विद्यमाने पकेपणे चवकसी होऊन जामीनमुचलके सरकारात पाठऊन द्यावे म्हणून येजमानसाहेबानी आज्ञा केली, त्यावरून आपणाकडील जासूद येथे येताच दुसरे दिवसी सर्वत्र मंडली सदरी लिहिल्याप्रमाणे मेलऊन हुंडीवाले व बडवे वगैरे मेलऊन चवकसी करून सर्वत्रास विचारले. त्यावरून हुंडीवाले याणी वगैरे बडवे याणी मुचलके लिहून दिल्हे व जामीन हुंडीवाले याणी दिल्हे ते पाठविले आहेत. बडवे वृत्तिवंत, त्यास जामीन परकी कोणी होईना. दोन रोज बहुत घोल पडला. आपणाकडील पत्र निकडीचे त्यावरून जितके कागदपत्र सिध जाहाले तितके रवाना करून दिल्हे आहेत, येऊन पोहचतील. याची यादी आलाहिदा करून पाठविली आहे. बडवे यास जामिनाविशी तगादा केला. बडवे यास बडवेच जामीन प्रथक च्यार चवभाईतील द्यावे, त्यास तेहि अनमान पडला. कोणी तंट्याचेमुळे होईना. तगादा आहेच. निकडीस्तव कागदपत्र रवाना जाले. चवकसी माहाद्वारी होत होती तेथे तेथे फिरंगी इंग्रजबहादुर याजकडील कारकून डेंगले याचे प्रकरणी पत्र सरकारचे सिक्याचे घेऊन आले. पत्र कमाविसदार माहालानी व सरंजामी सरदार याचे नावी होती की, डेंगले यास जो पत्ता लाऊन धरून आणून देईल त्यास सरकारतून दोन लक्ष रुपये बक्षीस व जाहागीर येक हजाराचा गाव व अमुक ठिकाणी आहे हा पत्ता जो लाऊन सांगेल, त्यास पाच हजार बक्षीस, चाहूर जमीन येक, वगैरे बहुतेक तपशीलवार पत्र व बारा आसाम्या मिलाफी याचे नावनिसी नातेपुतेकर व नाझरेकर व डफले वगैरे आहेत याचे पारपत्य वगैरे करावे म्हणून पत्र होते. ते पत्र सर्वत्रास वाचून दाखविले आणि घेऊन गेले. तामसेन कर्णेल म्हणून मुख्य इंग्रज आहे. त्याजपासी हा मजकूर आम्ही हुंडीवाले वगैरे यांची चवकसी करितात ही

बातमी कारकुन याने जाऊन कर्णेल तामसेन यास समजाविली हे खचित आहे. गोपाळपूरचे मालावर लस्कर उतरले आहे. मल्यान उपद्रव होतो. कडबा लाकडे नदीपलीकडेस व आलीकडेस दाहा कोसपरियंत राहिली नाहींत. क्षेत्रात प्रथम दिवसी उपसर्ग कडबा वगैरे यास किंचित जाहाला. माहाद्वारी येक पाहरा जवळ रखवाली हली हशमी देवळात जाईल याजकरिता रा। शामराव व मिा माणकेश्वर याचे व माहालानी सरंजामी सरदार याचे नावे आणिला आहे व त्याणी आपले हवेलीचे बंदोबस्त व पाच सिपाई कुडर्तावाले आणिले आहेत. गंजी कडब्याच्या घालितात. बंगले व छपरबंदी करावयास लागले आहेत. कळावे कडब्याची बेगमी करून ठेवितात. याप्रा। मजकूर आहे. बहुत काय लिहिणे हे असीरवाद.

¶*The writer writes news to Balwantrao from Pandharpur about the proclamations issued by the Peshwa offering two lacs of rupees as a prize for any one who would hand over Trimbakji Denglia.*

---

*No. 105]* *[11-6-1817*

पौ छ १९ सावान सन
समान आशर आषाढ

**श्री**

शेवेसी आबाजी माहादेव कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना. ता। छ २९ रजबपावेतो मु॥ बल्हारी येथे शेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील मजकूर तर इंग्रज याजकडील दोन पलटणे व एक तुरूप पनास तोफा तुरूप स्वारात तयार जाल्या आहे. येक दोन रोजानी जाणार आहेत, व आणि जेथ जेथ पलटणे आहेत तीहि जमा होणार आहेत. हजार भोई डोल्यास नवे टेविले. आणखीहि ठेवीतच आहेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Abaji Mahadeo stationed at Bellary gives an account of the increasing mititary preparations of the English.*

---

*No. 106]* *[9-7-1817*

**श्री**

शेवेसी आबाजी माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ २३ सावानपावेतो मुकाम बल्हारी येथें शेवकाचे वर्तमान येथास्थित आसे विशष. इकडील मजकूर तर तुंगभद्रा किनारा घाट आहेत त्यास दर घाटास वीस पंचवीस

टोकरे करविले आहेत. आदवानीवर लस्कर जमा होत आहे. तूर्त येथून दोन पलटणे व येक तुरूप व अकरा तोफा गेल्या आहेत. चेनापटन व त्रिचनापल्ली वगैरे येथून पलटणे यावयाची वदंता आहे. सारा जमाव दाहा हजारपर्यंत होणार आहे. कुंभार राज्याची फौज हजार दीड हजारपर्यंत स्वार येणार आहेत. शेवसी श्रृत होये विज्ञापना.

¶*Abaji Mahadeo mentions some of the movements of the English armies in the Karnatak round about Adoni, Trichinopalli and Chenapattan.*

---

*No. 107*] [*9-7-1817*

श्री

राजेश्रिया विराजित राजमान्य
राजश्री भिकाजीपंत आपा व
बापूजीपंत दाजी स्वामीचे शेवेसी

पोष्य आबाजी माहादेव सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २२ साबानपावेतो जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष. इकडील मजकूर तर तुंगभद्रा किनारा घाट आहेत, त्यास दर घाटास वीस पंचवीस टोकरे करविले आहेत. आदवानीवर लस्कर जमा होत आहे. तूर्त येथून दोन फलटणे व येक तुरुप व अकरा तोफा गेल्या आहेत. चेनापटण व त्रिचनापल्ली वगैरे येथून पलटणे यावयाची वदंता आहे. सारा जमाव दाहा हजारपर्यंत होणार आहे. कुंभार राज्याची फौज हजार दीड हजारपर्येत स्वार येणार आहेत. बहुत काय लिहिणे. लोभ करावा हे विनंती.

¶*Abaji Mahadeo communicates to Bhikajipant Appa and Bapu Gokhale that the English are concentrating their forces on Advani.*

---

*No. 108*] [*19-7-1817*

पौ छ २६ रमजान
सन समान आशर माहुली.

श्री

सेवेसी आबाजी माहादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ ४ रमजानपावेतो मुकाम बल्हारी येथे शेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील मजकूर तर मुरीकोंडा याचे वाटेने सात पलटणे व तीन रजबीट व दोन

7087

तुरूप व येकतीस तोफा व जरणेल याचे नांव कणवई ऐसे नदी उतरून मोगलाचे मुलखात गेले. त्याबराबर कर्नूलकर याची व गुलाम आली बैंगणपलीवाला यार्ची फौज दोन तीन हजार जाणार, ऐसी वदंता आहे. चिथवाडगी व कंपली याचे घाटावर च्यार पांचशें टोकरे जमा केले आहेत. लस्कर आदवानीवर जमा जाले आहे. ते नदीपलीकडे कोपळ बहादरबिंडा याजकडे जाणार आहे. बेंगरुलाहून वगैरे पलटणे तीन व रजबीट दोन आले, ते परभारे गुर्ताहून आदवानीस गेले. आचलीचे घाटावर नदी उतरायास लागले ते वेलेस प्रथमच दोन टोकरे नदीमधे बुडाले. येक आपसर व पनास साठ गोरा वगैरे काळीं माणसे बुडाली. पुढे लस्कर पंढरपूरचे रोखास जाणार. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶[*The writer reports the movements of the English troops in the Karnatak.*

---

*No. 109*] [*22-7-1817*

पौ छ २६ रमजान मन
समान आशर माहुली

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य**
**राजेश्री बापूजीपंत दाजी व भि-**
**काजीपंत आपा स्वामीचे शेवेसी**

पोष्य आबाजी माहादेव सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ ७ रमजानपावेतो मुकाम बल्हारी जाणून स्वकीये लिहीत जावे विशेष. इकडील मजकूर तर इंग्रज याजकडील मुरारकोंडा याचे वाटेने सात पलटण व तीन रजबीट व दोन तुरूप व येकतीस तोफा व जरणेल याचे नांव कणवई ऐसे नदी उतरून मोगलाचे मुलखात गेले. त्याबराबर कनूलकर याची फौज व गुलाम आली बैंगणपलीवाला यार्ची फौज दोन तीन हजार जाणार ऐसी वदंता आहे. चिथवा-टगी व कंपली याचे घाटावर च्यार पांचसे टोकरे जमा केले आहेत. नदीपली-कडे लस्कर आदवानीवर जमा जाले आहे ते कोपळ बहादरबिंडा याजकडे जाणार आहे. बेंगरुळाहून वगैरे पलटणे तीन व रजबीट दोन आले ते परभारे गुर्ताहून आदवानीस गेले. आचलीचे घाटावर नदीपलीकडे लस्कर उतरावयास लागले, ते वेलेस प्रथमच दोन टोकरे नदीमध्ये बुडाले. येक आपसर व पनास साठ गोरे वगैरे काळी माणसे बुडाली. पुढ लस्कर पंढरपुरचे रोखास जाणार

व कुंभार राज्याचीहि हजार दोन हजार फौज इकडेस येणार. तुंगभद्रेअलीकडे इंग्रज याजकडील फौज वगैरे काही फार नाही. जेथे जेथे छयावण्या व किल्ले आहेत तेथे कोठे शंभर कोठे पनास लोक ठेऊन झाडून लष्करावरावर गेले. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

¶*The writer gives in detail the movements of the English troops in Karnatak in the direction of Pandharpur.*

---

*No. 110*] [*30-7-1817*

पौ छ १९ रमजान सन
समान आशर माहुली

**श्री**

यादी मोरो केशव गोरे निा चौधरी याजकडील मजकूर. भागानगरास इंग्रेज आहे त्याणे चंदुलाल याचे विा नवाबासी बोलणे केले की, धोडप वगैरे सतावीस तालुके व सरकार संगमनेर वगैरे गंगथडी मुलूक मोगलाईकडील प्राचीन; त्यास तो मुलूक व किलेसुध्धा आम्हाकडे लाऊन द्यावे आम्ही घेतो. आम्हाबरावर तुमची फौज द्यावी. आसे बोलणे खचित ठरून कागदपत्र तयार होऊन औरंगाबादेस मोगलाई फौजेची भरती होऊन, मोगलाई फौज तीन हजार व इंग्रेज याची पलटणेसुद्धा छ २४ साबानी मौजे भारम पौ पाटोदे येथे मुा आले. कही कबाड वगैरे धूम करितात. त्यास आपले पलटणची भरती असलियास याजला जाब देण्यास चांगले. आधीच पाचसे लोक. त्यात जेऊर वगैरे कामगारी याजकरिता कोण्हाचे हातून सरकारात हा मजकूर कानावर घालून पलटण पौ यैवज सरकारात घेतात तो न घेता पलटणचे भरतीकडे खर्चास देविल्यास दोनहि पलटणची भरती करून, सरकार आज्ञेप्राा चाकरी करूं. हा मानस सर्व पलटणचे लोकासुध्धा माझा आहे. आज तागाईत या पलटणाकडे सरकारचे पाऊण कोट रुा खर्च जाहले. त्याचे सार्थक करावयाची वेळ आहे. त्यास हली लोक आहेत त्याजलाहि खर्चाची आडचण आहे. याजकरिता मोगलाईवाल्याचा मजकूर समजाऊन दोन्ही पलटणची भरती आज्ञा घ्यावी.

¶*This news-letter states that the English intended to bring under control the region of the Godavari valley with the aid of the Nizam.*

No. 111] [July 1817 ?

यादी त्रिंबकजी डेंगले यास शोध करून याची बातमी सरकारात आणोन पोहचती करावी:—

१ डेंगले याची बातमी आणून सरकारात पोहचती कराल याजला सरकारातून देणे ते

१ क्षेत्र पंढरपुरी बडवे व सावकार याणी खर्चास ऐवज दिल्हा आहे आसा बोभाट सरकारात समजला. याजकरितां बाबूराव गणेश कमाविसदार यास ताकीद होऊन याणी डेंगले यास ऐवज दिला आसेल त्याची चौकसी करून त्यास सरकारात आणून पोहचते करावी येविसी मुलाचा नमावा.

१ फलटणकर जानराव नाईक व डेंगले याचा सासरा लिंबाजी जाधव याणी मशारनिलेस आसरे देऊन बंड करविले व त्यात सामील होते याजकरिता उभयेता सरकारात आणून नगादा सक्त करा म्हणजे ते डेंगले याचा शोध लाऊन देतील. या प्रकरणी त्याजपासून मुतलका लिहून घ्यावा.

१ नातेपुते येथील कमाविसदार सदासिव यादव व महादाजीपंत नाझरेकर हे डेंगले यास सामील राहून बंड केले आहे. याजकरितां उभयेतास सरकारात आणोन सिक्षा करून डेंगले याजला आणून घ्यावे.

१ फलटण व नातेपुते येथील लोक बंडास सामील होऊन गेले आहेत व पहिले होते त्याचा शोध करून त्याचे घरात चौकी बसऊन हुजूर पोहचते करावे.

१ बापू गाईकवाड सेटफलेकर हा त्रिंबकजी यास सामील आहे, याजकरिता त्याचे भाऊबंद व मुलेमाणसे कैदेत ठेऊन घरची जफ्ती करावी. सरकारात येऊन समजवावे.

¶*These are Bajirao II's orders to capture Trimbakji Dengle and his accomplices and hand them over to Government.*

---

No. 112] [1-8-1817

**श्री**

आखबारी पत्रातील मजकूर सन समान आशर मयातैन व अलफ तागायत छ १७ रमजान.

मुक्काम चिनापट्टण.

१ कटक प्रांती पेंढारी याचा व जमीदाराचा दंगा आहे तसाच आहे.

१ नर्मदेचे किनाऱ्यास पेंढारी याचा जमाव भारी जाहाला आहे.

१ सोलदानाची रेजमेंट व आलेमानी स्वार पटालमों[1] व तुरुप स्वार वगैरे बंगाल्याचे इलाक्यांतील दरोबस्त यमुनेचे किनाऱ्यास जमा होणार.

१ या प्रांतीच्या हैदराबादेस व बल्हारीस रवाना जाहाल्या व मुंबईकडील पलटम व रेजमेंट घोडनदीस जमा होणार.

१ मालकं साहेब बंगाल्याहून येथें आले, आणि मसलत ठरवून खुद्द व जनरल इसलाप सिवाय कारनेल मेजर वगैरे सरदार बहुत रवाना जाहाले. जंगी सरंजाम तरतूद दारू गोळी वगैरे बेसुमार जात आहे. याचा सुमार लिहितां येत नाहीं. मुख्य मोहीम कोणावर आहे हे समजत नाहीं. पेंढारी याचे पारपत्यास असी लोकवार्ता आहे.

१ जनरल माल्कम साहेब सरदार समवेत बंगरूळास गेले. तेथून श्रीरंग-पट्टणास जाऊन मैसूरकर राजे यांची भेट घेऊन हैदराबादेस जाणार. तेथील नवाबाची भेटी जाहाल्यानंतर पुण्यास जावे असा हेतु आहे म्हणोन.

१ मैसूरकर राजे याजकडील सहा हजार स्वार जालन्यास गेले.

१ विलाइतीहून चार जहाजें आली त्यांत मजकूर. फरासीस फौज बुनेपाट[2] याचे हाताखालील हाली नवे बादशाहा जाले त्याचे हुकुमांत आहे. त्यास हल्लीं इंग्रजाचे मनोगताप्रमाणें नेहमी दौड, पंधरा दिवसांत एक मुक्काम नाहीं. यामुळें कांहीं सरदार विघडले आहेत. कांहीं चाकरी सोडून आलाहिदा उतरले आहेत. समजाविसी होईल असी दिसते.

---

८

## मुक्काम मल्हारराव होळकर.

१ कल्कत्याहून दोन साहेब दिल्लीस आले म्हणोन आखबार.

१ मीरखा यास येण्याविसी पत्रे गेली आहेत.

१ गणपतराव दिवाण यांजकडे पंचमाहालची मामलत होती त्याच्या सोड-चिठ्या दिल्या.

---

३.

## मुक्काम घोडनदी.

१ खानदेश प्रांतीं पलटणावर भिल रामोशी याणी दरवडा घातला. उभयपक्षी खराब जाहला.

१ घोडनदीचे पलटण बदलीचे पुण्यास गेले, तेथील घोडनदीस आले.

---

1 Platoon or Battalion. 2 Bonaparte.

१ घोडनदीपासून नगरापर्यंत पंधरा हात रुंदीची वाट तयार करीत आहे.

१ औरंगाबादेस पांचशें स्वार नवे ठेविले, व हैदराबादेस पांचशें तयार केले.

४

मुक्काम पुणें संगम.

१ अल्फइस्टन सिकारीस आलंदीकडे छ १३ रमजानी गेले ते छ १६ रमजानीं माघारे आले.

१ घोडनदीचे पलटण बदलीचे आले ते गारपिरावर उतरले.

२

¶*This is a summary of the news-letters received from Madras, Indore, Ghodnadi and Poona. The main point is that the British are making vigorous preparations to strike at the Pindaris.*

---

*No. 113*] [*3-8-1817*

छ १९ रमजान समान

अशर मुा माहुली.

**श्री**

विज्ञापना ऐसीजे. फिरंगी याणीं रामचंद्र वाघ यास विचारलें, कीं आम्हास शहरांत आदालत घालावयास जागा द्यावी. तेव्हा याणी उतर केले कीं, उतम आहे, जागा देतो. ऐसे कबूल करून यावे तित्कयांत तांब्राणीं उतर केले कीं, तुम्ही वकिली ऐसीच कराल जे आम्हास पाहिजे ते तुम्ही कबूल करिता, तेव्हा वकिली करणे बहुत कठिण आहे. हे कर्म तुमचे नव्हे. आस्तु. जागा आम्हास घेणे जरूर आहे. परंतु येविशी आम्ही लेख कलकत्त्यास रवाना केला आहे. तिकडून उतर आले म्हणजे जागा घेऊ. येणेप्रो बोलणे जाले. हे वर्तमान वाघानी आपासो यास सांगितले नाही. तेव्हा गुंडोपंत कारकून निा जलचर मुल्याकडे येऊन निवेदन केले. त्याजवरून मुल्याणी आपले ठिकाणी विचार केला की, ठीक नाही. वकिली दुसऱ्यास द्यावी. म्हणौन दोन प्रहर रात्रीस आपणच स्वता पायउतारे घोंगडी पाघरून समागमे येक खिजमतगार व नारायण नांगऱ्या ऐसे त्रिवर्ग जाऊन तांब्रासी सांगितले की, प्राचीन वकैलीचे कामावर होते

7092

ते तुमचें कामकाज उलगडून देत जातील. याप्रो बोलणे होऊन माघारे आले. दुसरे दिवशी राजश्री येशवंतराव आन्या याजला बोलाऊन वस्त्रे वकिलीची दिल्ही; परंतु तांब्राणी आद्याप त्याची भेट घेतली नाही. जे वेलेस आम्ही बोलाऊ ते समई तुम्ही यावे. दुसरे फिरंगी याणी येथे मुदे घातले की, श्रीमंतानी रेवा उतरतीर आम्हास दिल्हे, त्यात तुमचेहि माहाल आहेत, त्याच्या सोडचिठ्या द्याव्या, व पेशजी तुमचा आमचा तह ठरला की, पांच हजार फौज तुमचे तैनातीस देऊ, ते तुम्ही हा कालपावेतो दिल्ही नाही; व तुम्हांकडील लोक आमचे उपयोगी नाहीत. त्यास पांच हजार फौजेचा आकार जो होईल त्याची येकुनात करून यादी ठराऊन द्यावी, व आमची दोन पलटणे चाकरीस आहेत याची नेमणूक तुम्हाकडून लौकर पावत नाही; तर याचीहि येकुनात करून मदरहू तीन्ही रकमाचे पोटात आम्हास माहाल लाऊन द्यावे व शहरात आदालत चालू द्यावी. येणेप्रो मुदे घालून कलकत्यास लेख पाठविला आहे. तिकडून उतर आल्याआन्वय करणार. या बोलण्याचे उतर वाघाकडून होईना. सबब येशवंतराव रामचंद्र याजला वकिली दिल्ही आहे; परंतु तांब्र म्हणोन आहेत की वकिली नारायण पंडित यास द्यावी. येशवंतराव नसावे. याप्रो आहे.

¶*The letter reports the news terms proposed to Appasaheb of Nagpur by the English resident.*

---

*No. 114*] [*9-8-1817*

पौ ता। १३ आगष्ट

सन १८१७

**श्री**

**हजरत खुदावंदन्यामत सरदार अलीशान**

**खुदायगा नवाबसाहेब बलबाहादुर याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बज्या आऊर दे मारूज मेर सानख आके येथील खैरसाला अखबार देवढी मु।। लस्कर नजीक श्रीपंढरपूर ता। छ ९ माहे अगोष्ट सन १८१७ इसवी मुताईक छ २५ माहे रमजान सन १२३२ रोज शेनवार पो येथास्थित असो विशेष. तालुके धारवाड येथे नजीक सात आठ कोस कुसगलचा किला आहे तेथे आपले ठाणे बसले म्हणोन येका ग्रहस्ताने सांगितले. दुसरा मार, पंतप्रधान यानी आतून निपानकर याजकडे आकरा लक्षे रुो पो व रो चिंतामणराव आपा पटवर्धन मंडलीस

आठ लक्षे रुो दिल्हे व रो बालासाहेब रास्ते याजला साहा लक्षे रुो दिल्हे व राजा चेतरसिंग यास च्यार लक्षे रुो दिल्हे, आनि सरवत्रास ताकीद केली की दोन महिने-परियेंत स्वस्त आसावे. अतून फौजेची खबरदारी करावी व क्षेत्र मुकामी लोकास बरतर्फी दिल्ही म्हणोन आवाई घातली. परंतु त्यास निमे तलबा वरबसल्या द्यावी, जे दिवसी चाकरीस बोलाऊ तेव्हा हाजर व्हावे ऐसा करार करून वाटी लावले. तिसरा मार, हिंदुस्थानात लढाई होऊन नवे ठाणे बसविले म्हणोन सांगितले. रो भगवतसिंग भयेशे तिकडे लडाईत पडले, सबब त्याची बैको सती गेली म्हणोन सांगितले. चौथा मार, श्रीमंत आमृतरावसाहेब याणी आपले चिरंजीव इनायेकराव यास कैलासवासी श्रीमंत माधोरावसाहेब याचे वटीत घातला म्हणोन लोकास कलऊन श्रीमंत इनायेक माधो नाव ठेवले. याकरिता त्यानी तिकडे हिंदुस्थानचे राजेरजवाडे मेलऊन घेऊन जमाव करून ठाणे बसवितात म्हणो(न) ऐसे पत्र माहोलीचे मुकामास पंतप्रधान यास पो. त्यावरून श्रीमंतांचे म्हणे पडले की, पहिले कैलासवासी नाना फडनवीस होते तेव्हा श्रीमंत चिमणाजी आपा वटींत घालून चिमणाजी माधव नाव ठेवले. त्यात हे दुसरे इनायेक माधोराव जाहाले. फार उत्तम जाले. कोन्ही तरी राज्य राखले असता श्रीमंताचेच राज्ये म्हणतील. परंतु नाव राखावे हे कारन. पाचवा मार, आलीबाहादर याचे चिरंजीव समशेर-बाहादर तिकडे कोठे कैदेत होते ते श्रीमंत इनाइकराव जाऊन सोडविले म्हणोन सांगितले. साहावा मार, सातपुड्यात बंडाचाहि जमाव जाहाला आहे आणि इनायेकरायाचे पत्र त्यास आले म्हणोन सांगत होता. सिंदेहोलकरास भरतपूर-वाल्यान दाहा कोटी रुो खर्चास दिल्हे म्हणोन सांगत होता. सातवा मार, बहिरापा कालेकर सांगत होता की, पोट साहेबाचे पलटणात रो कुशाबा नाईक किबे याणी पुण्याकडे दोन हजार रुो रोकड क्षेत्रीहून घालविली ती मणुशे फलटणा-परियेंत गेले म्हणोन बातमी लागली. पुढे बातमी नाही. आणि पुण्याचेहि पत्र आले की, आपण रोकड पाठविली परंतु आम्हास पावली नाही. तेव्हा ते मणुशे मारले गेले असे दिसते म्हणोन सांगितले. आठवा मार, क्षेत्र मुकामी साहेब देवलोक जाले त्याची कबर बांधावयास शेंभर रुो दिल्हे. आज काम सुरू केले. मेसूरवाल्याचे लस्करास येक लाख रुो दिल्हे त्याची रसीद काल घेतली होती ती आपणाकडे रवाना जाली आशेल. छ ७ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशेल. मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे, बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*News-letter by Balwantrao Bapuji to Elphinstone giving news of the secret mobilization carried on by Bajirao and others. Bajirao is reported to have distributed funds among his sirdars.*

7094

No. 115] [15-9-1817 ?

श्री

( पहिला बंद गहाळ ) बंद २

ठरले तेव्हा किल्याखाली आरब उतरले, त्यास बोलण्याप्रा पार करतील या प्रो वर्तमान आले तो रा दिनकरपंत नाना पटवर्धन हे पुण्याहून येऊन पोहचले. छ १ जिलकादी दोन प्रहरी रा केसोपंत साठे छ २८ सवाली सायंकाली येऊन पोहचले. आगोधर बातमी पोचवावी तर आमचे जासूद पोटास नाही म्हणोन उठोन गेले. आमचा गडी आहे तो डाक वहात आहे कलावे. छ ३ जिलकादी लोक व निशाण किल्यावर जाणार आहे. तुम्ही लौकर येऊन येथे लस्करात पोहोचावे. आल्यावर नथुभाई सर्व वर्तमान सांगतील कलावे. छ ३ जिलकाद हे विज्ञापना. रो केसोपंत साठे याचे सा पा नथुभाई याचे सलाम बाजत सलाम तुम्ही पत्र दर्शनी होताच निघोन यावे, आल्यावर भेटी अती सर्व विदित होईल. कलावे हे विज्ञापना.

¶ *The disturbance at Purandhar is reported in this letter.*

---

No. 116] [25-9-1817

पो ता २८ सपटेंबर सन १८१७

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अली-
शान खुदायगा नवाबसाहेब बल बा-
हादूर याचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाब तसलीमात कुर-निशात बज्या आउरदे मारूज मेर सानख आके येथील खैर सला अखबर देवढी मुकाम क्षेत्र श्रीपंढरपूर ता छ २५ माहे शेपटबर सन १८१७ इसवी मुताबीक छ १३ माहे जलकाद सन १२३२ रोज गुरुवार पो येथास्थित असो विशेष. काल आस्तमानी माहोलीहून संतू वाणी क्षेत्रास आला. त्याणे सांगितले की पंतप्रधान यांची स्वारी पुण्याकडे गेली. बरोबर पंचेवीस तीस हाजार फौज होती. दुसरा मार गड किले माघारी दिल्हे म्हणौन सांगत होता. तिसरा मार गोखले याचे पत्र रो सिवाजीराव घाटगे टेंभूरणीकर यास आले आहे कीं स्वार काये असतील ते घेऊन येणे. चौथा मार रो माणकोजी सिंदे याचे पत्र गुरसालकर कमाविसदार रो माहादाजीपंत यास आले की काही कामकाज लागल्यास जासूद

पुण्याकडे पो. पाचवा मार माढ येथून गुरसालकर आपाजी पा येथे आला. त्याणे सांगितले की माढ्यात पठाण आहे. ठाणेदार तो दुलेखान याचा आस-त्रिसीच आहे. तेथे बोलत होते की दुलेखानास जखमा चहडल्या आहेत. शेहरास रा केला. चेंदुलाल याजवर गर्दी जाहाली. रा रावरंभा वगैरे सरदार मिळून याणे केली. साहावा मार कर्णलसाहेब याचे लस्कर सिना नदीचे आलाकडच आहे. नदीस उतार नाही. सातवा मार छ २२ तारखीची अखबार रवाना केली, ती येऊन पोहोचलीच आशल. शेरीरास आराम होत नाही. क्षेत्राची वस्ती. दोन घोडे जवल. मणुशाचा खर्च वैरन दाची पुल्या १६ हरभरे दोन पायेली. प्रजेण फार. कालच आमासा उघडला आहे. आवशेद उपाये करितो. आराम पडला म्हणजे नरसिंव्हपुरास जातो. लस्कराबरोबर जायाचे म्हणौन दोन महिने होत आले. घोडे विकत घेतले होते. कलावे मार साहेबाचे खिजमर्तात लिहिला आहे. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*This is another news-report from Balwantrao Bapuji saying among other items that Bajirao proceeded from Mahuli to Poona with his army.*

---

*No. 117*] [*26-9-1817*

पो ता ३० सपटंबर सन
१८१७

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार
अलीशान खुदायगा नवाब साहेब
बलबाहादूर याचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाब तसलीमात कुर-निशात बज्या आऊरदे मारूज मेर सानख आके येथील खैरसला अखबार देवढी मुकाम श्रीक्षेत्र पढरपूर ता छ २६ माहे शेपटबर सन १८१७ इसवी मुताबीक छ १४ माह जिलकाद सन १२३२ रोज शुक्रवार पो येथास्थित असो विशेष. रा बापू वैद्य सातारकर येथे क्षेत्रात आहे. तो आवशेद घ्यावयास येत असतो. त्याणे सांगितले की कोकनातून गडी आले त्यानी सांगितले की कोकनात मोठा हालकलोल जाला आहे की, रा दौलतराव सिंदे यानी पत्र फरासिसास पो होते की पूरवीचे तुमचे आमचे इमानभाक आहे त्याप्रो आता आम्हास संकष्ट आहे याकरिता आपण यावे. त्यावरून फरासीस गोयाचे पलाड सिदीगडास आले

आहेत, याकारिता कोंकनात लोकास धाक पडला आहे. दुसरा मार पंत प्रधान याजकडील जासूद बिडाहून आला तो वैद्यबावाचे बिन्हाडीच बरचेवर मार करून निघाला तो सांगत होता की बिडास च्यार कारकून श्रीमंताकडील फौज ठेवितात. परंतु नाव माहाराजाचे सांगोन ठेवितात. जासूद माहोलीस मोठा जलदीने गेला आनी तोच जासूद सांगत होता की, भोसल्याकडील खटले कोल्हापुराकडे देवास गेले होते ते नागपुरास जात होते ते खटले फौजन लुटून वस्त्राविरहित केले. ते बिडास परतून येऊन राहिले होते. मग बीडवाल्याने काही खर्चास वगैरे दिल्हे. मेसूरचे राज्याचे फौजचा खराबा केला. पाच च्यारशे घोडे बंडवाल्यानी नेले म्हणौन वैद्यबावाजवळ जासूद सांगत होता. तिसरा मार जासूद अखबार द्यावयास टप्यावर गेला होता. तिकडून येताना मौजे कुरुडु येथे राहिला होता. तेथे बोलत होते की बारसीस कारकून येऊन बसला आहे. स्वार ठेवितो. चौथा मार माहे शेपटंबर महिन्याचे पगाराबा रसीद जासुदासुधा रवाना केली आहे. जासुदाचे या प्रांती घर आहेत त्यामुळे पित्राकरिता बदले देऊन गेले त्याची नावनिसी.

१ माहादू मोहिता पुन्याकडे लक्षुमणसिंग हजारी याचे बरोबर देऊन रवाना केला तो तिकडच राहिला. त्याचा समाचार कलेना जाणौन यादुजी दौंडकर पुन्याकडून सदासिव दौंडकर हली जवल आहे त्याचे खबरीस आला होता तो ठेऊन घेतला. लक्षुमणसिंगास तीस रुा आम्ही येथे खर्चास दिल्हे. दरमहा पौ घेतले ते येथे रुा २८ आठावीस घेऊन तेथच राहिला आणि त्याचे उतरहि कलेना.

१ विठूबा खांडे याचा बदले संताजी बगल भालेवाडीकर.

१ परसराम म्हसके याचा बदल्या फरूजी मुरबसीचा लेक

१ मानाजी बताले याचे बदल सदासिव थोरात आकलूजकर.

नागपुराकडून आज यात्रा आली ते सांगत होते की तिकडे बंडान मोठा प्रलय केला आहे. आम्ही पार पडून येऊ ऐसा भरवसा नवता. नागपूर सोडोन पावणेदोन महिने जाले. भोसले सिंद्याकडे गेले आहेत. त्यानी नागपुरास पंचेवीस तीस हजार फौज रखवालीस पाठविली आहे. सिंदे होलकर याच्या फौजा येतात म्हणौन आवाई होती. काल दोन जखमी खाटवर होते. बरोबर

च्यार आा चटेकरी होते. भालवणीस गेले कळावें. छ २५ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलच आशल. मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे. बंदगीस राशन हाय हे अर्जदास्त. कर्णेल साहेबासहि अखबार पाठविली.

¶*Balwantrao Bapuji reports the state of alarm of the people owing to the gathering of war-clouds.*

---

*No. 118*] [*27-9-1817*

छ १५ जिल्काद उर्फ भाद्रपद
मास सन समान अशर मयातैन

**श्री**

चिरंजीव राजश्री चिमणाजी रघुनाथ यांचे कुटुंबासुधा सरसालचे खर्चाची नेमणुक भोजनखर्च व धर्मादाय कापड व कारकून आश्रित व शागीर्दपेशा खिजमतगार भोई मशालची प्यादे वगैरे व खाशा चाकरीचे हत्ती घोडे उंट रथ व गाई जनावरे कुल पडले पान इा[+] मार्गशीर्ष शुा प्रतिपदा सन सबा मयातैनापासून सालसंमंधे खर्चाची नेमणूक दोन लक्ष रुपये कुंपिणी इंग्रज बहादर यांचे विद्यमानें केली आहे. त्यास इा मार्गशीर्ष शुा प्रतिपदा सन सबा मयातैन तागायत कार्तिक आखेर साल मजकुरी सन सबा आशर मयातैन पावेतो दहा साल्या वीस लक्ष रुपये नेमणुकेप्रमाणें पावले. हल्ली इा मार्गशीर्ष शुा प्रतिपदा साल मजकूर सन सबा आशर मया तैन तागायत कार्तिक आखेर पेस्तर साल सन समान आशर मयातैन पावेतो कुलबाब खर्चाचे लिहून दोन लक्ष रुपये नेमणूक पैकीं मार्गशीर्ष मास व फाल्गुन मास मिळोन दोन हप्त्याचे एक लक्ष रुपये पावले. ते वजा करून बाकी एक लक्ष रुपयांपैकीं जेष्ट मासचे साल मजकूरचे हप्त्याचे सुरु सन सबा आशर मयातैन व अलफ रुपये

५००००

पन्नास हजार रुपये छ १० रजबी पावले असेत.

हल्ली इा मार्गशीर्ष शुा प्रतिपदा साल गुदस्त सन सबा अशर मयातैन तागायत कार्तिक आखेर साल मजकूर सन समान आशर मयातैन पावेतो कुलबाब खर्चाचे सालिना दोन लक्ष रुपये नेमणुकेपैकीं मार्गशीर्ष व फाल्गुन व जेष्ट मास मिळोन तीन हप्त्याचे दीड लक्ष रुपये पावले ते वजा करून बाकी भाद्रपद मास साल मजकूरचे हप्त्याचे रुपये पन्नास हजार रुपये. ५००००

¶*Bajirao II gives details of the allowance that was assigned for the support of his brother Chimaji Appa, viz. Rs. 2 lacs a year.*

+ इस्तकबील = पर्यंत.

*No. 119]* *[28-9-1817*

पौ ता। ३ आगटोबर सन
१८१७

श्री

हजरत खुदावंत न्यामत सरदार अलीशा-
न खुदायगा। नबाब साहेब बाल बाहादूर
यांचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बादबंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बज्या आऊरदे मारूज मे सानख आंके येथील खैर सला आखबार देवदी मुकाम श्रीक्षेत्र पंढरपुर ता। छ २८ माहे शेपटबर सन १८१७ इसवी मुताबीक छ १६ माहे जिल्काद सन १२३२ रोज रविवार पा। येथास्थित असो विशेष. काल येथे क्षेत्र मुकामी रा। धर्माजी प्रतापराव वंजोर बालेघाटकर बंड हे माहोलीस जाऊन पंत प्रधान याची भेट घेतली. त्यावरून वस्त्र देऊन दाहा हजार फौज ठेऊन दसरा दिवाळीचे सुमार येऊन दाखल व्हावे म्हणौन हुकूम करून बरोबर गोखले यांज-कडील कारकून आसामी देऊन व रा। दाजीबा एतोले बरोबर दिले आहेत. यास पंचवीस तीस हाजार रुपाची हुंडी तूर्त दिल्ही आहे. हाली बरोबर दाहा स्वार आहेत. उदईक येथून घाटावर जाणार. तिकडे जाऊन जमाव करणार. प्रतेक्षे दुसरे बंडच आहे कल्याव. दुसरा मा।र रा। टेंभुरणीकर घाटगे सिवाजीराव यानी च्यार पाचशे स्वार जमा केला आहे. दो चौ दिवसा निघोन पुण्याकडे जाणार म्हणौन हालकारा टप्यावर गेला होता तो सांगत होता. तिसरा मा।र धर्माजी प्रतापराव यानी येथूनच जेथे जेथे स्वाराचे लगे होते तिकडे पा च्यार आसामीस पत्र देऊन जासूद पुढे रवाना केले. चौथा मा।र हुंडी खर्चास रा। गंगाधर लीलाधर याचे दुकानची तीस हजार रुपाची मुदत सतावीस दिवसाची आहे. त्याचे गुमास्ते येथे आहेत त्याजवर आणली आसे. पाचवा मा।र रा। देवराव बावा क्षेत्रीचे कमावीसदार हे काल पुन्यास गेले. कलावे छ २६ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच अशल. मा।र साहेबाचे खिजमतीत लिहिला आहे. बंदगीस राशन होये हे अर्जदास्त.

*¶Balwantrao Bapuji writes about an interview between Bajirao and Dharmaji Prataprao of Balaghat on the subject of the mobilising of forces.*

7099

१२०

No. 120] [17-10-1817

पौ ता २० आगटोबर सन
१८१७

**श्री**

**हजरत खुदावंद * न्यामत सरदार अली-
शान खुदायगा नबाब साहेब बाहादूर
याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदा तसलीमात कुरनिशात बज्या आऊर दे मारूज मेर सानख आके येथील खैरसला अखबार देवढी मुकाम श्रीक्षेत्र पंढरपूर ता छ १७ माहे अकटोबर सन १८१७ इसवी मुताबीक छ ६ माहे जिल्हेज सन १२३२ रोज शुक्रवार पो पो येथास्थित असो विशेष. मिरजचे वाटेकर्डाल जासूद आला, त्याणे बातमी आणली. मिरजस व तास-गावास लोक ठेवितात. दसन्याचे मोहर्त पटवर्धन मंडली बाहीर निघनार म्हणोन सांगोल्यास जासूदच आला होता. दुसरा मार मिरजकर याची पागा मौजे आरन येथे होती ती मिरजस गेली. सरासरी लाहान मोठ घोडे चयालीसक होते. तिसरा मार निपानकर दसरा जालियावर आकलीस येऊन उतरनार म्हणोन सांगो-ल्यास बोलत होते. चौथा मार आनंगराकडील जासूद आला, त्याणे बातमी आणून मौजे येवती येथील पागा मिरजकर याची दसरा जालियावर तिसीक घोडे आहे. ते मिरजस जाणार आहेत, व मौजे पणूर येथील सिलेदार मंडलीचे चालीसक घोडे होते. त्यापौ विसीक स्वार मिरजेकडे गेले व विसीक स्वार व पायदल विसीक करवल ऐसे मिलून बारसीवर रो धर्माजी प्रतापराव जमाव करितो, तिकडे गेले व वैरागकर वाणी कोकणात काही जिणस भरावयास गेला होता. जिणस भरून सावताचे वाडीकडोन येत होता. तेथे रो चेतरसिंग राजा याचे लोकानी लुटून घेतले आणि त्या वाण्यास जखमा लागल्या. तो वाणी आपले गावाकडे गेला तो सांगत होता. बारसीस पुन्याकडोन दोन उंट खजिण्याचे भरून बरोबर पंचवीस स्वार व येक कारकून होता. पाचवा मजकूर क्षेत्रीचे तपासनीस व कोल्याची कटकट जाहाली. यामुले दरोबस्त नावा व सांगडी मौजे गुरसाल याजपासी उतारावर गेल्या आहेत. कलावे छ १९ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशल. मार साहेबांचे खिजमतीत लिहिला आहे. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*Balwantrao Bapuji, a news-writer of the English, reports the activities of the Patwardhans of Miraj and the Desai of Nipani.*

7100

No. 121] [18-10-1817

श्री

यादी मुा मुंबई ताा छ ७ जिल्हेज सन समान अशर मयातैन कलमें.

१ कलकत्याहून छापणीत मजकूर लेहून आला कीं श्रीमंत पंतप्रधान व इंग्रज या उभयतामधें तह होऊन सिलसिला दोस्ती मुस्तकीम जाहाला हा मजकूर पेशजी लिहिलाच आहे. तह जाहाला त्यांत मुलुख सोडून दिल्हा तो जंजिरे मुंबई खाली लगत आला. येणेप्राा ताा बेलापूर व आळगाव व ताा वसई व कल्याण व सर्व इतर मुलुख दक्षण तर्फ गुजराथ शयाद्रि पर्वताचे घाटापासून ते समुद्रपर्यंत दिल्हा आहे. प्राा जंबूसर व डबई व आमोद व देहजबारे व बाहादरपुरा व सावली ताा गुजराथ हाहि मुलुख सरकार कंपणीकडे लाऊन दिल्हा. सदरहू मुलूखाचा पट आहे त्यावरून किती हा मुलूख जंजिरे मुंबईखाली आला याचा विचार समजण्यांत येऊन येक तालुक्यांत विस्तीर्ण मुलुख आला त्याची बेबुदी होऊन आपल्या सांभाल होय ते करावेयास काय केले लागेल ते समजण्यांत येईल. हा सारा मुलुख पूर्वी इंग्रजी सरकाराकडे जंजिरे मुंबईखाली होता तो परत तेथील सरकाराकडेस केला याविसी तेथील रयतानी इंग्रजी सरकारची चाल पाहून फार खुशी केली होती म्हणोन.

१ दौलतराव सिंदे याणी फौजेचा जमाव येकत्र करून व लढवाई सरंजाम सुधा तयारी केली आहे आणि तेथील राजेरजवाडे यासहि पत्र पाठवून त्यासहि सरंजामसुधा तयार केले होत आहे, की विजयादसमीचे मुहूर्ते नर्मदा किनारीं सर्वांही दाखल व्हावे या प्राा येथे बोलवा आहे.

१ बंदर मजकुरी छयापणीत मजकूर छ २४ साबान सन सबात ठरावात आले जे. सरकार इंग्रज व सरकार श्रीमंत पंतप्रधान या उभयेता दरम्यान भाषणाचा कटाव होऊन आला यैसा जे. ज्याजुबैन दोस्तीचा सिलसिला चालत आला यात बिघाड व्हावा, परंतु वसईस तह जाहाला त्यातील कलमबंदी समजुतीत आणावी व दुरुस्त करावी व दोस्तीची तर्की होऊन दोन्ही सरकारच पाहत आहेत त्या प्राा मुस्तकीम व काईम राहावी. आसी आणखी कलमे करून नूतन तह उभयेता सरकारचे दर्म्यान जाहाला हे वर्तमान गोरनर जनरेल कोशलातून आनंदयुग्त जाण करीत आहेत. म्हणोन छ २४ रमजानी छयापणी जाली.

¶*The purport of news published in papers received at Bombay about the negotiations between the English and the Peshwa is given in this paper.*

No. 122] [24-10-1817 ?

पौ मिती छ १९ जिल्हेज

श्री

सेवेसी विनंती. दिल्लीहून सोमवारीं निघालो ते चवथे दिवसीं दोन प्रहरी श्रीमथुरेस आलो. येथून दुसरे दिवसीं निघोन जावे. त्यास चत्रदास महंत डिगेतून फौज च्यार हजारपर्येत घेऊन पेडारी याच्या उपद्रवाच्या रखवालीकरिता मल्याचर जावयास आले आहेत. त्याणी आपल्याकडील मुनसींबराबर सांगोन पाठविले कीं, तुमची आमची भेटी होऊन बोलणे जाले पाहिजे. तरी आज जावयाचे न करावे म्हणून. त्यास आम्ही उत्तर सांगोन पाठविले कीं आम्हास जलदीनें गेले पाहिजे, राहावयास आनकूल पडत नाहीं. त्याजवरून त्याणी फिरोन सांगोन पाठविलें कीं ज्या कामास आपण जातात त्याच बोलण्याकरितां भेटी जाली पाहिजे. मथुरा हीच डीग समजून येक दिवस राहावे. त्यास महंत प्रस्तुत जाटाजवळ पेशथर्णा (?) मुनसी व हे येकचित आहेत. अगत्यवाद बोलण्याचा धरितात. याचे बोलणे न येकावें तरी न जाणो पुढे कसें आहे. दुसरें सर्वतामुखीं महंत कामांत आल्यास फारच चांगले येसे येकण्यांत आले. त्याजवरून राहिलों. उदेक याचें बोलणें प्रात:कालीं येकून दोन प्रहरीं निघोन जाऊ. बोलण्याचा भाव कलेल तो मागाहून लेहून पाठऊं. जरीकरितां बोलण्यांत जीवसा आसला तरी यास बराबर डिगेस न्यावयाचें करूं. जीव नसल्यास कलतच आहे. कृष्णसिंगाच्या सल्यानीच महंतास भेटावेस जाले आहे. यास डिगेस नेणे तरीं त्याच्याच विचारें नेऊ. कलावें. रा छ १२ जिल्हेज बहुत काय लिहिणे लोभ असावा हे विनंती.

¶*The writer says how he came to Muttra from Delhi and how he was prevailed upon by one Chatradas Mahant to halt there and discuss with him the same topic for which the writer was proceeding to Deeg. The letter is in connection with the affairs of the Pindaris.*

---

No. 123] [4-11-1817

श्री

आशीर्वाद विनंती उपरी. इंग्रज विपरीतबुद्धीनें पलटणाचा जमाव करूं लागले. पहिल्या प्रो दंगा करावा असें खचित समजलें. पेशाजी आपणाकडील पत्रें इकडे नि:सीम लक्षाची आली, त्यावरून सरकारांतूनही आपलेविसीं कसें घडलें तो पर्याय ध्यानांत आलाच असेल. त्या तुमच्या नि:सीमपणाचे लेखावर

सरकारांतूनही याची पेरवी चाललीच होती. सांप्रत छ २४ जिल्हेजी त्याजकडे कितेक मार सांगून पाठविले परंतु त्याची निखालसपणाची चाल येकही दृष्टीस न येई. त्यावरून गोखले विंचुरकर पुरंधरे रास्ते पटवर्धन वगैरे सरदार याजकडील फौज जाऊन त्याजकडील चार काली व येक गोरे याचे पलटण यासी लडाई होऊन दुसरे दिवसी फौजा मुकामास आल्या. आता सरकारांतून येविसीं कमती ठरावयाची नाहीं त्याअर्थी आपण आपले फौजेनिसीं निघान जेथें सरकार स्वारी तेथें लौकर येऊन पांहोचावे. मार्गात इंग्रजानी अडथळा केल्यास त्यास तंबी करणेंच पडल्यास करावी, आणि निघोन भेटीस यावें. भेटीनंतर जसा नक्षा ठरेल तसें करावयास येईल. निघाल्याचें वर्तमानाचीं पत्रें वरचेवर येत जावीं. येविसींचे मार रा+ जवल बोलण्यांत आले आहेत ते लिहितील व रा। खंडो मुकुंद आपणाजवल येऊन बोलतील त्यावरून समजेल.

¶*The letter sends news that hostilities have been declared with the English and asks the addressee (whose name does not appear in this paper) to join the Peshwa with his contingents.*

---

*No. 124*] [*5-11-1817*

पा। छ २६ जिल्हेज
आश्विन मास समान
अशर

**श्री**

विनंति विशेष. छ २५ जिल्हेज गुरुवार लस्करचा मुकाम पुणतांब्यावर आहे तेथेंच आहे. पो दोन साहेब निघान येथे आले. उद्या निघोन पुण्यास जाणार. मोठालेच कामगार आहेत. पुण्यास काही विचार करावा याजकरिता आले आहेत. सिंदे याजकडील पेंढार वगैरेचा नेट फार आहे. घाटबंदी मोकली टाकून तुम्हाकडे पलटणे आली आसता पेंढार पाठीलाग करितील व सिंदेहि दाटी करावयाचे विचारात आहेत याजकरिता तुमची मर्जी या वेलेस संपादून घेऊन इकडला तंटा तूर्त मिटवावा आणि सिंदे याजकडील गुंता उरकून पुढे पाहावयास येईल; परंतु हालीं तुम्हास उगेच भय दाखवावे, काही नरमाई दाखऊन तंटा मिटवावा हें साहेबांचे मानस फार आहे. तुम्ही नच आइकिल्यास कोरेगावापावेतो लस्कर आणावें. तरी तुम्ही नच आइकिल्यास तुम्हाकडून आगलीक होऊ द्यावी नंतर काय करणे ते करावे. बहुधा सला करावा हे मनात

---

+ जागा कोरी.

आहे. दोन साहेबाच्या बायका भिलानी धरुन नेल्या पो। येक जिवे मारिली व येक मेली. घाटातून लस्करात जात होत्या तेथे गफलतीने नेल्या. हाली जकाति बोलतात की आम्हास घाबरवावे हे सर्वाचे मनात आहे. सारे साहेब चिंतातुर आहेत. हे विनंति.

¶*The news of the departure of two Englishmen from Puntamba for Poona for negotiating terms with Sindia is communicated in this letter. The abduction of two ladies by the Bhils is also reported.*

---

*No. 125*] [*8-11-1817*

पो छ २८ जिल्हेज

सन समान अशर

मया तैन

**श्रीभवानीप्रो**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**

**नीलकंठराव आबा स्वामीचे शेवेसी**

पांप्य बहिरो नारायेण पिंगले सां ना विनंति येथील कुशल ता आस्विन वद्य १४ शेनवार प्रथम प्रहरपावेतो सातारा सुखरूप असो विशेष. इकडील मजकूर [ नंतर २ कलमें अनवश्यक म्हणून गाळून ]

१ आज पाहाटे येथून श्रीमंत माहाराज सहपरिवारे निघोन वासोटियास गेले. त्यामुळे व आवाई पुणियाहून त्याजमुळे येथे फार गडबड जाहली आहे.

कलम [ यानंतर पुढील २ कलमे गाळली ] हे विनंति.

¶*Bahiro Narayan Pingle reports to Nilkanthrao Aba the departure of Raja Pratapsinh for Fort Wasota. The writer Bahiro Narayan of this and many subsequent letters was the Peshwa's officer in charge of ammunition (see No. 181).*

---

*No. 126*] [*12-11-1817*

**श्री**

शेवेसी नारो विष्णु कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. काल मंगलवारी इंग्रजाकडील जमयत सिरूरचे छावणीतून कूच करून पुण्याकडे चालि(ली). आम्हास बातमी लागताच गणपतीचे रांजणगावापासी गाठ घातली. दोन प्रहरापासून येक प्रहर लढाई जाहाली. येक घोडा ठार व कांही जखमी, लोक कांही जखमी जाहाले. रसद दरोबस्त घेतली. येक तोफ पाडाव जाहाली. त्याणी लोटून गेले. नजीक त्याचा मुकाम यामुळे तेथे उभे राहिलो नाही. कान्यात खिले

मारले. रात्रौ च्यार कोस बाजूस उभे राहिलो. दोन रोज कोणास आंघोल नाही. दाणा बहुत हरभरे वगैरे मिळाले. लुटीत त्याजकडील हरजिनस आला. दोन हजारावर बैल कानानी (लोकानी ?) आणले. गावकरी याणी वगैरे लोकानी चोहोंकडे नेले. दोन पलटणे च्यारशे तुरूप वगैरे स्वार आहेत. मागे पलटणे आसपास नाही. याचे पाठीवरच आम्ही येतो. या जमेतीमुळे हवालदील होऊ नये. अजमामात आहेत. पागेचे बारगिरानी सिलेदार वगैरेनी मेहेनत चांगली केली. मिति कार्तिक शुा ४ बुधवार प्रात:काल रानात उभे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Vishnu describes an engagement between the Peshwa's force and that of the English and adds that the enemy lost his supplies.*

---

*No. 127*] [*17-11-1817*

**श्री**

कार्तिक शुा ८ रविवारी इंग्रजासी दुसरी लढाई मातबर जाहाली. उभयपक्षी माणसे जखमी ठार बहुत जाहाली. जंगी सरंजाम त्याचा, आपला थोडा पडला तो पुरा सरंजाम करून मागती लढाई द्यावी अशा उदेशे तोफखाना काढून कूच करून सासवडास येऊन तेथून कूच दरकूच सालप्याचे घाटाने फालक्याचे पाडळीस आलों. पेशजी लढाई जाहाल्याचा मार लिहून गेलाच आहे. ऐसियास इंग्रजानी सर्व दौलतदारांस जाच करून दौलत हरण करण्यात बाकी ठेविली नाही, व सर्वांचे अंत:करणाचे धर्म कीं श्रीमंत प्रगट जाहल्याखेरीज कोणी धजावत नाही. श्रीमंत प्रगट जाहाले असता सर्वहि प्रगट होऊन येक-समई पायबंद जिकडील तिकडे लागले असता बंदोबस्त होईल, असा सर्वांचा मनोधर्म येकविचाराचा जाणोन इंग्रजासी लढाई सुरू जाहाली त्यास तर तुम्ही तेथे बिघाडाचा मोहरा करून लढाईचा प्रसंग घालावा. अवसर पडेल त्याप्रो हिकडेहि कुमक करावी.

सर्वत्रानी येके समई पायबंद लाविल्यावाचून जेरीस येणार नाही. हिंदु धर्म रक्षावयाचा समय जाणोन सर्व हिंदूंनी येक होणे हे हिंदु धर्मास व कीर्तीस योग्य.

¶*This paper describes a severe action that took place between the English and the troops of the Peshwa. The latter sustained a reverse and went towards Saswad with a view to renew the fighting after making better preparations. The writer says that success will not be possible unless the Peshwa comes out boldly to take the lead.*

No. 128] [17-11-1817

नकल

श्री

राजश्री सिदोजीराव नाइक निंबालकर
सरलस्कर गोसावी यासी

आसीर्वाद उपरी. तुम्ही कार्तिक शुा चतुर्थीचे विनंतिपत्र पाा ते प्रविस्ट होऊन मजकूर समजण्यात आला. काल कार्तिक शुा आस्टमी रविवारी सायंकालचे दोन घटका दिवसास पलटणासी व सरकारचे फौजेसी लढाई सुरू जाली, ती आज इंदुवार प्रहर दिवस प्रात:कालपर्यंत आनि तुंबल चालली आहे. तुम्ही पत्र पावताच फार निकडीने येऊन पोहचावे. जाणिजे छ ७ मोहरम कार्तिक शुा ९ इंदुवार प्रहर दिवस प्रात:कालचा सुरु समान आशर मया तैन व आल्फ मोर्तब.

राा कासी महमद सांडणीस्वार.

¶Sidojirao Nimbalkar is informed by Bajirao of hostilities having been declared with the English and is asked to join with his forces without delay.

---

No. 129] [23-11-1817

श्री

शेवेसी दिनकर रघुनाथ जोग दोन्ही कर जोडून सिरसां नमस्कार विज्ञापना. ताा कार्तिक शुा १५ प्रथमकाल घटका दिवसपावेतो वर्तमान शेवकाचे येथास्थित आहे विशेष. सोमवारी दोनप्रहरी इंग्रज आलपिष्टाण याजकडील येक हलकारा व शेहर पुणे येथील उमेदवार कारकूण, त्याजबराबर याद होती, ती ते दोघे थोरल्या वाड्यापासी आले, तेथे कोन्ही नाही. नंतर गोखले याचे वाड्यात व बालाजीपंत काले व आताजीपंत मामा व कचोपंत मामा याजकडे गेले. तेथे कोन्ही भेटले नाही. तेव्हां इश्रामबाग येथे देवडीवर याद घेऊन आले. त्या यादीत मजकूर कीं कंपीनबहादर शेहरानजीक लस्कर आले आहे. श्रीमंत महाराजाची स्वारी बाहेर गेली आहे. शेहरातील कोण्ही सरकारचे असतील त्यानी येथे बोलावयास यावे ऐसा मजकूर होता. त्याची नकल करून ठेवावी तर याद

मजला देईना आणि जरबेची गोष्ट बोलून निघोन जाऊ लागले; आणि म्हणाले कीं तुम्ही येत नाही तर पुढे कठिण जाईल. त्याजवरून शेहरात देवडीवरील सिपाई गोखले याजकडे पाहावयास पाठविले; परंतु ते कोणी भेटले नाही. तेव्हा मी वा। राजश्री बालकृष्ण शास्त्री वाड्यातील आग्नोत्री आहेत त्यास पुसोन नदी-पलीकडे लेणे आहे तेथे गेलो. तेथे आलपिष्टण व दुसरे गोरे च्यार व बालाजी-पंत नातू व गणेश खेत्री व हरिश्वरभाई ऐसे उभे होते. त्यास भेटलो. नंतर आलपिष्टण याणी पुसिले कीं वाड्यात सिबंदी काये आहे? त्यास मी सांगितले की पाहाऱ्याचे वगैरे बंदोबस्त पुरते लोक आहेत. नंतर बालाजीपंत नातू याणी तिही वाड्यात लोक किती आहेत? तेव्हा मी बोललो की वाड्याचे वाड्यात बंदोबस्त पुरते आहेत. नंतर बालाजीपंत नातू याचे बोलणे बहुत जरबेची पडली; आणि वाडे रिकामे करून हत्यारबंद बाहेर काढून द्यावे लागतील. ही उतरे आलपिष्टण याणी आइकिले, परंतु काही बोलले नाही. हरिश्वरभाई सावकार याजबराबर दोन हाल्कारे देऊन शेहरातील सावकार व दुकाणदार वाणी उदमीयास ताकीद करविली कीं, दुकाणे उघडून कोणी कोठे न जाता श्वस्त आसावे. आम्हाकडून शेहरास उपद्रव होणार नाही. त्यानंतर सायंकाळी च्यार घटका दिवसास दोनशे लोक घेऊन बालाजीपंत व येक गोरा ऐसे आले, आणि सरकारचे लोक बाहेर काढून देऊन आपले पलटणी लोक ठेऊन, बंदोबस्त केला. बुधवारचे वाड्यापासी दोन पाहारे ठविले. व शुक्रवारचे वाड्यापाशी दोन पाहरे ठेविले. मंगलवारी सायेकाली बुधवारचे वाड्यांतील (लो)क काढून दिल्हे व शुक्रवारचे वाड्यातील बालाजीपंत नातू याणी मोजदाद करून कुलपे घालून बंदोबस्त करून काही दाहा पाचे असामी सरकारचे आहेत. बाहेर लोक त्याचे आहेत. बुधवारी सेहरात ताकीद केली की हत्यारबंद आसतील त्यानी बाहेर जावे. सेहरातील बंदोबस्तास हाजार बाराशे मणुश, बालाजीपंत नातू याचे विदमाणे ठेऊन शेहरचा बंदोबस्त केला. विश्रामबागचे वाड्यात त्याजकडील कोणी आले नाही. आपाजी लक्ष्मण हे दोन तीन दिवस विश्रामबागचे वाड्यावरून जात असतात. त्यात सुक्रवारी दोन तीन वेळा दिवस व रात्र मिलोन गेले. याप्रमाणे आजपावेतो मजकूर जाहाला तो शेवेसी लिा आहे. आज्ञा आल्यास पुढे जो मजकूर समजेल तो लेहून पाठवीन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This is apparently a report sent to the Peshwa by Dinkar Raghunath Jog giving an account of how Elphinstone took possession of the Peshwa's capital after his flight.*

7107

No. 130] [About 23-11-1817

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आपा व बापूस्वामीचे शेवेसी पो दिनकर रघुनाथ जोग कृतानेक सां नमस्कार विनंती विशेष. श्रीमंत माहाराजास विनंती पत्र लिहिले आहे हे प्रविष्ट करून आज्ञा होईल तो मजकूर लिहून पाठवावा. दोन तीन वाड्यात बंदोबस्त इंग्रज याजकडून आहे. विश्रामबागचे वाड्यात त्याजकडील कोणी नाही. त्यास वाड्यातील गर्दीचे लोक व परदेसी व ब्राम्हण पाहऱ्येकरी आहेत. त्यास याची कसी काय ती आज्ञा लिहून पाठवावी, त्याप्रमाणे होईल. वाड्यातील दीपाचा बंदोबस्त साठे याजकडून होत होता, ते आता येथे नाहीत. त्याचाहि बंदोबस्त करून पाठवावा. कलावे बहुत काय लिा. कृपा लोभ आसो द्यावा हे विनंती.

¶*Dinkar Raghunath Jog in forwarding his letter to the Peshwa (129) reports the arrangements made by the English for the protection of the various palaces in the Poona City after Bajirao had left.*

---

No. 131] [24-11-1817

**श्रीभवानीप्रा**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री**

**आबा स्वामीचे सेवेसी**

पोष्य बहिरो नारायेण सां नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल ताा कार्तिक वाा १ अस्तमानपावेतो सातारा येथे सुखरूप असो विशष. शुा १० चे पत्र बागवान भाडेकरी याजसाा[1] आले त्या ताा वर्तमान कलत नाही त्याजवरोन चिंता लागली. सविस्तर लेहून संतोषवावे.

१ गला वगैरे भरून पहिली खेप व दुसरी खेप पाठविली आहे ती पावल्याचे उत्तर ल्याहावे. दारू खंडीभर केली आहे, पाचसात रोजी देतो असे दारूवाल्या म्हणत असतो. पदरी पडली म्हणजे रवाना करितो. पुढे आणखी करवण्याचे कसे ? काा

१ स्वारीचा मुाा येथे जाल्यामुळे गला फार महाग सांगतात. जोरी सवातीन पायली, बाजरी उडीद पावणेतीन पायेली, हरभरे साहा सेर असे सांगतात. माहागाईमुले खंडी दोन खंडी येक रकमेन मिलत नाही असे आहे. येवि(सी) चा विचार ल्याहावा. काा

[ पुढील ९ कलमें अनावश्यक सबब गाळलीं आहेत. ]

१ साा=समागमें.

१ विंचुरकर, खासा स्वारी गोखले याजकडील दोन हजार स्वार, काही पुरंधरे मिलोन दाहा (ह)जारनिसी अज पुणियास पाहाटे निघोन गेले. राजश्री बाबा येथे आहेत. श्रीमंताचाहि मुा गोखले वगैरेसुधा पाडली येथे आहेच. का

१ इंग्रजाचा पलटणी दोन पुणियाहून येतात ऐसी बाजार अवाई आहे. का

सदरहू लिाावरून ध्यानात येईल. राजश्री बाबा विच्यारीत होते, सिबंदी किती ठेविली आहे व बंदोबस्त कसा केला आहे. मर्जी राहे असे उत्तर केले. खरिदी गला ध्यावयाचा वगैरे मजकूर तपसील लेहून पाठवावा त्याप्रो घडेल. कलावे बहुत काय लिहिणे, दयालोभ करीत असावा, हे विनंती.

¶*This letter, written by Bahiro Narayan Pingle to Aba Purandare, contains the news that Sardar Vinchurkar, with ten thousand men, had left for Poona. A rumour, that two English battalions have marched from Poona, is also mentioned.*

---

*No. 132*] [*26-11-1817*

## श्रीभवानीप्रो

राजश्री नीलकंठराव आबा सा ना विा विा. काल अस्तमानी लस्कर श्रीमंत स्वारीसमेत देऊरचे मुा गेले. रा बाबाकडे मी गेलो. विंचूरकर याची पुढे गेली ती माघारी परतली. त्याजमुले लस्करात गडबड होऊन बाबाचे आज्ञेवरून बंदनचे खाली उंट हाती होते (त) घेऊन पालीचे सुमारे गेलो. त्यास पुण्याकडून पलटणेहि आली. पुलाचे आलीकडे येऊन पोचली असी बातमी. बंदनचे लोक येतील असे दिसत नाही. तरी लोकाची वगैरे जलद जलद हुशारी करावी. कोकणे वगैरे मिलती(ल) तसे ठेवावे. स्वारी बनेल तिकडे जाईल किंवा कसे घडेल न कले. रवाना शुा कार्तिक वा ३ बुधवार प्रात:काल मुा खोलवडी हे विनंति.

¶*Nilkanthrao Aba Purandare is informed of the embarrassment of the Peshwa.*

---

*No. 133*] [*27-11-1817*

## श्रीभवानीप्रो

**राजश्रिया विराजित राजमान्ये राजश्री**

**नीलकंठराव आबा स्वामींचे शेवेसी**

पोष्य बहिरो नारायेण पिंगळे सा ना विा येथील कुशल ता कार्तिक शुा १३ त्रयोदसी गुरुवार पावेतो येथास्थित आसे विशेष.

[ पुढील ३ कलमे गाळली. ]

१ श्रीमंताची स्वारी काल अस्तमानीं सरदार सुधा माहुली दाखल जाहली. येथून जाणे राहणे समजत नाही. अज राजश्री आबाकडे दान प्रहरने जातो. त्याजमुळे माहागाई फार पडली. [ नंतर ७ कलमे गाळली ] हे विनंति.

¶*Bahiro Narayan reports the arrival of Bajirao at Mahuli on 26th November 1817.*

---

*No. 134*] [*7-12-1816*

**श्री**

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक बाळोजी सावंत कृतानेक विज्ञापना ऐसीजे येथील क्षेम तागायत छ १७ माहे मोहरमपावेतो मुक्काम नागपूर येथें साहेबाचे कृपावलोकनेंकरून आज्ञाधारकाचे वर्तमाण येथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तर छ १३ मिनहूस साहेबांचे सेवेसी विनंती लिहिलीच आहे. छ १३ रोजी प्रहर दिवस येतां श्रीमंत राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर निजून उठलेयावर स्नान देवपूजा करून बसले; तो दीड प्रहर दिवस येतां राजश्री गनपतराव विठ्ठल सुभेदार व सीदी आलीखान व राजश्री रामचंद्र वाघ वेदमूर्त राजश्री मनभट उपाध्ये येऊन बोलत बसले. तो नागपुरापासून पंधरा कोसावर कुही म्हणून गांव आहे तेथून बातमी आली कीं रामकडून चारपांच हजार पेंढारी येऊन तमाम गांव लुटले; व चिनोर म्हणून गांव आहे तेथें पांचसात बायकानीं जीव दिल्हे; व दोन तीन बायेका ब्राह्मनाच्या धरून मुक्कामावर नेल्या. नंतर आनखी गांव मारीत जाऊन उंबरडची पेठ लुटली. आज करमन्याच्या नदीवर मुक्काम करून आहेत. त्याजवरून सेनाधुरंधर यानीं दोनहजार स्वार व चार पांचशे पायेदल व तीन तोफा पेंढारी याचे मुकाबल्यास पाठविले आहेत. दीड प्रहर दिवस राहतानीं कारभारी आपल्या घरास गेले. रात्रौ दरबार जाला नाहीं. वाड्यातच होते. छ १४ रोजीं चार घटिका दिवस येतां निजून उठले. दीड प्रहर दिवस येता स्नान देवपूजा करून भोज्यन जाले. मागील प्रहर दिवस राहतां गनपतराव विठल यांस बोलाऊन सांगितले, कीं तुम्ही आपले फोज्येत जाऊन उतरावे. त्याजवरून ते तैसेच निघून लष्करात गेले. रात्रौ व ग्रहन लागल्यानंतर वाड्यातच स्नान करून दहा ब्राह्मणास दहा गाई वरती पांच पांच रुपये दक्षना दिली; व श्रीमंत राजश्री परसोजी भोसले सेनासाहेब सुभा यांनीं पाचा ब्राह्मनास पांच गाई वरती दक्षेना पांच पांच रुपये दिल्ही. कैलासवासी सेनासाहेब सुभा यांची स्त्री थोरली पार्वतीबाईनी दोन गाई वर दक्षेना दहा रुपये दिल्हे; व मदली अंबिकाबाईनीं एक गाई दिल्ही; व बाकाबाईनीं पांच पांच रुपये दिल्हे. छ १५

रोजी फिरंगी भेटावयास येन्हार म्हणून आपासाहेब यांनीं प्रहरदिवस येतां स्नान देवपूजा करून हनमंत खिडकीत बैठक करून आपन व राजश्री नारायेनदास पंडितजी व रामचेंद्र वाघ व सीदीआलीखान गनपतराव विठ्ठल वगैरे मंडलीत बसले. तो दीड प्रहर दिवस येता जंकिनसाहेब फिरंगी व लाट साहेब व आणखी चार पांच फिरंगी येैसे चिटमिन साहेबास घेऊन आले. यावर सेनाधुरंधर साहेब यांची भेट होऊन एक घटका बोलणे जाले. यावर आपासाहेब यानीं चिटमिनसाहेब पोशाख सनगे चार व मोत्याची कंठी व शिरपेच दिल्हा. नंतर त्याचेच बराबरीचा एक फिरंगी त्यास ज्वर येता त्याजवरून तो आला नवता, म्हणून मुधोजी भोसले यानीं त्याचा पोशाख सनगे चार पैठनी व मोत्याची कंठी व शिरपेच जंकिनसाहेब याच्या हवाला करून दिल्हा. नंतर अत्तर पान दान होऊन फिरंगी आपले डेन्यास गेले. नंतर दोन प्रहरी आपासाहेब याणीं स्नान भोज्येन करून निद्रा केली. साहेबाचे शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Balaji Sawant in the court of Nagpur gives an account of how the Pindaris perpetrated indiscriminate atrocities and plundered the territory and adds that Mudhoji Bhonsle has despatched his force to rout them. Appasaheb's interview with the Resident is also reported.*

---

*No. 135*] [*November 1817*

श्री

विज्ञापना. दापोडीचे रानात पोटाकडील दारू होती त्यास बती स्वारानी देऊन दारूखाना उडविला. गणेशखिंडीचे डोंगराचे उत्तरेस खाली दारूचे घर होते ते उडाले. पंचवीस स्वार नजीक आहेत. नदीचे अलीकडेच होते. हे विज्ञापना.

¶*It is reported that the magazine of gun-powder belonging to Col. Ford was set on fire by his troops.*

---

*No. 136*] [*November 1817*

श्री

शेवेसी विनंती सेवक नारो विष्णु कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. मुा कोरेगांव. आज बुधवारी कोंडापुरीहून इंग्रजाचे कूच जाहलें. आम्ही त्याचे बाजूस रानात होतो तेथून पाठलाग करीत चाललो. तिसरे प्रहरी कोरेगांवीं

आलों. तेथं त्याचा मुकाम जाहाला. रा बाबाजीपंत गोखले येऊन पोंचले. मदनसिंगहि आले. चांहोकडे उभे आहों. तोफाखेरीज इलाज नाहीं. उदईक त्याचें कूच होईल. मार्गात तोफासुधा गाठ घातली तर सरकारकाम होईल. बुनगे, बैल, कचरा लस्करात आहे. यामुळे हवालदील आहेत. सरंजाम थोडका, घोड्याचा दम होत नाहीं. खराबी होईल म्हणोन आसपास चालतो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Vishnu Apte communicates to the Peshwa that the English have marched from Kodapuri and are encamped at Koregaon, and remarks that a fresh supply of artillery should enable him to attack the English.*

---

*No. 137*] [*28-11-1817*

**श्री**

राजश्री जिउबा दादा गोसावी यांसी विनंती विशेष. इंग्रजाचें पलटण आज सालप्याचा घांट चढोन देऊरचे मुकामास आलें. सरकारची फौज कांहीं पाडळीवर व कांहीं घाटाखाली, कांहीं वाईच्या आंगें, कांहीं कोरेगांवावर दो दो कोसाचे छयाप्यानें उतरली आहे. खांसा स्वारी न्हावी रुईचे घांटानजीक आहे. तुम्ही तेथील कामकाज आटोपांत लौकर आणावें. मौजे असगांव आकुशी चादवडी येथील नागली देशमुखी ऐवजीं किल्यास द्यावयाचा करार गावकरी याणी येथें केला आहे, त्यास मदरहू गावची नागली किल्यास घेऊन जावी व अवांतर गावींही इकडून रोखे देशमुखीचे ऐवजीं जाले आहेत. नागली कमळगडास न्यावी, भात पांडवगडास पाठऊन द्यावें. आज तृतीय प्रहरीं ऐवज उतरण्याविशी लिहून गेलें आहे. त्यास ऐवज उतरला नसल्यास उतरूं नये. दाहा आसामी असगावीं ठेविले, आणखीही पांच आसामी तेथें तीर्थस्वरूप राजश्री दादाकडे चौकीस पाठवावे. बाळा गोलंदाज तीन आसामीनसी पत्र घेऊन तुम्हाकडे आला; त्यास तो आला न आला हें लिहून पाठवावें. दारूवाले तेथें आले ते परत पाठविले. त्यास दारूचे कसे केलें तें लिहून पाठवावें. भावडाकडे तगादा करून शंभर गोळे तोफेचे पांडवगडास जरूर पाठवावे. रवाना छ १८ मोहरम शुक्रवार, प्रहर रात्र, लोभ कीजे हे विनंती.

¶*Jiuba Dada is informed of the movements of the flying army of the Peshwa and the pursuing forces of the British.*

No. 138] [29-11-1817

## श्रीभवानीप्रा।

### राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
### आबा स्वामीचे शेवेसी

पो। बहिरो नारायेण पिंगले सा। ना। विनंति उपरी ता। कार्तिक वद्य ६ मंदवारपो। येथास्थित सातारा येथे असे विशेष. आपण सिपाई याजसमा पत्र पा। ते पावले त्याची उत्तरे व इकडील मजकूर

[नंतर ९ कलमांचा मजकूर खाजगी सबब गाळला.]

१ इंचूरकर पुलापार्मा गेले होते त्यास तेथे लढाई होऊन इंग्रजाची पलटणे व तुरकस्वार मिलोन वाट चढून आलीकडे देऊरचे मु।। आले. गांवले तेथे होते ते माघारे पाडली की गांवचे सुमारे आले. विंचूरकर मागे पुलाचे सुमारे राहिले म्हणतात. त्याजवरून शाहरात व देशात गडबड मनस्वी होऊन हवा(ल)दिल जाहली. आज पलटणे कोणीकडे येतात किंवा सातारा येतात न कले. इतक्यावर माल येत नाही ऐवज येथून कसा येईल? खरीदीस खर्च होऊन बाकी ऐवज नरसीदास याचे दुकानी आहे [पुढील १२ ओळी खाजगी मजकुराच्या] हे विनंति.

*¶Bahiro Narayan Pingle describes a skirmish between the English troops and Vinchurkar's levies near Deur and also the consequent disorder in the adjoining territory.*

---

No. 139] [30-11-1817

## श्रीभवानीप्रा।

### राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
### आबा स्वामीचे शेवेसी

पोष्य बहिरो नारायेण सां। ना। वि।। येथील कुशल ता। कार्तिक व।। ७ रविवार प्रात:कालपावेतो स्वस्त असे विशष. आपण आनाजी नां। याजसो पत्रे पा। ती पावली. त्याची उतरे व इकडील मजकूर.

१ राजश्री जनोबाभाऊ व गणपतरावजी व हरबारावजी यास पत्रे पा। ती गणपतराव याजकडे माहुलीस पोचती केली. भाऊ काल दोन प्रहरनंतर श्रीमंताचे लस्करात गेले [यापुढील या कलमांतील मजकूर सात ओळी खासगी सबब गाळला. त्याप्रमाणेच पुढील दोन कलमांतला मजकूर.]

१ राजश्री बाबासी मजकूर बोलावयाचे येविसी लिा त्यास श्रीमंत निघोन पुसेसावळीवर गेले होते. आज इंग्रज पलटणे २ तुरुक ५०० असी कोरेगाव पाडळीमधी जाऊन मुा पोंचला. गोखले पुढे कोरेगांवचे सिंवत आहेत. विंचूरकर वगैरे आपटे मागे कोसी पावकोशी आहेत. काल मुााचे वर्तमान. आज पुढे कसे घडतं नकले. श्रीमंत निघोन मिरजेचे सुमारे गेले, सा रा बाबाहि गेले असतील याप्रो वर्तमान. तव्हा कोणता जाबसाल कसा तडीस जातो. राजपुरीचे भाताचे पत्र घेऊन आपले गणपतराव यांनी रा आहे. इंग्रज सातारा येणार म्हणतात त्यावरून येथील ऐवज सप्रे यावा पा आहे [पुढील मजकूर खासगी.]

¶*Bahiro Narayan sends news to Aba Purandare about Bajirao's move to Pusesavli and towards Miraj.*

---

*No. 140*] [*30-11-1817*

पौ छ २२ मोहरम मन
समान आशेर कार्तिक मास

**श्रीभवानीप्रो**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**आबा स्वामींचे शेवेसी**

पो वहिरो नारायेण सां ना विनंति. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत जावे विशष. वा ७ रविवारचे पत्र पा ते पावले लिा मार समजला. त्याची उतरे व इकडील मजकूर [नंतर ४ लांबलचक कलमांत खाजगी मजकूर नंतर]

इंग्रज याचा मुा काल रहिमतपुरावर गेला. श्रीमंत मिरजेस गले असे लोक म्हणतात. बापू गोखले याचा काल मुा पुसेसावळीवर गेला होता. विंचूरकर याचा धामणेर बोरगाव सुमारे होते. नारोपंत आपटे काल येथे दोन हजार फौजेनिसी आले आहेत. आतांच निघोन जाणार, याजप्रा वर्तमान आहे. मिरजेचे सुमारे इंग्रज जातो. पुढे मागे सरदार जात आहेत, तेथे मुा होता. सिवार दरोबस्त लुटतात व गावातील वैराणदाणाहि लुटून आणितात. इंग्रजानी रहिमतपूरची खराबी फार केली असे ऐकितो. तेथून पुढे गेल्याचे या वर्टिकेपावेतो समजले नाही. भाऊ पोतनीस याजकडे सिपाई बातमीस पा आहे [पुढे मजकूर खाजगी सा गाळला.] हे विनंति.

¶*Bahiro Narayan reports the movements of the English forces and of those of Bapu Gokhale, Vinchurkar, Naropant Nana Apte and other followers of the Peshwa.*

7114

No. 141] [1-12-1817

पौ छ २० मोहरम

## श्रीरामलिंगप्रा

विज्ञापना ताा कार्तिक वा। ७ रविवारपावेतों उतम असे विशेष. इकडील मजकूर. ताम्रमुख याचा मुा माहुलीवर येक सरकारी फौजा असपास आहेत. सातारयावर जाणार आसी दाट आवाई आहे. सारांश त्याची व्याप्ति बहुत जाली. आपले लस्करचे वर्तमान येक लढाई करी द्यावी असे निश्चय सरदार मंडळीचे आहेत; परंतु येश देईल तेव्हा खरे. श्रीमंत मिर्जे दाखल जाले. आठ हजार फौज जवल. (महादे ?) व येथीहि फौजा वीस पचवीस हजार सुमार आहेत. ताम्रमुख तीन पलटणे सारी फिरत आहेत. बाकी पुण्यावर आहेत. गल्ला वगैरे जिनस झाडून पौ आहे. येथे सिल्लक काही येक राहिली नाही. दारूमात्र बाकीची पा देतो, आणि झाड्याची यादहि पा देतो. लोक पौ द्यावे म्हणोन आपण लिहिले; परंतु मीच अनुमान म्हराटे लोक शेरा ६ पडू लागला यास्तव ठेविले नाहीत. इतके असून पाहिजे तरी लिहून पाठवावे. लोक पा देतो हे विज्ञापना.

हो पत्री राजश्री गणपतरावजीस सां नमस्कार विनंती विशेष. राजश्री भाऊ काल निंबावरून गेले. कोरेगावी श्रीमंत मुकामास गेले. ते आपले वाड्यात गेले. मेजवानी जाली. दोनशे पात्र जाले. वस्त्रे देत होते; परंतु श्रीमंताची आज्ञा जाली कीं, समय आजचा नाही. पुन्हा माघारे येताना वस्त्रे घेऊ. घर माझे आहे. मेजवानीस सर्व मंडळी आली होती. राहाता पौ श्रीमंत पंत व आपा साहेब आले नाहींत. आपणास कलावे. श्रीधरपंत यांणी बहुत सीमा केली. लोभ करावा हे विज्ञापना. आम्हास तांदुल पाहिजेत त्यास सरकार खरीदीने सारफेवार पडतील असे पाहिजेत. येविसी येजमानास विनंती करून पत्र यावे. पन्नास हाचे जाले म्हणजे जाले. उतर पा द्यावे हे विनंती.

¶*The writer communicates that the English are encamped at Mahuli and intend to march on Satara. The Sardars of Bajirao, continues the writer, are determined to make a stand against the English.*

---

No. 142] [2-12-1817

## श्री

शेवेसी विज्ञापना माहोलीचे मुकामी बोलणी जाहाली त्यांत प्रसंगी स्वामीनी व आम्ही येके ठिकाणी असावें ही मुख्य मर्जी. त्यास सांप्रत तमाम सरदार आपापले जमेतीसुधां येऊन फौजेची जमियत मातबर जमली आहे. सिंदे होलकर भोंसले आपआपले पोख्त सरंजामानिसी कूच दरकूच इकडेल फौजेचे रोखें येत आहेत

याप्रो बातम्या आल्या. स्वामीचे समस्त मंडळीसुधां स्वारींत येणे व्हावें असे स्वामीचे मर्जीप्रो सर्व सरदारांचें विचारें आम्ही ठरवून विनंती लिहिली आहे. त्यास स्वारींत स्वामीचे येणे घडलें पाहिजे. येविसीं यमाजी व शेकाजी विनंती करितील. मिती कार्तिक वा ९ हे विज्ञापना.

¶*This appears to be a request sent by the Peshwa to the Chhatrapati to join him with his forces and oppose the English in a united front.*

---

*No. 143*] [*4-12-1817*

पौ छ २४ मोहरम

सन समान आसर

**श्री**

विनंती विशेष. काल मंगळवारी इंग्रजाचे कूच घाटाआलीकडून होऊन पुसेसावळीचे पुढे व जयरामस्वामीचे वडगावचे मधी मुा होता. घाटात रात्रीसच कूच करून जाताना तोफेचा कणा मोडला. ते समई इकडील फौज मागे होती. याणी बाण टाकिले, त्याणे येक मेणा मोडला. येक गोरा ठार जाहाला. काही माणसे मेली, घाबरे जाले. तोफ सुरू जाली. इकडील येक दोन घोडी मेली. गोल बांधून रात्रीस तेथेच घाटात होते. कणा नीट करून पुढे मदरहू मुकामास गेले. विंचूरकर यांचा मुा आउधाजवळ होता. पुढील फौज भूषणगडाजवळ होते. सरकारची स्वारीचा रोख पंढरपुराकडे जाला. इंग्रजाचे मुकामास व सरकारचे खासा मुकामास पंधरा सोळा कोसाचा तफावत आहे. याप्रो वर्तमान गडबोले याजकडे आले ते लिा आहे. गडबोले याजकडील कारकून, धावडाकडे गेले तोफेचे करार केले, ते आणावयासी गेला. तो आटकाव करून दोन उपोषणे जाली. पाहरियात दिल्हा म्हणून रा पांडुरंगपंत आबा याणी सांगितले. त्यास त्याचे उतर हे गोष्ट खोटी म्हणून केले. आम्ही धावडास यैवज दिल्हा आहे. काम आमचे करीत आहेत. तुमचा कारकून गेला कधी हे ठऊकच नाही. त्याचे म्हणे आम्ही आगाव यैवज दिल्हा आहे. तुम्ही आपले काम करून घ्यावे व आमचेहि करून द्यावे. कारकून आटकावला आहे तो सोडावा येसे बोलले. त्यास हे वर्तमान ठऊकच नाही. शोध आणून सांगतो, म्हणौन उतर केले. सोलसी व तलये व दहीगावचे सिपाई उठोन आले. गाव उज्याड जाले आहेत. जोरखोरे पौ आडतीस रुा मात्र आले. खरसीकडील पाऊणसे आले. तगादे आणखी पा आहेत. कलावे कृपा कीजे हे विनंती.

¶*The writer describes an encounter between the forces of the Peshwa and a detachment of the English near Vadgaon and adds that Peshwa Bajirao is proceeding in the direction of Pandharpur.*

No. 144] [8-12-1817

श्री

रा कासी सिवराम बंद्रे गो यासी

सुा समान आशर मयातैन व अलफ. श्रीमंत राजश्री माहाराज व भाऊसाहेब व आपासाहेब व माईसाहेब यांस अम्हांकडे यावयाचा बेत हिकडून ठरऊन आणावयाकरितां रा नारो विष्णु व विसाजी देवराव यांस पाठविले आहेत. त्यास माईसाहेबसुधां आली असतां जवाहीर व सोने त्यांजसमागमे यावयाचें ते त्यांचे मर्जीप्रो अवघे यावें; व तुमच्या जवळ सिलक आहे ती चाळीस हजार असल ती स्वारीजवल आणावी.* माईसाहेब व आपासाहेब न आली तर काही सिलक तेथें राहावी व पांच च्यार हजार रुपये माहाराजासमागमे स्वारीत यावे. माहाराजांनी तुम्हास आणिल्यास व माईसाहेब तेथे राहिल्यास रा राघोबा जोसी यांस तेथे ठेऊन तुम्ही माहाराजासमागमे यावे. माईसाहेबसुधां आल्यास तुम्ही व राघोबानें यावे. राणीसाहेब वगैरे तेथे राहिल्यास तुम्ही आपला कारकून ठेवावा. तथील खार्चा बेगमी ठेवावी. माईसाहेब तेथे राहून भाऊसाहेब व माहाराज आले म्हणजे माईसाहेबाच्या व माहाराजांच्या विचारे जवाहीर व सोनें वगैरे जें तेथें ठेवितील तें ठेवावें. जें आणितील तें आणावें. जाणिजे छ २२ मोहरम.

¶*Kashi Shivram Bandre is directed to make arrangements about the royal family at Satara joining the Peshwa and about meeting their expenses.*

---

No. 145] [8-12-1817

श्री

रा नारो विष्णु आपटे गो यासी

सुा समान आशर मया तैन व अलफ. हे दिवस नाजूक, याअर्थी श्रीमंत छत्रपति माहाराज त्रिवर्ग व माईसाहेबसुधां आमचे स्वारीत असले पाहिजेत, हे ध्यानात येऊन, तुम्हास लिो असे. तरी तुम्ही आपलेकडील नेमणुकी लोकसुधा हे वर्तमान बाहेर कोणास न समजता कूच करून, वासोट्यास जाऊन, त्रिवर्ग बंधू माहाराजसुधां व माईसाहेब यास घेऊन, वाटेची चहूकडील बातमी हुशारी राखून, जिकडे स्वारीचा रूख होईल तिकडे येऊन रातबिरात करून, लस्करचे मुकामीं लौकर दाखल होणे. हे काम सहस्त्र कामांत नाजूक; (तु)म्ही सरकारचे विश्वासूक व हे काम करावयाजोगे हे मनात आणून, या कार्यास तुमची योजना केली (असे). यांत

ज्या तऱ्हेने माहाराजाची स्वारी आम्हाजवल दाखल होय तें करावें. चोहोकडील बातमी वर्तमान नित्यानित्य आणऊन घेऊन, ज्या मार्गे आपली निभावणी होय त्या मार्गे घेऊन पोहोंचावे. आणि आपण ज्या मार्गे याल, त्या मार्गाची सूचनार्थ विनंती नित्यानित्य लिहीत असावी. ज्या मार्गे येण्याचे त्याहाल तीं माणसें बहुत विश्वासूक पाठवीत जावीं जे, त्यांणी हर कोठेहि हें वर्तमान मार्गात न बोलता स्वारीसमक्षच विनंती करावी. हीं पुर्तपणें येणारा मनुष्यास ताकीद असावी; त्याजवळ चिठी दिल्ही असतां हर कोणा परिख्याची गाठ पडली असतां चिठी गिळोन जावी. याप्रो येणार माणसास सांगणे असावें. लिा प्रा च्यारी स्वाऱ्या निघाल्यास उतमच आहे. त्यात माईसाहेबांचे मानस नच निघावें असें असल्यास त्रिवर्गास घेऊन यावें. त्यांतहि फारच आग्रह असल्यास आपा साहेब माईसाहेब यांजवल राहातील.

¶*Naro Vishnu Apte is instructed by the Peshwa to escort to his camp with utmost care and secrecy the Maharaja of Satara and his brother and to observe utmost caution about his movements.*

---

*No. 146*] [*8-12-1817*

## श्रीभवानीप्रो

राजश्रिया विराजित राजमान्ये राजश्री
आबा स्वामींचे शेवेसी

पो बहिरो नारायेण सां नमस्कार विनंती येथील कुशल ता कार्तिक वा ३० पो येथास्थित असे विशेष [नंतर २ कलमें खाजगी मजकूर गाळला.] नारोपंत नाना आपटे येथे काल अम्तमानीं घेऊन पोचले. दोन हजार स्वार सा आहेत. श्रीमंताची स्वारी पंढरीवरी आहे. सोलापूरचे सुमारे जाणार असी आवाई आहे. इंग्रज पिलवाचे सुमार मुा आहे. भोवते सरदार कोशीं दोन कोशी आहेत. याजप्रो वर्तमान आहे. बापू सिंदे याजकडील दाहजार फौज सुधा काही पलटणे भीमेवर आले आहेत असी वंदता. याजप्रो नारोपंत आपटे काही ऐवज न्यावयास आले आहेत असी बाजारआवाई, मजकूर मागाहून लेहू [नंतर ३ कलमें खासगी मजकुरीची गाळली.] हे विनंति.

¶*Bahiro Narayan informs Aba that the Peshwa is at Pandharpur, that Naropant Nana Apte has arrived to convey treasure and that the English have moved their forces near Pilav with the Maratha Commanders hovering about them at a short distance.*

7118

No. 147] [10-12-1817

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री निलोपंत आबा देशपांडे
स्वामींचे सेवेसी

पो। श्रीधर बलाल दामले मु॥ को वाई सां। नमस्कार विनंती. येथील वर्तमान ता। मार्गसीर्ष शु॥ २ पावेतो यथास्थित असे विशेष. इकडील मजकूर तुम्ही एकून असाल व सविस्तर आज ता। राजश्री कृष्णाजीपंत दाजी सांगता कळो येईल. आम्ही उदईक निर्वान लस्करात सातारियास जाऊन चालते होऊ. वासोट्याहून मुख्य ग्रहस्त यास घेऊन जाणार. राजश्री सदासिव माधवराव दीक्षित वाईस हाली आहेत. येथे काही उपद्रव जाल्यास तुम्हाकडे येतील. जागा देऊन चौकीचा वगैरे बंदोबस्त करावा. येविसी माहुलीचे मु॥हून भाऊनी तुम्हास त्याजवळ पत्र दिल्हे आहे, व तुमचाहि परिचय आहे. कळावे. आज ता। सर्व सुखरूप आहो. पुलावरचे लढाईत आमचे पागेतील च्यार बारगीर घोड्यासुधा ठार जाले, व पुण्यावर साहा ठार जाले. वरकड सुखरूप आहों. बहुत काय लिहिणे लोभ करावा. राजश्री कृष्णाजीपंत दाजी यास आपण आणिले आहेत त्याजवरून विनंती जे पेशजीचे प्रकर्णी पेचात आहेत. हाली समय आहे. हरयेक काम सांगोन पेचातून बाहेर काढावे हे तुम्हाकडे आहे. हे विनंती.

¶*Shridhar Ballal Damle from Wai communicates to Nilopant Deshpande that ten horsemen from the troops under his command fell in the battle of Yeravda and further states that he is to proceed to Satara.*

---

No. 148] [10-12-1817

श्रीभवानीप्रो

राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री
आबा स्वामीचे शेवेसी

पो बहिरो नारायेण सां नमस्कार विनंति येथील कुशल ता। मार्गसीर्ष शु॥ २ बुधवार पो येथास्थित आसे विशेष [नंतर १३ ओळी गाळल्या आहेत] श्रीमंताची स्वारी नरसीपुरास आहे तेथूनहि पुढे गेली म्हणतात. कोणता मार्ग आद्यापपर्येत समजत नाही. इंग्रजहि मावे मावे आहे. पुण्यातील वर्तमान आपले येजमान खासे याचे वाडियात ज्यलचर दोन असामी येऊन वाडियाची कुलपे काढून

वाडा पाहून मागती माघारे कुलपे घालून गेले. याजप्रो वर्तमान खास आहे. वरकड अधिकोत्तर ल्याहावे असे नाही. आपटे येथेंच आहेत. कळावें हे विनंति.

¶*Bahiro Narayan writes to Nilkanthrao Aba communicating the arrival of Bajirao at Narsinhpur, being pursued by the British.*

---

*No. 149*] [*18-12-1817*

पौ छ १० सफर सन-
ममान आशर

**श्रीभवानीप्रा**

राजश्रिया विराजित राजमान्ये
राजश्री आबा स्वामींचे शेवेसी

पो बहिरो नारायेण सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। मार्गसीर्ष शुा १० पों। येथास्थित असो विशेष. आपण छ ९ सफरचें व छ ७ सफरचे पत्र पा। तें पावले लिा मजकूर कळला, त्याचीं उतरें व इकडील मजकूर.

[यापुढील १ कलम गाळलें आहे.]

१ दारू व गंधक सोरा सत्वर पाठऊन द्यावा म्हणोन लिा. त्यास दोन बैल भरून सोला मण रां केली आहे, व काल वतीस मण च्यार बैल भरून रवाना केली आहे. येऊन पावली असेल. आणखी दारू तयार होत आहे. गंधक सोरा सिध्य आहे परंतु ऐवज नाही, याजमुळे हस्तगत होत नाही. त्यास ऐवज खरीदीचे आनुमानानें सत्वर पाठऊन द्यावा.

| | |
|---|---|
| गुा नरसीदास | गुा बालापा |
| ६ गंधक रास | ४॥ गंधक रास |
| ३॥। सोरा | ३॥। सोरा. |

याप्रों। आज भाव सांगतात. मासले पा। आहेत. पाहून कोणत्या मासल्याचा जिनस पाहिजे जरूर किती लेहून पाठवावा त्याजप्रों। रा। करितो. दारू ही पाचशाची जाली म्हणजे आणखी पाचशाची सही करितो. दारूवाल्यास ताकीद होत आहे तो उतर पाठवावें. पाहिजे तरी घ्यावी, नाही तरी दुसरे गिराईक घेत आहे. पुढें तंटा नको असे म्हणतो.

[यापुढील ९ कलमें गाळलीं गैरलागू व अवांतर मजकुराचीं.]

१ बातमीचा मजकूर ल्याहावा खरें, परंतु प्रमाण वाटत नाही याजमुळे कसे ल्याहावे. असो. गारदोंडवर श्रीमंताच्या स्वारीचा मुा आहे. इंग्रजहि

फलटणाचे मुमारे श्रीपंढरीकडून आला. आज जेजोरीवर जाऊन पुणियास जाती म्हणतात. सरकारची स्वारी पुणियास जाणार असे बाजारआवई. प्रचितगडचे बंड फार माजले आहे. पालीपर्यंत येऊन स्वारी करू लागले होती, ती परत आज सातारियास आली. का

सदरहू लिहिल्यावरून ध्यानात येईल. सारांष एवज पाठवावा. तुम्ही अमले जिनसाचा तोटा म्हणोन लि।, त्यास आपण याद्या त्याप्रो रवाना करीत आलो. पुढे लि। येईल तसेच करिता येईल. बहुत काये लिहिणे, लोभ करावा हे विनंती.

¶*Bahiro Narayan writes to Aba Purandare about the intended moves of the Peshwa and the preparation and supply of gunpowder.*

---

*No. 150*] [*18-12-1817*

पौ छ १४ सफर

श्री

१ मेळघाटाहून छ २४ मोहोरमची पत्रे आली त्यांतील मजकूर बि।।

१ गोविंदबक्ष याजकडील स्वार पायदळ अंमल बसवावयास येणार ही बातमी उंबरावतीहून आली. पुण्याहून पत्रे आलीं कीं, सरकारची आज्ञा जाहाली आहे. ठाण्याठाण्यास लोक पाठऊन बंदोबस्त (रा)खावा. त्याजवरून ठाण्याठाण्यास लो(क) (पा)ठऊन बंदोबस्त राखून, हुशार आहों. गोविंदबक्ष आले तरी चिंता नाही. मोहरम सफर दु माहीच्या हुंड्या व पट पो। म्हणजे इकडील काळजी किमपिहि करू नये. वीस हजार फौजेचा जमाव आला असता डगत नाही. नवे स्वार पायदळ दोन तीनशेपर्यंत ठेविले आहेत. अनखीहि लागेल तसा जमाव करितो. मेळघाटापासोन साठ साठ कोशपर्यंत इंग्रजाचा व गोविंद बक्षी याचा कोण्ही फिरकू देत नाही. हुंड्या सत्वर पत्रदर्शनी पाठवाव्या. दिवसगत लाऊ नये. हुड्या येण्यास दिवसगत लागली असता येथील सिबंदीस भरवसा येणार नाही. हेच लोक आम्हास शत्रू होतील असा मार आहे. सह(स्र)पत्राचे ठिकाणी हे पत्र मोजून पत्र पावताच हुंड्या सत्वर पो.

१ रमजानचा रोजमुरा सिबंदीने अडऊन घेतला. दोन उपोषणे सिबंदीने घातली. निरुपाय जाणोन कर्ज काढून रमजान दिल्हा.

रमजानच्या पावत्याहि घेतल्या आहेत. राजश्री बापूजीपंत दादा गडबोले याणी सिवबंदीस पत्र लिहिले होते कीं, रमजानचा रोजमुरा कोणासच नाही. तुम्ही मागू नये असे पत्र होते, ते पत्र त्यास दाखविले. त्यास पत्राचे उतर त्याणी सांगितले की, येक रोजमुरा सरकारांत देणें तो पुणियास गेल्यावर हुजूर देऊ. येथे देत नाही. याप्रमाणे उतरे सिवबंदीने करून धरणे पारणे बसऊन रमजान घेतला. (हा) मार सरकारांत कलवावा. ऐवज कर्जाऊ सावकाराचा घेऊन दिल्हा आ(हे). येथे सावकारापासी आता पैसा मिळावयाचा नाही. अडतीवाल्यानीं दुकानें आटपिली. आजपर्यंत सावकारी व्यवहार नीट होता. आता दंगल माजून गेली, याजमुळे जेथे तेथे आटपून व्यवहार बंद जाहाले. ठाणीं पांच महिने उठविली. याजमुळे व राजे याणीं बंड माजविले, याजमुळे मेलघाटची रयत परागंदा जाहाली. भोसले याचे मुलखात गेली. रयतेस धीर भरवसा देऊन आणितो. मेलघाटास महर्गता फार आहे. दाहा शेराची धारण आहे. सिवबंदी जवल पैसा राहत नाहीं. अश्या अवस्था ठाणी पाच महिने उठली होती याजमुळे जाहाली. बरें असो. मोहोरम सफर (दु माहीच्या) हुंड्या मात्र जलद पाठवाव्या. पागेचे (घो)ड्याचा खर्च आम्हासच पाहावा लागला, यास्तव हुंड्याची रवानगी सत्वर व्हावी.

१ मेलघाटचे नेमणुकेस विंचूरकराचे स्वार होते ते स्वार श्रावणमासीच उठून गेले. त्याचे मोबादला नूतन नवे स्वार ठेविले आहेत. विंचूरकराकडील स्वार येत असलियास लिहोन पाठवावे. विंचूरकराचे स्वाराचा मार सरकारचे कानावर घालावा.

१ नागपुरास लडाई जाहाली. लढाईची आवाई आली कीं, सात प्रहर लढाई होऊन बारा गोरे ठार जाहाले. गोरे मोठेच मेले. तहकीक मार मागाहून लिहो.

१ हरदेहांडे व अशेरगीचा किला इंग्रजा(स) सिंद्यानीं दिल्हा. हरदेहांड्यास मात्र अंमल बसला. अशेरकरानें गोळी वाजिवली. इंग्रजाचे पलटणचे गल्याचे बैल अशेरकराने नेले.

१ पुण्यांत लढाई जाहाली याजमुळे झाडून चोहीकडे सर्वत्रास हुशारी आली. तमाम जागोजागा हुशार जाहाले. मीरखान नरमदेवर येणार. होल्कर इंदुरावर येणार. तमाम फौजा बाहेर निघाल्या. सर्वत्रास हुशारी आली.

१ दारू सिसे खरेदी करून ठाण्याठाण्यास पाठविली आहे, व जवळ सिलंकेस राखिली.

येणेप्रमाणे कलमे लिहिली आली आहेत.

१ (मेळ घा)टास धारण माहाग व रमजानचा (रोजम)रा सिवबंदीने अडऊन घेतला. या * * * * तेथे सिलक नाही व सावकारीहि ऐवज मिळावयाचा नाही. रयत परागंदा असी अवस्था लिहिली आली. त्यास दिवस येक तरेचे पडले. कलेल तसा बंदोबस्त राखण्याविसी लिहिता; परंतु मोहारम सफर दु माही पट व हुंड्याचा ऐवज देण्याविसी राजश्री विनायकपंत अंणास पत्र द्यावे, म्हणजे पट व हुंड्या रवाना करून देतो. विंचूरकराचे स्वाराचा मार लिहून आला, त्याचे उतर कसे काय पाठवावयाचे ते लिहून यावे. त्याप्रमाणे मेळघाटास लिहिता. अणाचे पत्रांत ल्याहावे की, कोणत्याहि गोष्टीचा हिसका न घेता पट व हुंड्या रानडे याजपासी (पाठवा)व्या म्हणजे पट व हुंड्या मेळघाटास रवाना करितो.

¶*The paper gives the purport of letters received from Melghat particularly relating to the probable occupation of the ghat by Govind Baksh, to the payment of troops and to some light skirmishes between the English and the Marathas at Nagpur, Poona and other places.*

---

*No. 151*] [*18-12-1817*

पौ छ १३ सफर मार्गसीर्ष

मास समान अशर.

यादी मार्गसीर्ष शु॥ १०.

**श्रीगजाननप्रा**

१ मुंबईस गोऱ्याच्या बायका व पोरं पाहोचवावयास खडकीहून पलटणचे लोक गेले होते. ते लोक पोहोचऊन आले. नवे लोक काही आले नाहीत. मुंबईस लोकांचा भरणा नाही.

१ दारूगोळी वगैरे सामायन आण्यास हजार बैल लंबाणाचे मुंमईस गेले.

१ पाच लक्षाच्या हुंड्या कलकत्याच्या हरेश्वरभाईस देऊन पुण्यांत भाईपासोन खर्चास यैवज घेतात.

१ सिंद्याच्ये डाकेच्या थैल्या पुण्याजवळ घोरपडे याचे स्वारानी धरिल्या. त्या थैल्या गोरे फोडून पाहाणार. त्याची बातमी हिंदुस्थानची पंधरा दिवसांत आली नाही, याजकरतां पाहाणार व मराठी पत्रात देशावरीच्या खबरा काय लिहितात त्या पाहाणार.

१ अलपिष्टणाकडे गारपीराहून रसद व रोखीचे बैल भरून जात आहेत. बैलाबरोबर हजार अकराशे पलटणचे लोक आहेत. रसद तेथे पोहोचल्यावर पलटणच्या दोन टोळ्या करणार.

१ सरकारांत दोन गोरे धरले आहेत. त्या गोऱ्यास सोडऊन आण्याकरिता गारपिरावर गोऱ्याच्या मसलती चालल्या आहेत. प्रथम त्यास बातमी लागली कीं केलंज्यावर आहेत. त्याजवरून पुण्याहून दोन पलटणे पाठवावयाचा बेत करीत होते. तो केलंज्यावर नाहींत कांगोरीवर आहेत असी बातमी लागली. त्याजवरून त्यांणी कांगोरीकडे बातमीदार पाठविला आहे. पलटणें पाठविणार होते; परंतु गारपिरावर फारसी लोकांची भरती नाहीं. सबब आठ पंधरा दिवस पाठवीत नाहींत. बातमीदार आल्यानंतर कसा काय बेत करितात त्याचा शोध लागेल. त्यास मोठी चटपट दोन गोरे अटकेत पडले म्हणोन लागली. ते दोन्ही गोरे मोठे आहेत. लाटाचे खालीखालींचे आहेत असा त्याचे बोलण्याचा भाव आहे. त्या गोऱ्याकरितां कोट्यावधि रूपये खर्च करणार.

¶*News of the various movements of the English is reported.*

---

*No. 152*] [*26-12-1817*

पो छ २० सफर

**श्रीभवानीप्रा**

**राजश्रिया विराजित राजमान राजश्री**

**आबा स्वामीचे शेवेसी**

पो बहिरो नारायण सां ना विनंति येथील कुशल जाणून स्वकीये कुशल ता मार्गसीर्ष वा ३ शुक्रवार त्रितीय प्रहर पावेतों यथास्थित असे विशेष [ पुढील ३७ ओळी मजकूर खाजगी. ] श्रीपंढरीवर दोन पलटणे व हजार तुरपस्वार येऊन क्षेत्रातील सर्पण व कडबा कर्हा करून आणितात व पलीकडे गोखले याजकडे माहाल सरंजामी वगैरे होते तेथे आमल बसविला असे म्हणतात. [ पुढील ४ ओळी खाजगी मजकूर. ] स्वारी नासिकाचे सुमारे गेली. सिरोर कुकडीवर इंग्रजाची पलटणे आहेत. पूर्ववत गोखले विंचूरकर आहेत. पुणे येथील साहुकार व रयेत जाहाडून पळून आपलेले सोईने जात आहे, या प्रो बाजार आवाई बोलतात [ पुढील १०।१२ ओळी खाजगी मजकूर ] हे विनंति.

¶*The movements of the English forces near Pandharpur and those of the forces under Gokhale and Vinchurkar are mentioned in this letter by Bahirao Narayan Pingale.*

No. 153] [27-12-1817

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य**
**राजश्री तात्या व बापू व आपा**
**स्वामींचे शेवेसी**

पो सोयरो परशराम सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ १८ मोहरम पावेतो मुा किले वर्धनगड येथे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील मजकूर काल दोन आसामी रामोसी साल्प्याचे घाटाखाली बातमीकरता पाा, त्या आज पाहाटी आल्या. त्याणी तोंडजबानी वर्तमान सांगितले की, इंग्रजाचा मुकाम साल्प्याचे घाटाखालिता बारव येथे आहे. आपल्याकडील फौज राा नारोपंत नाना इंग्रजाचे पछमेस, त्याचे सेजारी नदीचे आंगास डावे बाजूस धरमाजी वणजारे गोखले याजकडील, इंग्रजाचे उतरेस लोणंदेचे आंगास विंचूरकर, पलटणाचे दक्षणेस साल्प्याचे घाटाखाली रामचद्रपंत सुभेदार, याप्रमाणे फौजा गोल्याच्या टप्याबाहेर पलटनानजीकच आहेत. फौजेचा सुमार सांगण्यांत आजमासे च्यारी तोंड मिळोण बारा तेरा हाजारपर्येत आहे. बापूसाहेब साल्प्याचे घाटावर मौजे देवरावर आहेत. काल आस्थमानचे च्यार घटका दिवसपरियत लढाईचे तोंड नवते. आजहि बातमीदार पाा आहेत. वर्तमान येईल तैसे लिहून पाठऊ. येथील किल्यानजीक खेडी आहेत, तेथे चौक्या बसाविल्या आहेत. त्या चवकीवर काल दोन प्रहरा श्रीपंढरपूरकर ब्राह्मण माहुलीहून आला, तो पंढरपुरास जाणार. त्यास चवकीवर विच्यारले कीं कागदपत्र काय असतील ते द्यावे. नंतर त्याणे काय कागद होते ते स्वाधीन केले. त्यास वरकड कागद उगीच जाबसाली होते, ते भटजी मार याचे हावाली केलेहि. चिठीचा संवशय आला म्हणोन चिठी घेऊन आपल्याकडे पाा आहे. कलावे बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

¶*Soyaro Parashram describes how the Peshwa's army has surrounded the English army encamped at Salpa but is avoiding engagement at close quarters owing to the latter's powerful artillery.*

---

No. 154] [28-12-1817

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**वामनराव तात्या व बापू व आपा स्वामी-**
**चे शेवेसी.**

पो सोयरो परशराम सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता छ १९ मोहरम प्रथम प्रहरपावेतो किले वर्धनगड येथे वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील

मजकूर तर काल छ * मिनहूस प्रात:काली इंग्रजाकडील पलटणे सालप्याच्या घाटावर चालून आली. घाटावर राजश्री रामचंद्रपंत सुभेदार याचे व इंग्रजाकडील पलटणेची लढाई जाली. रामचंद्रपंत सुभेदार यास डावे दंडास गोली लागली. आपलेकडील पाच च्यारशे घोडे व माणसे पडले, व जखमी जाले, ऐसी वदंता आहे. राजश्री नारोपंत नाना आपटे व विंचूरकर वगैरे फौजा पलटणचे मागेच आहेत. पलटणचा मुकाम देवरावर आहे. श्रीमंत राजश्री बापूसाहेबहि देवरा-नजीक येक कोसाचे अंत्राने आहेत. आपण पत्र पो कीं नीरथडीपासून बातमी राखून बंदोबस्त नीट राखावा म्हणोन आज्ञा आली. त्यास येक दोन वेला जाजती सिबंदीविसी लिा त्याचे उतर आले नाहीत. मी तर पनास आा जाजती ठेविली आहे; व आणखी पनास ठेऊन आज्ञेप्रो बातमी व बंदोबस्त ठेवितो. गडकरी याजकडोन किल्याचा व दोही खिडीचा बदोबस्त ठेविला आहे. किल्यावर सिलकी गला व दारूगोली आगदी नवती याजमुळे तूर्त तीनसे रुपयाचा गला व तीनसे रुपयाची (दारू) खरीदी केली आहे. आज्ञा न घेता इतके सामान सरकार सिलकी केले आहेत. गडकरी याच्या सनदा मोकल्या केल्या आहेत; परंतु त्याचे म्हणणे) की सरकारची सनंद चौकी पाहारा व अलंग * * बंद करून, राजश्री आत्माराम लक्ष्मण यांचे आज्ञेत वर्तोन, सरकारचाकरी नीट राखणे. याप्रो सनंद आणवावी. त्याजवरून शेवेसी विनंती लिा आहे : तर याप्रो किले वर्धन-गड येथील गडकरी याची सनद पाठऊन द्यावी. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंती.

¶Soyaro Parashram describes an encounter that took place near Salpa between the force under Ramchandrapant Subhedar and detachments of the English.*

---

*No.* 155] [28-12-1817

छ २० मोहरम

## श्रीरामलिंगप्रा

विज्ञापना ताा छ १९ मोहरम रोज मंदवारपावेतो उतम असे विशेष. आपण पत्र पो ते पावले. लिा मार कलला. येथून जिनस गला पो आहे, त्याची आलाहिदा याद आहे, त्याजवरून कलो (येईल.) इकडील वर्तमान श्रीमंताची स्वारी मिर्जेदाखल पावली. देऊरावर गोखले खासे व रास्ते पुरधरे आहेत. फौजा विंचूरकर वगैरे पुलापलीकडे आहेत. पलटणे सालप्याचे घाटा-वर आली आसी आवई आहे. पाच साहा हजार फौजेनिसी देऊरावर गोखले वगैरे आहेत. हे मागे हटले म्हणून ऐकिले. कालपासून त्याची लढाई चालली

आहे; परंतु सरकारी फौज हवालदील. चडाई त्यांचीच आहे. श्री यश देईल तो दिवस खरा. सेवेसी श्रुत व्हावें हे विज्ञापना. दिा लक्ष्मण ना याचे लोक आा ८ पौ गावा(व)र वसुलास पा आहेत. असाम्या ४ मागून आा १ पा यो ५. विचूरकर याजकडे आसाम्या २ यो मात आम्हाजवळ आा १ यो आठ काल दोन आा २ याचे दिमतीत ठेविले. त्याजप्रौ गनपाबरोबर आा १ पा आहे व येथे नव्या पौ येक आहे हे विज्ञापना.

जोरखोर याचे पाते तेथे आले असल्लच. इकडील गावाचे आज उद्या येऊन पोहचेल. कलावें हे विज्ञापना.

¶*The writer gives an account of the battle of Salpa and mentions that the forces of the Marathas have suffered a retreat.*

---

*No. 156*] [*December 1817*

श्री

शेवेसी नारो विष्णु आपटे कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. इंग्रजाचे कूच होऊन नीरेवर येत होता. मार्गात गाठ घातली. पाच च्यार घोडी माणसे जाया जाहाली. त्याजकडील येक गोरा, पाच च्यार तुरूप पडले. तोफेपुढे खराबी फार होऊ लागली. यामुळे सरकोन राहिलो. पूर्वेकडे विंचुरकर रास्ते याजकडील जमयत आहे. पश्चमेकडे आम्ही आहो. जमयेत बरीच आहे. कल्वार[+] फार आहे. निपाणीकर आले आसल्यास आपले त्याचे मिळोन, पाच हजार पायदळ पाच तोफा पाच हजार स्वार पुढे घाटानजीक आले असता सर्वत्र येकडील होऊन, येवढी जमयत मारली म्हणजे सर्वत्रास चांगले. यात आलस जाहाल्यास परिणाम कठिण. तोफा येणेविसी अनमान होऊ नये. मिति भोमवार. श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Vishnu Apte describes an engagement with the English near the river Nira.*

---

*No. 157*] [*December 1817*

श्रीपुरवणी[१] २

१ गोरे अटकेस आहेत त्या गोऱ्यास गारपीरवाल्यानी पत्र लिहून कोणा ग्रहस्थापासी दिल्हे आहे. त्याजपासी पत्र देऊन पत्राचे उतर आणावे.

---

+ कल्वार = बाजारबुणगे; The baggage and followers of an army.

१ पत्र विठ्ठल विनायक याचें.

7127

त्या पत्रात मजकूर की, तुम्ही स्वस्थ असावे. पाच महिनेपर्यंत आम्ही पंतप्रधान याजबराबर लढतो. नंतर तह करू. तुम्ही काही काळजी करू नये. तुमचा खाण्याचा वगैरे बंदोबस्त कसा आहे तो लिहून पाठवावा. याप्रमाणे पत्र येका वरखावर इंग्रजी अक्षराचे आहे. ते पत्र घेऊन तो ग्रहस्त कांगोरीखाली जाणार. त्या ग्रहस्ताने किल्यावरचे गोऱ्यास कागद पोहोचऊन उतर आणून द्यावे, याबा लाख रुपये द्यावयास केले आहेत. अनखी त्या ग्रहस्थास गोऱ्यानी सांगितले की, काढून आण्याचा प्रयत्न चालल्यास प्रयत्न करून काढून आणावे, म्हणजे कोट रुपये व पांच लक्षाची जाहागीर देऊ. याप्रमाणे करार करून त्या ग्रहस्तास रवाना केला आहे. तो ग्रहस्त स्वदेशाचाच आहे. त्यास काही आशा दाखऊन स्वारीत पाठविती. सारांष त्या गोऱ्याचा बंदोबस्त नीट राखिला असता मोठा उपयोग आहे. त्या दोन्ही गोऱ्यांपासोन सगळ्ये मसलतीचा खर्चवेच उगवेल व त्याणी मुलूख घेतला तोहि सुटेल. गोरे मोठे आहेत. बंदोबस्त मात्र नीट असला म्हणजे ठीक.

१ अलपिष्ठणाचे नावाने झाडून गोरे येथील हाका मारितात की, मसलत बिघडून टाकलीन. चोहोकडे येकच दंगल माजून गेली. यामुळे मोठे हवालदील आहेत. पैक्याचा आटोप आंतून ज्याचे ते आपआपलाले करावयास लागले. त्यासहि समजले की, ही मसलत अटपत नाहीं. असे समजून अधीरपणा न दाखविता आहेत.

१ गोऱ्याचा मतलब की तहाचे बोलण्याचा डौल घालून, कसेहि करून सरकारास हस्तगत करावे. नंतर सर्वत्राचा बंदोबस्त करावा. या मतलबात आहेत.

१ अंजणवेल गोवलकोट घेऊन हपसियास देणार. हपसियाचे लोक कुमकेस दोनशे आहेत. बाणकोटवाल्या व हपसी याची कुमक असे मिळून दोनी ठाणी घेणार.

¶*Vithal Vinayak mentions the attempts made by the English for the release of the two Englishmen Hunter and Morrison who were in confinement at Vasantgad promising high rewards and asks for special and strict measures to be taken regarding their custody. The writer also refers to the differences between Elphinstone and some other English gentlemen.*

7128

No. 158] [December 1817

श्री

विज्ञापना. फिरंगी याचे लस्करांत रोज गुाप्रो तयारी असून कवायत होत आहे. पहिले लस्कर आहे तेथेच आहे. नवे आले तें त्याचे पूर्वेस नदी आली-कडे नदीचे काठापासून खंडोबाचे देवलापलीकडे गोळीचे मारगावरून देवला-चेहि पुढें दोन गोळ्यांचे मारगाचे टप्यापावेतों उतरले आहेत. त्याचेहि पुढें पूर्वेस दोन चार गोळ्यांचे टप्यावर तीन राहुट्या देऊन, तेथे दोन तीन कंपिण्या व दोन तोफा आहेत. अजमास वाटतो. असी चौकी आहे. त्याचे उतरेस आणखी येक राहुटी दोन गोळीचे मारणीवर आहे. त्याचेहि उतरेस आणखी येक राहुटी आहे. खडकीचे पुलावरून येकाड दुकाड माणूस वाग आहे. थोड थोड धुके आहे. अधीक उणे दिसत नाहीच; परंतु धुके निवारण जाले म्हणजे लिहीन. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶This letter gives the exact position of the forces of the English probably at Kirkee.

---

No. 159] [December 1817

श्रीपुरवणी[१] ३

१ स्वारींतील बातमी घटकेघटकेचीदेखील त्यांस कलते असे बातमीदार स्वारीत आहेत. यादीत मार लिहिला आहे हा मार बाहेर फोडूं नये. वाचून पाहून बंदोबस्त राखणे तसा राखावा. बातमी फुटली असता जो बातम्या सांगतो त्याचा उमट तव्हाच पडणार. बातमीदार यास दोन रुपयाची आशा दाखविली आहे. यामुले बातमी निघन्ये. आजपर्यंत बातमीसमधे पाचशे रुा लागले.

१ बारीक मोठी बातमी समजेल ती कोणत्ये ठिकाणीहून पाठवावी, याचे टिपण लिहून यावे, म्हणजे त्या टिपणास मार लिहून पां. टिपण किल्याचे आश्रयाचे असावे. याचे कारण तर कोणाचा भरवसा येत नाही. भलत्याजवल कागद देता येत नाही. विश्वासाचे टिपण असेल ते लिहून पाठवावे. त्या टिपणास चिठी असावी म्हणजे तेथे चिठी दाख-ऊन मार लिहून देत जाऊ.

१ येथे शहरचे रखवालीस रामोसी होते. तेच रामोसी रखवालीस गोरे याणी ठेविले. त्याजवर कारकून रा वासुदेवपंत बर्वे आहेत. बर्वे

१. पत्र विठ्ठल विनायक याचें.

याचेच मारफतीचे बेरड आहेत. बेरडाचे संधान यथास्थित आहे. शहरचा अंमल येका रात्रींत सुरू करावयास येईल. बर्वे यास दोन रुपयाची आशा दाखऊन आशेस गुंतून ठेविले आहेत. त्याचे स्वाधीन बेरडाचे संधान चांगले आहे. येका रात्रींस हजार पाचशे देखील येके ठिकाणी जमावे, असे संधान आहे. याप्रो मार आहे. बर्वे याचे हातचे पत्र पाहिजे असलीयास पाठऊन देतो.

¶*Vithal Vinayak wonders how secret news is carried to the English and requests special measures be taken to check the evil.*

---

*No. 160*] [*1817*

श्री

आखबारी पत्रांतील मजकूर सन समान आशर मयातैन तागायत
मुक्काम मल्हारराव होलकर.

१ श्रीपतपनराव मैराळ दिवाण याणी आपले हाताखालीं कारभारात घेतले होते ते कारभारांत नसावे म्हणोन विठोबा जोग याणी कोव्यानजीक छावणीतून पत्र पाठविले, त्याजवरून त्यास वस्त्रे देऊन लष्करांतून निघोन जाणेविसीं निरोप दिल्हा.

१ भिमाबाई होलकर याची कन्या पांच हजार फौजेनसी खर्गोण प्रांती जाऊन, कमावीसदार याजपासून सातहजार रुपये घेतले, म्हणोन त्याजकडे ताकीदपत्र लेहून रवाना केले.

१ बापूजी सिंदे निसबत दौलतराव सिंदे हे फौजसुद्धां जावऱ्या बडाखाव्यापलीकडे आले.

१ गोरखे याचा मुलुक इंग्रजानीं काहीं घेतला, तो गोरखे याणी लढाई करून माघारा घेतला म्हणोन वदंता आहे.

१ दिल्लीहून पत्रे आली त्याचे जाब लेहून रवाना जाहाले.

---

५

मौजे मारडी कर्यात मलवडी येथील पाटील याचे पत्र अपाजीपंत सेवडे यास आले, त्यांत मजकूर कलमे

१ इंग्रजाकडील चटेकरी एक व जामूद एक गावगन्ना चिठ्या घेऊन फिरतात भेट वगैरे सिधे खर्च पांच साहा रुपयेपर्यंत दरगावीं घेऊन गांवकर यास पुसतात कीं गांवची लावणी व पडीक किती व गांवांत घरें किती व माणसे किती व गुरें व मेंढरे किती हे लेहून देणे म्हणोन उपद्रव आहे.

१ म्हसवडावर शंभर चटेकरी व गोरे आले आहेत. ते मलवडीस जाणार.
१ तोफखान्याचे बैल शेतात देखील सोडून चारितात.

—

३

मुक्काम पंढरपूर

१ जनरल म्हणोन सरदार सर्व फौजेस हुकूम करणार तुंगभद्राचे आलीकडे आला. समागमे एक रेजमिट पांचशें लोकांचे चार खाशे व चार पलटणे व चार तुरुब याप्रमाणे आहेत.

१ गोपालपुरावरील पलटणे वगैरे आहेत. त्याणी राख आपण अहा तिकडील धरावा असा निश्चय ठरला होता, परंतु तुंगभद्रेवरील जनरल याचे पत्र आले जे, आम्ही येऊन पोहचे तोपर्यंत कूच होऊं नये.

१ एक गोरा व एक कुंपीण रवाना जाली. यास हुकूम आहे जे दरगांवास मुक्काम करून घरें व माणसे व गुरें व मेंढरे वगैरे याची दर्याफ्ती करावी म्हणोन.

१ पन्नास स्वार रसद आणावयास पाठविले. हल्ली पांच कुंपणी व दोनसें स्वार रवाना केले, ते तुळजापुरास दाखल जाहाले.

१ जोगाईचे आंबे इकडे कांहीं पेंढार आले म्हणोन वर्तमान आहे.

१ या मुक्कामाहून मंगळवेढेपावेतो दोऱ्या टाकून रस्त्याची मोजदाद करीत आहेत.

१ तुंगा उतरोन कांहीं खटले व बाहीर टोकऱ्यानें उतरत होते ते गंगार्पण जाले म्हणोन वर्तमान.

—

७

¶This is a summary of news-letters received from several quarters. They give an account of the activities of the English, the Gurkhas, the Pindaris and Holkar.*

---

*No. 161*] [*1817*

**श्री**

विज्ञापना विशेष. राजश्री आमृतराव बलाल यांजला बोलाऊन नेऊन आज्ञा जाहाली, त्याप्रमाणे मारनिलेनी इकडे सविस्तर मार लिहिला. ऐसियासी कैलासवासी श्रीमंत दादासाहेब यांची सेवा कैलासवासी थोरले मल्हारजीबावा सुभेदार यानी एकनिष्ठपणे करून, आज्ञेप्रमाणे वर्तणूक केली. उभयेपक्षीं शरिरें मात्र भिन्न होती, परंतु प्राण येक. आशातऱ्हेने सरकारकामाविसी जपत आले. तसें इकडूनहि स्वामीसी कायावाचामनेकरून आंत:कर्णपूर्वक ते शरीर व हे शरीर

बाहीर = Camp-followers.

मात्र भिन्न. वरकड आवघे येक आहे. यांत प्रतर्णी आसे तर श्रीमार्तंडजीची शफत असे. ज्यात सरकार कामाचा उपयोग मर्जीचा संतोष तेच निदर्शनास लौकर येईल, ही खात्री पकेपणे आसावी. वरकड विनंती मारनिले करतील, त्याजवरून ध्यानास येईल. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*This is an undertaking of full loyalty and devotion to the cause of the Peshwa by the Holkar.*

---

*No. 162*] [*1817?*

नकल

**श्री**

गुरुवारी तिफनावर[+] डाकतर जाफरीस[1] यांनी मार कारभारी यांचे बोलण्याचा काढला होता. त्यांत आलफईस्टीन व ब्रीके[2] हे उभयताचे चित पुरऊन ऐकत होते. दुसरे (पांटंज)र[3] वगैरे इसमे साहा पलटणचे पाहुण्यासुधां आले होते. ते निराळे जेवणाचे खुसीत होते. हे त्रिवर्ग सदरी लिा त्यांणी जेवण खोळंबून हाच मार केला. त्यांत डाकतर यांचे बोलण्यात भाव असा पडला कीं पेशजी-पासून या दौलतीत मुसदी वागणार, मोगलाईकडील व श्रीमंताकडील बौहो[4] मोगलाची दौलत या सरकारचे कबांत आली असतां नवाब यांची मर्यादाच केली, व संतोषाने उभयपक्षी दौलतीचा सिलसिला चालविला. बदनाम जाले नाहीं. तुम्ही कंपिणीची दौलत खुपकी व तरी मिळोन, मोगल व श्रीमंताचे बेदौलतीपेक्षां मुलकाने कायम असोन, ज्या दौलतीचे दोस्तीमुळें दरोबस्त हिंदुस्थानचे पातशहा-तीस कंपिनीचा नकशा जाला, त्यासीच वाकडा डाग दाखऊन, दौलत खराब करावी असी पावले दाखविता, हे तुमचे कामगारीचे लौकिकास * * * समंध बसली येथून गेले, त्या काळीं सिंदे भोसले यांस जेर केले असतां श्रीमंतास थकऊन कंपणीचे मतलबाचा दस्तऐवज घेतला नाहीं तो आज तुम्ही करून घ्यावा असा इरादा करितां या जलदीची चाल बदनामीस कारण दिसते. श्रीमंताचे सरकारची दौलत यांस हिसेदार फार. बखेडा वाढविल्यानें तुम्हास मेहनत व कंपणीचे सरकारास नुकसान याचा विचारच करावा हे लाजम असे. ऐसे ऐकून घेऊन बसले. उतर केले कीं तुम्हास या खोटे बाजाराची माहीत नाहीं, पुढें होईल. येणेप्रमाणें कलम.

¶*Confidential report made to Bajirao II of a conversation which Dr. Jeffreys had at dinner with Elphinstone, Briggs, Pottinger and six others who had been invited for the dinner. The point was the protest communicated by Bajirao through his agent to Elphinstone.*

---

+ Tiffin. 1 Jeffreys. 2 Briggs. 3 Pottinger. ४ वारंवार. 5 Wellesley.

No. 163] [1817 ?

श्री

सेवेसी विनंती बाबूखान व सेख अबदुलवाहाब वसईकर व मंगळखान साष्टी-कर हे तिघे गोलंदाज तुम्हाकडे पाठविले आहेत; तर बुरजावरील तोफ उतरून याजकडून निशाण मारऊन तपसीलवार लेहून पाठवणे म्हणून पत्री आज्ञा केली. आज्ञेप्रमाणे बुरजावरून तोफ उतरून नदीपलीकडे नेऊन भांबवड्याच्या डोंगरास निशाण लाऊन गोलंदाजाकडून दोन दोन गोळे मारविले. त्यास येणेप्रमाणे गोळे लागले.

बाबूखान वसईकर

१ पहिला गोळा निशाण्याच्या उजवे बाजूस हातावर लागला.

१ दुसरा गोळा निशाणाच्या डोईवरून पलीकडे गेला.

---

२

अबदुलवाहाब वसईकर

१ पहिला गोळा निशाणापासून हातावर खालता लागला.

१ दुसरा गोळा वितीच्या अंतरे लागला.

---

२

मंगळखान साष्टीकर

१ पहिला गोळा निशाणाच्या उरावर लागला.

१ दुसरा गोळा निशाणाच्या माथा लागला.

---

२

येणे प्रामाणे तिघा जणांनी सा वार तोफांचे केले, ते आम्ही पाहिले. सेवेसी विदित व्हावें याकरितां तपसिलें लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶Three Arab Gunners are tested in their skill of firing guns from the Bhamburda Hill at Poona and their comparative merits are reported in this paper.*

---

No. 164] [1817 ?

श्री

विज्ञापना. आताच बातमी आली की, मौजे पणदरी इंग्रजाचा गाव किलापासोन दोन कोसावर आहे. तेथे त्याजकडील लोक दोनसे, व तोफा तीन आसे आले

आहे म्हणोन आली. त्याजवरून आताच बातमीस आणखी पाठविला आहे. पकी बातमी आलियावर आपल्याकडे लिहोन पाठवितो. बहुत काय लिा लोभ करावा हे विज्ञापना.

¶*The writer communicates that the English army with three cannons had arrived at Panadari.*

---

No. 165] [1817 ?

श्री

पुा राजश्री बालाजीपंत दादा

२

[पहिला बंद गहाळ.]

—नगडपर्यंत दाब बसला. पो नगर हवेली येथील नाईक पाटील काही दाब काही समाधान अशा रीतीनें हस्तगत होत आहेत. पांच सातसे कोलवण तयार करून, बराबर च्यारसे माणूस सिबंदीचे देऊन नगर हवेलीचे ठाणे दादर डोंगरे-नजीक अर्जुनगड कोस ४ येथे बसवावे. तेथून खलवडपवाडी इंग्रजाकडील मारून धूम करावी, हा विचार योजनेत आणिला, आणि करूनच दाखवीन. परंतु सरकारची कृपापत्रें व सरंजाम बेगमी हा अर्थ काहीच दिसत नाही. तव्हा काय करावे? कठिण गत, इंग्रजाची ठाणी सनिध. मी गरीब बेसरंजाम असे असोन सरकार कामास जिवात्पर्य+ कर्म करावयासी सादर जालो असतां, दारू गोली देखील मजला न पोहचावी? कांहीं साहित्य उपराला कोण्हीच न करावा? तव्हा शर्त जाली. दादा, काय लेहू, आसो. श्रीमंताची चाकरी येकनिष्ठ करावी हा माझा निश्चय. सर्वेश्वर साक्ष आहे. तरी श्रीमंताचेच पाय मजला तारक होतील. आपण मात्र घडी घडी कृपापत्री सांभाळीत असावे. होईल तेथवर साहित्य करावे. नगरकर अथवा दुसरे कोणी दोनसे माणूस व दोनसे रुपयाची दारूगोली हर कोठून खरिदी करून आणवावी. तीन उपोशणे करीन; परंतु दारूगोली वेगल निःकारण मरण प्राप्त होईल. वरकड श्रीमंतास आपण लिहिलेच असेल. आणि फिरोन ल्याहावे. जिकडून साहित्य येवज देवितील तेथे सनद व हुजरे जातील, तरच कांहीं होईल. येरवी होणार नाही. जोवर माझ्याने होईल तेथवर करीतच आहे. श्रीमंताचे पुण्य समर्थ आहे. तरी अर्जुनगड तालुका उधलोन देतो. मग जे होता होईल ते पाहातच आहे. बहुत काय लिहिणे; लोभ करावा हे विनंती. दारू गोली व लोक आपण कृपा करून काही

+ जिवास अपायकारक.

तरी पाठवावे हे विनंती. इंग्रजाकडील आधिकोनर आदलेल ते ल्याहावे. दोहो चोहो रोजी लोक व काली खलाड पत्राडीवर रवाना करिता. लस्करची व इंग्रजाकडील बातमी लिहिली पाहिजे हे विनंती.

¶*This is a mutilated letter in which the writer requests Balajipant to send ammunition and men to enable him to force the English to withdraw from Arjungad taluka.*

---

*No. 166*] [*1817*

**श्री**

अर्जी संतू टमगिर बिन लक्षमण टमगिर उमर ४० वा थोरदले पा जुनर एसिजे. मी प्रथम कंपनी सरकारची चाकरी शके १७२८ चे साली सन १८०६ पुण्यात संगमावर जासूद डाकेचे होते त्यात नाईक नेमाजी खिलारी होता त्याणे वैरागच्या टप्यावर चाकरीस लाविले.

[येथून पुढे ६ ओळी गाळल्या आहेत.]

१ येक वर्ष हरकोरयात फोड साहेबाचे हुजूर.

१ पुढे मोर दीक्षित वकिली करीत होते, त्यासमई त्याजकडे निरोप अलफष्टेन सोचे तर्फेचा व फोड सो सांगून पाठवीत तो निरोप मी व विठू पाटोला याप्रो दोघे च्यार वर्षे नेत आणीत होतो.

१ पुढे बाजीराव याचा विघाड व्हावयाचे अगोधर मलकमसाहेब बहादुर हैदराबादेहून पुण्यास आले. त्या समई बाजीराव माहुलीस आले. त्याचे भेटीस मलकं साहेब पुण्याहून म्याणास कात्रजेस घाटाखाली सोडून नंतर वळूपासून घोड्यावर डाकेन आले; ते घोड्याचे डाकवरून मलकं सो व फोड सो व मोर दीक्षित याप्रो माहुलीस आले. त्याचे पहिले रोजी आम्हा उभयतास माहुलीस फोड सोनी रवाना केले. पुढे माघारे जावे, ते समई मी मलकं सोचे कपडे करावयाचे कामास मला ठेविले.

फोड सोनी आपल्या जवळ दिले. द्वादसीचे दिवसी मी कपडे मलकं सोस केले. लागलेच माघारे जावे असे होते; परंतु ते दिवसी येकादसीमुळे बाजीराव याचे बोलणे जाले नाही. सा ते दिवसी बापू गोखले मलकं सोकडे आले. त्यांची भेटी जाली. नंतर द्वादसीस बाजीराव याची भेट होऊन मेजवानीस खाण्यासच बाजीराव यांचे येथे राहिले. खाण्याचे वेलेस समाधानीचे बोलणे मलकं सो व बाजीराव यांचे जाले. त्या वेलेस कारभारी जवल होते. मोर दीक्षित, चिमणाजी नारायण, रामचंद्रपंत करंदीकर व बाळोबा बाबा हे वगैरे आणखी होते. त्या वेलेस मी व विठू

माहेबाजवळ खाण्याचे समई हजर होतो. मलकं सा हे बाजीराव याची समजूत करीत होते. पुढे श्रावणमासची दक्षणा पुढे आली, त्याकरितां पुण्यासच जावे आगर चिमाजी आपास पाठवावे असे बोलत होते. बाजीराव यांचे चितास आल्यासारखे जाले नाही; तेव्हा जाबसालात मलकं सांनी बाजीराव यांस जवाब केला कीं माहाराजानी फार दूरवर पाहून कंपनी सरकारसी दोस्ती ठवावी. आणखी उतर केले की ज्याचे हाती काठी, त्याची म्हैस असे उतर केले. भोजनोतर जेवण करून डेऱ्यास मलकं सा आले. तेथून बापू गोखले यांचे येथे मेजवानीस गेले. तेथून विंचूरकराचे येथें मेजवानीस गेले.

(यापुढील मजकूर इतिहासोपयोगी नाहीं सबब गाळला.)

*Santu Temagire a servant in the Company's Government states that he was present when Malcolm interviewed Bajirao at Mahuli, in order to adjust the latter's differences with the English.*

---

*No. 167]* *[1818?*

श्री

अर्जी बापूजी भिकाजी भाग्य. बाजीराव साहेब सातान्यास गुदस्ता होते, त्या समई भाद्रपद मासी बेटाचे बंगलियात श्रीनिवासराव हिंमत गोपालराव रास्ते याचे विद्यमाने अर्ज केला. तेव्हा साहेबानी आम्हास अभय दिल्हे की तुमचे पोटात काय मार बोलावयाचा आला आहे तो बोलावा. त्यावरून आम्ही बोलिलो की पेशजी गंगाधरशास्त्री बावा यास बुरा बखत आला आहे, सावध राहावे; तेव्हा त्याणी सांगितले की ही गोष्ट व्हावयाची नाहीं. जाहाली असता दोन लक्ष रुपये बक्षीस देऊ. त्याची खातरी बापू मैराळ याची दिल्ही असता, शास्त्री बेफाम राहून मयत जाहाला. बापू मैराळ एवज बक्षिसीचा न देता, साहेबाजवळ खराब होऊन मेला. पुढे साहेब लोकावर बुरा बखत आला आहे, त्याजवरून साहेबानी श्रीनिवासराव यास हुकूम केला कीं याची खातरी दोन लक्ष रुपयाची करावी, व याची कामेकाजे उलगडून देणेविसी करावी, याप्रमाणे त्या वेळेस केली. नंतर प्रहरभर अवघा मजकूर जाहीर केला; त्याचा आलाहिदा परवाना बारा बंद लिहून ठेविला आहे. इनसाफचे रुईने साहबानी हुकुम केला की बाजीराव साहेब याची व कंपीण बहादुर याची बडी दोस्त बहुत दिवस आहे. त्यांजकडून व्हावयाचे नाही. आमचे दृष्टीस पडत नाही. परंतु तुमचे बोलणे खातरजमेचे आमचे नजरेस कधी पडावे? त्यावरून आम्ही सांगितले की आश्विन कार्तीक मासी नजरेस

पडेल. तव्हा साहेबानी बुकावर आमचे नाव ठिकाण मुदत लिहून ठेविला. दररोज श्रीनिवासराव दोन वेला खबर घेऊन जाता, आश्विन वा ११ सांईकाली फौजेचा घेरा पडला, त्या वेलेस श्रीनिवासराव येऊन बोलिले की कैसे करून बडे साहेब वाचून शत्रु पराभव व्हावा; तव्हा आम्ही श्रीगणपतीस व श्री माहलक्ष्मीस नवस केला की बडेसाहेब यास येश येऊन राज्याचे कामकाज व्हावे. साहेब लोक जिवानिसी खुशाल राहावे. ब्राह्मण तपश्वी जागोजागा अनुष्टानास बसले आहेत. ब्राह्मण भोज्यन पाच लक्ष व्हावयाचे आहे. येणेप्रमाणे बहुत प्रयत्न केला आहे. साहेब कृपावंत होऊन आज्ञा व्हावी व बक्षिसाबदल दरम्यान श्रीनिवासराव यांची हमी आम्हाकडे साहेबांनी दिल्ही आहे, त्याप्रमाणे आमची कामेकाजे उलगडून द्यावी व दोन लक्ष रुपये कराराप्रमाणे द्यावे.

¶*Bapuji Bhikaji Bhatye claims from the English a sum of Rs. two lakhs as a reward for the religious invocations which he performed in order that the English might win the war against the Peshwa.*

---

*No. 168*] [*December 1817*

श्री

२

राजश्री आबा स्वामीचे शेवेसी

तुमचे कडील डाकवर पत्र आद्याप आले नाही. राजश्री नारोपंत नाना आपटे येथे परवाचे रोजी रविवारी अस्तमानी दोन हजार फौजेनिसी आले. त्याचा मुकाम आहे. श्रीमंत माहाराज छत्रपतिस्वामीस वासोट्याहून येथे घेऊन येऊन पंढरीपूरचे रोके स्वारीत घेऊन जाणार असी बोलतात. काल दोन च्यारसे स्वार वासोट्यास राजश्रीस आणावयास गेले. दारूचा मजकूर आलाहिदा लिहिला आहे त्याजवरून समजेल (नंतर १७ ओळी मुमारे मजकूर दारू संबंधीचा तो गाळला.) हे विनंति.

¶*Aba is informed of the arrival of Naropant Apte at Satara proceeding to Wasota for securing the Raja's person.*

---

*No. 169*] [*1817 or 1818?*

बंदगी आ की. बडेसाहेब पुणे आपनासी येकलेच भेटनार होते व आताहि येकलेच भेटनार आहेत. माहाराजानी बोलवावे. राजेखानाबरोबर आपन निरोप पाठविला त्याजवरून हा रुका खिजमतीस लि॥ आहे हे बंदगी जान जफरीस.

(Signed) J. Jeffreys.

¶***This is a communication from J. Jeffreys referring to an interview with Elphinstone.***

No. 170] [December 1817

## श्रीरामलिंग प्रा

### राजश्री गणपतरावजी स्वामीस

विनंती एसीजे. येथून सिपाई कोरेगावाकडील समाचारास पो होता तो कुमठ्यास जाऊन आज आला. त्याची व कोणाची गाठ पडली नाही. जलचर देवरावर आला तव्हाच तुमची बायकामुले निघोन गेली म्हणोन कुमठेकर याणी सांगितले. कोरेगावात घरे जाळली म्हणोन बातमी आली. त्याचा शोध आणिवला. आपला वाडा कायम आहे. बरग्याचा वाडा मात्र जाळला असे रड्याने सांगितले. सत्यमिथ्या ईश्वर जाणे. राजश्री भाऊची काळजी बहुत लागली आहे. कुटुंब घेऊन कोठे गेले कळत नाही. वरचीवर रडी पाठवीत आहे. आपण काळजी करू नये. रा केशवराव येथे आहेत. येथेहि आज उद्या जलचर येणार आहेत. येथे सर्व हयालदील आम्ही कोठे जात नाही. कळावे श्री काय करील ते खरे. शुा ७ प्रहररात्र आवर्सी हे विज्ञापना.

¶ *A news-writer reports to Ganapatrao that the English are encamped at Deur and are contemplating an attack on Koregaon where some houses have been burnt by the enemy.*

---

No. 171] [1-1-1818

## श्रीरामलिंग

सेवेसी आंताजी जिवाजी कृतानेक सा नमस्कार विनंती विज्ञापना ता छ २३ सफरपावेतो यथास्थित असे विशेष. केडमगवार येथे सिपाई वसुलास पो होता. त्यास दे(श)पांडे याणी सिपाई यास सांगितले की, तुम्ही तूर्त तगादा केल्यास एवज मिळत नाही. आठ च्यार रोज रहा, नंतर सोय होईल; नाही तरी सोय होत नाही. याजवर तू निकड केलीस तरी आम्ही एवज देत नाही. आणि किल्यास लेहून मनाईहि आणीत नाही. आठ रोजात सिकस्त करून एवज देऊं, याप्रो त्याचे म्हणे पडले. ते सिपाई सांगत आला. त्यास काय ती आज्ञा तेथून होईल तसे करिता येईल. गावकरी यास बेमुलाना तगादा केला तरी खटला सांगतात. युक्तीने घेतला अस्ता देत आहेत. यास जसे नेट असेल तसा वसूल येईल. इकडील वर्तमान तरी पुण्यास गंगाधर शास्त्री याचे चिरंजीवाकडील फौज दोन तीन हजार आली; व मोगलाईतील दाहा हजार असपास अणिली आहे. तीहि पुण्यास येणार असे वर्तमान आहे. दोन्ही फौजा तामृमुख

यार्णाच आणविल्या आहेत. नागपूरची तामृमुख याणी पुण्याचीच व्यवस्था केली होती; परंतु त्याणी पुन्हा ठाणे घातले. येक दोन पलटणे कापून काढिली, असे वर्तमान आहे. आपले तेथील वर्तमानहि आल्प लेहून येत असावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Antaji Jiwaji writes that the English have brought an army of about thirteen thousand men to Poona.*

---

*No. 172*] [*1-1-1818*

**श्रीराम**

**राजश्री गणपतराव स्वामीचे सेवेसी**

विनंती विशेष. तुम्ही लस्करची पत्र कुलमी कोरगावकर याजवरोबर पाा ती पावली. लिा मजकूर समजला. गोखले याचे चिरंजीव पडले. बायकोने सहगमन केले. इंग्रज याणे कूच करून नगराकडून गंगातिरास जात आहे. गोखले व विंचूरकर व पुरंधरे रास्ते हे बाफगावी होते. तेहि इंग्रज यांचे पाठीमागे नगराकडे गेले. स्वारी नाशकास गेली. ब्राह्मणवाड्याचे वाटेचे मुाची पत्रे आली म्हणोन ढमढेरे व पेंडसे व माणकेश्वर वगैरे मंडलीस जाऊन सांगावे. तुम्ही चौकीपाहरा वगैरे बंदोबस्त सांगून आल्याप्राा रात्रंदिवस राखून इकडे मजकूर ल्याहावा. आलस तीलभर न करून, वामन व नारोराम सांगून, हुशारी चांगली ठेवावी. गाफीलपणा असो नये. रा मिा वा ९ गुरुवार दीड प्रहर दिवस प्रात:काल हे विनंती.

सुभानजी नाईक याचे पनास लोक, व खंडेराज मुरारराव व दाहा आा वाईपीा किल्यावर जावयाचे ते येकूण हजरी घेऊन, बंदोबस्त गस्तीच्या करीत जावया. हे विनंती.

¶*This depotch states that the son of Bapu Gokhale died in a battle and his wife committed "Sati". The English, continues the writer, marched towards Nagar.*

---

*No. 173*] [*1-1-1818*

**श्री**

छ २३ माहे सफर सन समान अशर मयातेन मिति मार्गशीर्ष वद्य ९ शके १७३९ ते दिवसी इंग्रजी सरकार यांचे फौजे पैकी मेजर स्टांटनसाहेब यांचे फौजेपैकी सिपाई आसामी मुाार ६०० घोडनदीहून पुण्यास येता मार्गी भीमातीरी कोरेगाव येथे बाजीराव साहेब यांचे दरोबस्त लश्कर त्याजवर चालून आले. तेव्हा सारा दिवस लढाई होऊन शेवटी सायंकाळी तेवढे लश्करास गावातून बाहेर काढून देऊन शिकस्त केले; म्हाणौन या फतेचे स्मरण राहावयाकरिता, व त्या लढाईत इंग्रजी सरकारचे सिपाई पडले त्यांचा पराक्रम व मर्दुमी पृथ्वीवर महशूर

होण्याकरितां, सरकारातून मौजेमजकुरी ज्ययस्तंभ उभा करून त्याजवर इंग्रज लोकांची नावें इंग्रजी लिपीत व हिंदू मुसलमान यांची नांवें इंदवी लिपीत याप्रो खोदविली असेत

५ निा तोफखाना.

१ जमाल तांडेल दुईम.
२ गोविंद लसकर.
३ शेख अमद लसकर.
४ रामस्वामी लसकर.
५ दिसान लसकर.

४९ इलाखा मुंबई सिपाई याचे रजमंट पहिले पलटण दुसरें त्यापैकीं.

१ बापू शिंदा जमादार.
२ गणोजी गोरे जमादार.
३ कनीशिंग हवालदार.
४ ईटमेतर बालमेटर नाईक.
५ सोननाक कमळनाक नाईक.
६ रामनाक येशनाक नाईक.
७ प्रसादसिंग सिपाई.
८ लक्ष्मण बंदासा शिपाई.
९ बाबू सावंत शिपाई.
१० गोंदनाक मठेनाक सिपाई.
११ रामनाक येसनाक सिपाई.
१२ लक्ष्मण कुकडा सिपाई.
१३ भागनाक हरनाक सिपाई.
१४ राघोजी मांद्रे सिपाई.
१५ भागोजी वयार सिपाई.
१६ अंबनाक काननाक सिपाई.
१७ खंडोजी सिपाई.
१८ गोपाळजी कांडे सिपाई.
१९ गणनाक बाळनाक सिपाई.
२० भगवानजी इटेकर सिपाई.
२१ सिदू बकसशिंग सिपाई.
२२ सजणाजी पवार सिपाई.

7140

२३ चांगोजी जाधव सिपाई.
२४ बाळनाक धोंडनाक सिपाई.
२५ रूपनाक लखनाक सिपाई.
२६ राणोजी जाधव सिपाई.
२७ बापनाक रामनाक सिपाई.
२८ बाळोजी शिरवान सिपाई.
२९ वीटनाक धाननाक सिपाई.
३० राजनाक गणनाक सिपाई.
३१ अबदुल करसान सिपाई.
३२ सर्दाशिंग सिपाई.
३३ बापनाक हबनाक सिपाई.
३४ अर्जुनजी चव्हाण सिपाई.
३५ रेनाक जाननाक सिपाई.
३६ सजनाक येसनाक सिपाई.
३७ गणनाक धरमनाक सिपाई.
३८ कोठेखान सिपाई.
३९ देवनाक अंनाक सिपाई.
४० गोपाळनाक बाळनाक सिपाई.
४१ हणमंत मानसिंग सिपाई.
४२ हरनाक हीरनाक सिपाई.
४३ मनसाराम सिपाई.
४४ अनोजी धारशे शिपाई.
४५ जेठनाक दौनाक सिपाई.
४६ इब्रम इरेकर सिपाई.
४७ निधानसिंग सिपाई.
४८ गणनाक लखनाक सिपाई.
४९ सुतरसिंग शिपाई.

४९

५४

¶*This is a list of names of persons who suffered death in the battle of Koregaon and whose names were inscribed on the triumphal column raised there in memory of their heroic deaths. The list gives an idea of the composition of caste in British regiments. Most of the soldiers appear to be Mahars by caste.*

No. 174] [1-1-1818

श्री

१ स्वारी श्रीमंत माहाराजाची राजेवाडी जेजुरी नजीक आहे तेथे आली. चाकणचे ठाणे राजश्री त्र्यंबकजी डेंगले याणी घातले. ताम्रमुख याजकडील आत लोक होते ते कापून काढिले. स्वारी ब्राम्हणवाड्याचे घाटातून निघोन फुलगाव आपटीचा मुा आहे. नंतर गुरुवारी कूच होऊन फुलगाव पुढे तीन कोश कोरेगाव आहे तेथे फौजा गेल्या, तों तेथें इंग्रजाकडील दीड पलटण व तोफा आल्या. नंतर त्याणी तोफ डागली, तेव्हा सरकार फौजेने चालून घेतले ते गावात सिरले. फौजाहि बेलासिक गावात सिरून दीड पलटण व तीनसे तुरुप स्वार कापून काढिले. त्यात जो खासा होता त्याचे डोसके मारिले. आसे वर्तमान राजश्री तात्या मजमदार याचा गडी आला आहे. कलावें. कलम १

¶*This paper describes the action of Koregaon, in which Bajirao's forces cut down three hundred troops belonging to the British. Trimbakji Dengle is reported to have captured Chakan.*

---

No. 175] [4-1-1818

श्रीभवानी प्रा

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

आबा स्वामीचे शेवेसी

पो बहिरो नारायण सां ना विा विा. होलकर याजकडील फौज नसिरा-बाजेवर दाहा हजार आली आहे. सिंदे याजकडील पेंढारहि येऊन पोचले. नगराचे सुमार सरदार मागे पुढे होते. याची लढाई होऊन इंग्रजाची पलटणे दोन कापून काढली. याजकडीलहि नाश जाहला. इंग्रज नगरच्या किल्यात सिरला. हेहि नजीक उतरले आहेत. सरकारची स्वारी ब्राम्हणवाडियाच्या घाटापलीकडे गेली होती ती घाटावर आलीकडे आली. त्रिंबकजी डेंगळे दाहा हजार फौजेनिसी व काही पेंढार असे चाकणचे किल्याचे ठाणे बसऊन फुलगावावर आले. नारो विष्णु आपटे पांच हजार फौजेनिसी जेजोरीवर आले. याप्रो डलाच्या (?) कडियातील वर्तमान ऐकिले ते लिा आसे. दोन च्यार रोजात पुणे दराव(स्त) पलून जात आहे. निघोन जाण्याविसी सरकारची ताकीद जाली आहे. पुण्यातील इंग्रज रास्ते याचे वाडियानजिक उतरला आहे. येकी जागा तोफा सुधा जमून आहे असे बोलतात. काल लाखोटा पाा तो पावला असेल. उतर सत्वर पाा. येथून पाचसाहा लाखोटे पाा ते पावले किंवा नाहीत व आपलेहि पाच-साहा रोजात पत्र आले नाही, त्यास बोरगावास जाण्याचा मार ल्याहावा. रा मागसीर्ष वा १२ दोन प्रहर लोभ करावा हे विनंति.

7142

सेवेसी सदासिव गोविंद कृा सा ना विज्ञापना. बातमीचा मार रा आबानी वर लिा प्रो रा विनाइकपंत आणानी सांगितला. श्रीमंतार्ची ग्वासा स्वारी घाटावर वोतूरचे मुाचे पत्र आले. फिरंगियार्ची लढाई जाहाली, दोन पलटणे कापून काढली. होलकर याची फौज नसिराबाजेवर आली आसे वर्तमान मी वाड्यात गेलो तेव्हा आणार्नी सांगितले. गा नारो विष्णु जेजुरांवर आले. आताच वर्तमान येकिले की श्रीमंताची स्वारी पुलावर आली. दोन जासूद आले त्यार्णी सांगितले. हेहि वर्तमान ग्वचित समजले ते मागाहून लिा. सेवेसी पा श्रुत होय हे विज्ञापना.

¶Bahiro Narayan reports to Aba the movements of Bajirao and of Trimbakji Dengle.

---

No. 176] [4-1-1818

## श्रीरामलिंगप्रा

सेवेसी अंताजी जिवाजी सां नमस्कार विज्ञापना. ता छ २६ सफर गेज रविवारपावेतो मुा वाई येथे यथास्थित असे विशेष. आपण दशमीचे पत्र पा ते अताच पावले. इकडील मार विना

१ स्वारी श्रीमंत माहाराजार्ची राजवाडी जेजुरीनजीक आहे तेथे आली. चाकणचे ठाणे राजश्री त्र्यंबकजी डेंगले याणी घातले. ताम्रमुख याज-कडील आत लोक होते ते कापून काढिले. स्वारी ब्राम्हणवाड्याचे घाटातून निघोन फुलगाव आपटीचा मुा आहे. नतर गुरुवारी कूच होऊन फुल-गावापुढे तीन कोश कोरगाव आहे तेथे फौजा गेल्या, तो तेथे इंग्रजाकडील दीड पलटण व तोफा आल्या. नंतर त्याणी तोफ डागली. तेव्हां सरकारफौजेनी चालून घेतले. ते गावात सिरले. फौजाहि बेलासीक गावात सिरून दीड पलटण व तीनशे तुरूप स्वार कापून काढिले. त्यात जो ग्वासा होता त्याचे डोसके मारिले. ऐसे वर्तमान राजश्री तात्या मजमदार याचा गडी अला आहे. सेवेसी कलावे.

१ राजश्री माहादाजीपंत भाऊ याणी रुा दिल्हे तेथे माहाल पो रुो त्यास द्यावे म्हणोन आज्ञा. त्यास आपले उतर येविसीचे आले नाही. भटजी याणी चिठी माघारी घेऊन गेले. भटजी सोयकर नव्हते. रागीट. त्याजपुढे उपाय नाही. चिठी घेऊन गेले. कलम १

१ वसुलाविसीचा मजकूर लिहिला त्यास जोर खोऱ्यात सिपाई गेले आहेत. लोडम (?) खोरे येथेहि गेले आहेत. युक्तीनेच येईल तो वसूल घेतो. अद्यापि वसूल आला नाही. कलम १

१ दहीगावकर येथे आले आहेत. त्याणी पावणे दोनशे रुो आणिले आहेत. त्याचे म्हणणे पडले ते कालचे पत्री लिा आहे. त्यास तगादा आहेच. आपलेकडे गावकरी पाठऊन देतो. कळावे कलम १

१ सोलसीकर याणी पहिला सिपाई घटाई करून माघारी पाा (अपूर्ण).

¶*Antaji Jiwaji reports the hotly contested battle of Koregaon, and adds that the revenue is being collected.*

---

*No. 177]* *[4-1-1818*

## श्रीरामलिंग प्रा

सेवेसी अंताजी जिवाजी साां नमस्कार विज्ञापना. ताा छ २६ सफर राज सोमवारपावेतो उतम असे विशेष. इकडील मजकूर विताा

१ सरकारचा मुाा मौजे वाल्हे येथे. परवाचे दिवसी येक कोरेगावावर लढाई जाली. त्याचा मजकूर कालचे पत्री लिहिलाच आहे. स्वारीचा मुाा सालप्याचा घाट उतर आळीकडेस येणार असे वर्तमान खास आहे. ब्राह्मणवाड्याच्या घाटापासून माघारी स्वारी येण्यास कारण निकडून च्यार पलटणे आली. त्याची बातमी पकी आली. नंतर कूच होऊन फुल-गावच्या मुकामास स्वारी आली. तो पुण्याहून दीड पलटण जात होते. त्याची याची गाठ कोरेगावचे व फुलगावचे मधी पडली. नंतर त्याणी कोरेगावचा आश्रा केला, आणि तोफ डागली. नंतर गोखले, रास्ते वगैरे पायउतारा होऊन पारपत्य केले. त्याजपो येक तोफ व दोनशे लोक कोरेगावचे वाड्यात सिरले ते मात्र राहिले. येक तोफ व येक पलटण कापून काढिले. कलम

१ स्वारी फुलगावचे मुाा आली, आणि पटवर्धन, विंचूरकर व पुरंधरे, नारो विष्णु असे पुण्यास राा केले. इकडील लढाई गोखले, निपाणी(कर), रास्ते याणी दिल्ही. हे वर्तमान वास्तवीस पत्रच आले. कलम

१ पुण्यास ठाणे घातले म्हणोन बाजारी वर्तमान आले आहे. इंग्रज रास्त्याच्या वाड्यांत आहेत. आज पके वर्तमान येईल ते लिा पाठवितो. कलम १

१ मौजे दहीगाव येथील गावकरी येथे आले होते त्यांणी नूर्त रुा ७५ दिल्हे आणि बाकीची तोड करावयास सक्रांत करून येतो म्हणौन गावास गेले. त्याचे गावाकडे बहुत दंगा लस्करचा जाला म्हणून गेले. सोलसीकर यांणीहि अमावास्या करून येतो म्हणौन आज पत्री लिा आहे. त्याचे तेथे सिपाई बसविले आहेत. कलावे. नळयेकर यांणी मात्र रोखा टाकिला, आणि स्वारीमुळे गावहि जरार केला आहे. कलम

४

येणे चार कलमे लिा आहे. मनन व्हावे हे विज्ञापना.

*Antaji Jiwaji in his despatch gives an account of the flight of Bajirao and the battle of Koregaon fought between the English and the Peshwa.*

---

*No. 178*] [*5-1-1818*

**श्रीभवानप्रा**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री

आबा स्वामीचे शेवेसी

पो बहिरो नारायेण पिंगले सां नमा विा येथील कुशल ता मार्गसीर्ष बा १३ दोन प्रहर पो येथास्थित असे विशेष. रात्री स्वारीचा मुा देउरावर आला होता. आताच पाडळीपर्यंत बीन आली. तेथे मुा होईल अगर माहुलीस लस्कर तेथे राहून सडे येतील असे दिसते. पुलावर इंग्रजाची पलटणे तीन आली. त्याचे पुढे गोखले याकडील रामचंद्र व्यंकटेस आहेत. मागे विंचूरकर जेजोरीचे मुा काल होते. याजप्रो खास वर्तमान आहे. लढाई होऊन येक पलटण सिकस्त जाहाले असे वर्तमान खचित बोलतात. नंतर स्वारी इकडे आली. रा केशवराव आणा वाघ अताच स्वारीत गेले. उदईक रा बाबाकडे भेटीस जातो. रा आन्याबा तेथे आले असल्यास वर्तमान कळयावे. कलावे बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति.

*Bahiro Narayan Pingle writes to Aba Purandare communicating Bajirao's movements after the battle of Koregaon.*

---

*No. 179*] [*6-1-1818*

**श्रीरामलिंगप्रो**

सेवेसी अंताजी जिवाजी कृतानेक सा नमा विा ता बा १० मंगळवारपावेतो मुा वाई येथे यथास्थित असे विशेष. इकडील मजकूर तरी स्वारी श्रीमंताची

वा। १४ चतुर्दसीस माहुवलीस आली. बरोबर दाहाहजार फौज आहे. बाकीच्या फौजा जेजुरीवर आहेत. राजश्री त्रिंबकजी तात्या डेंगले त्रिपुटीवर आहेत या प्रा। खास मार वर्तमान आहे. इंग्रज आहेत तेथेच आहेत. पुढे लढाई जेजुरीचे सुमारे व्हावी असी बोलवा आहे. [ जोरखोर इ. खासगी मजकुराच्या सुमारे २४ ओळी या पुढे आहेत. सबब नकल केल्या नाहीत. ]

¶*Antaji Jiwaji reports Bajirao's arrival at Mahuli and his preparations for an engagement with the English.*

---

*No. 180*] [*6-1-1818*

## श्रीरामलिंग प्रा

सेवेसी अंताजी जिवाजी सां नमस्कार विज्ञापना. ता। मार्गशीर्ष वा। ३० मंगळवार तीन प्रहर दिवस पो उतम असे विशेष. इकडील मजकूर तरी स्वारी माहुलीस आहे. फौजा जेजुरीवर आहेत. इंग्रजहि दिव्याच्या घाटा अलीकडे आला आहे, असे बाजारी वर्तमान आहे. वो। राजश्री रामचंद्रशास्त्री त्यास काल आले. त्यास जाऊन वर्तमान विचारिले, व राजश्री भाऊ कोठे आहेत हेहि विचारिले. त्याणी सांगितले श्रीमंताबरोबरच आहेत. सुखरूप आहेत. सेवेसी कळावे, श्रुत व्हावे हे विज्ञापना.

¶*Antaji Jiwaji communicates that Peshwa Bajirao is at Mahuli while his forces are at Jejuri. The English detachments have crossed the pass of Diwa, says the writer.*

---

*No. 181*] [*14-1-1818*

## श्रीभवानीप्रा

### राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री
### आबा स्वामीचे सेवेसी

पो बहिरो नारायेण सां नमा विा येथील कुशल पौष शुा ८ बुधवारपावेतो येथास्थित मुा वागर येथे सुखरूप असो विशेष. शुा २ पत्रे व पावती बीस बदरियोची[1] पा ती येथे काल असतमानी पावली. त्याची उतरे व हिकडील मजकूर :–

१ माहुली मुापर्येत स्वारी आल्याचे वर्तमानाचे पत्रे पा ती पावली असतील. नंतर प्रतिपदेस प्रहर रात्री गडबड होऊन पाली स्वारी गेली. द्वितीयेस वाठारावर मुा गेली. त्रितीयेस वांगीवर गेली. चतोर्थीस तुरटीढवलीवर गेली.

१ दारूच्या थैल्यांची.

पंचमीस मिरजेवर कौलापुरावर गेली. माहुलीपासून सां मी वाठारास आलों. काही सरंजाम राजश्री बाबांनी आणिवला तो धरने करून घेऊन तुरटी ढवली पावेतो बरोबर होता. तेथून पुढे मुा गेला त्या दिवसी निरोप घेऊन पंचमीस बोरगावास रात्री राहून शंष्टीस कराडास सफरे याजकडे येऊन काल अस्तमानी येथे आलो. मागे रा। तात्यासो विंचूरकर व गोखले होते ते फिरंगियाचे मागोमाग कराडचे मार्गाने मिरजेस गेले. बोरगावचे सुमारे फौजेची गाठ पडली होती. फिरंगी पंढरीवरील तीन पलटणे व पाचशे तुरुप स्वारीमागे धावतो. मिरजेचे सुमारे गेला. बारा कोशाचा यास त्यास अंतर आहे. दोन चार रोजांत लढाई होईल असे दिसतं. सरकारची फौज पनास हजार पावेतो आहे. पिके वगैरे दरोबस्त लुटीत गेले. फिरंगीही गावची तसनस फार करतात. उपाळवे येथे फिरंगियाचा मुा होता. गावचा नाश फार जाहला. गणपतरावजीचा गांव मार+

१ राजश्री भाऊ आम्ही तीन मुा येक जागाच होतो. त्यांनी लाखोटा दिल्हा तो पा। आहे, व राजश्री अन्याचा लाखोटा पा। त्यास पावता करवा. दाहा हजार रुा पारगावकर याजकडील परत द्यावे असे ठरले होते. त्यास ते दाहा हजार रुा तुम्हाकडेसच राहावे. पांच हजार रुा आन्याकडे देविले ते देऊ नयेत असे ठरोन बाबानी आलाहिदा आन्यास पत्र लिा आहे ते या लाखोटियात आहे. कलम

[ पुढील ८ ओळींच्या कलमांत खाजगी देवघेवीचा मजकूर आहे सबब तें गाळलें. ]

१ पुण्याकडील फिरंगी दोन पलटणानिसी पुलाच्या सुमारें आला. मिरजेकडेस पलटणे गेली त्यांत मिलावयास जात आहे असे म्हणतात. तुमचे लाखोटे दोन लस्करचे रो केले. मी उद्या निर्वान सातान्यास येऊन आपलेकडे येतो. नंतर भेटीअंती मजकूर समजेल [ यानंतर १९ ओळी मजकूर खाजगी क्षुल्लक महत्त्वाचा. ] १ दारू मिळल ती घ्यावी. सरंजाम करून जागयाचे संरक्षण करावे असे आपनास निरोप सांगावा असे बाबानी स्वमुखे सांगितले आहे. का।

१ फौजेत खर्चाची अडचण फार पडली. स्वार रात्रीचे पळून जातात. हवालदील आहेत. फिरंगी सेर आहे. ईस्वर इछेने घडेल ते खरे. भाऊ व हरबारावजी खुशाल आहेत. आमचे कापडचे जमिनीविर्सी भाऊनी पत्र दिल्हे ते या लाखोटियात आहे. कार्य करणे तुम्हाकडे आहे. कलम

सदरहू लिावरून कलेल. कलावे बहुत काये लिा लोभ करावा हे विनंति.

¶*News of Bajirao's movements in the Southern Maratha Country sent by Bahiro Narayan Pingle, who was in charge of ammunition. The addressee Aba may be Purandare.*

\+ समागमे.

No. 182] [19-1-1818

श्रीभवानीप्रो

राजश्रिया विराजित राजमान्ये राजश्री

आबा स्वामींचे शेवेसी

पो बहिरो नारायेण सां नमस्कार विनंती. येथील कुशल तां पोश शुा १२ पावेतो येथास्थित मुा सातारा येथे असो विशेष. सितू तोडकर याजसां राजश्री आन्याबांस राजश्री बावांचा लाखोटा व आपल्यांस राजश्री भाऊचा लाखोटा व मी आपली पत्रे देऊन पाा आहे तो पावोन उत्तर आली नाहीत. मी काल आस्तमानी येथे आलो. सोरा व गंधक येथून रा सदासिव बापू याणी केला तो पोंचला असेल. स्वारी निपाणीचे सुमारे आहे. मागाहून आलंपिष्टन दोन पलटणानिसी खानदेशातोन मिरजेचे सुमारे जाऊन पुढील पलटणात मिळाला. त्यास यास सात कोशाचा अंतर आहे. पुण्याकडून येक पलटण वाई सातारा सुमारे येत आहे असी बाजारआवाई बोलतात. निपाणीचे सुमारे लढाई जाहाली असी बाजारआवाई बोलतात. त्यास समजले म्हणजे लेहून पाठऊ. राजश्री आन्यास भेटून यावे म्हणोन बाबाची आज्ञा. त्याजवरोन वाईस आहेत म्हणोन कळले; त्यास भेटून आल्हि भेटीस दोन महिने जाले, आपली भेट घेऊन, श्रीचे दर्शन घेऊन माघारे फिरलेवर बापूस येथे ठेविले आहेत. सफर याजकडे हजार रुा चिठी अज पाा आहे. भाऊनी बाबाकडे हजार रुा पाठवावे असी लस्करातोन चिठी दिल्ही ती पटली नव्हती. तोहि आज सफर याजकडे पाा आहे. दियमामुळे एवज द्यावयास मनुष्यांस संपये येतो. सफरचा सूड करून ठेविला होता. उदईक डाकेवर रा करितो. डोरलोस कारकून सफर यांणी पाा आहे. वसूल होऊन एवज आला नाही व बाळकोबा नात्या आथणीस आहेत त्याकडे च्यार हजार रुा चिठी पाा आहे, तिचा जाब परतवला नाही म्हणोन सफर सांगत होते. कल्याव, लोभ करावा, हे विनंती.

¶*Bahiro Narayan Pingle reports that Bajirao is in the vicinity of Nipani and that Elphinstone, with two battalions, is following him, having marched through Khandesh towards Miraj.*

---

No. 183] [23-1-1818

श्रीभवानीप्रा

राजश्रियाविराजित राजमान्ये राजश्री

गणपतरावजी स्वामींचे शेवेसी

पो बहिरो नारायण व सदासिव गोविंद साा नाा विनंति विशेष. आपण डाकेवर लाखोटे सुमार साहा पाा. त्यास स्वारी आज दोन प्रहर रात्रीस निघोन

गेली. बरोबर राजश्री जानोबा भाऊ व आबा मुधा निघोन स्वारीबरोबर गेले. तुम्हाकडील लाखोटे स्वारीचा मुकाम असेल तेथे सिपाई याजबरोबर पा। आहेत. आबा काल बुधवारी प्रहर दिवस पूर्वी येथे आले. जावसाल काही उलगडले नाहीत याजमुले अजचे मु॥. गेले. लस्कर पुण्याचे रोके गेले असेन. अदरकीचा घाट उतरून जाणार. इंग्रजाचे पलटणाचा मु॥ इंग्रजाचा मु॥ काल सिरव्यावर होता. गोखले पिंपरीवर होते. विंचूरकर वगैरे श्रीकृष्णा उतरून पश्चमभागी आगापुरावर मु॥ याजप्रो॥ काल अस्तमान प्रहर रात्रीचे वर्तमान. आज कोण कोणाचे कोठे मु॥ जातील न कले. माझे शरीरी(री) ज्वरांश होऊन कालपासून निजोन आहे. याजमुले येथे राहिलो कलावे. रा। पौष बा। १ गुरुवार प्रहर दिवस लोभ करावा [ पुढील पांच ओळी केवळ ग्वासगी मजकुराच्या दागिन्यासंबधीं. ]

¶*Bahiro Narayan writes to Ganapatrao reporting the movements of Bajirao*•

---

*No. 184*] [*25-1-1818*

तारीख २५ जानवारी

सन १८१८ हरेव!

## हुसांच (?)

### अजम क्रम आलपिष्ट साहेब व करनेल साहेब इंग्रज भाहादर दाम मोवत हूं

ऽ अजि दिल येकलास चतुरसिंगराजे भोसलेसाहेब मुभा सलाम बाजत सलाम उं की दिगर ग्वेर खुशी कलमे करीत जावी विशेष. राजश्री बाजीराव पेशवे यांणी आमच्या राज्याचा बंदोबस्त करून आम्हास केदेत ठेऊन कारभारात करीत आहेत. हाली फौज पाठऊन नाना प्रकारचे उपद्रव आम्हास करीत आहेत व माहाराज छत्रपति यासहि आपले बरोबर फिरवीत आहेत. या प्रकारे आमची आवस्ता आहे म्हणोन पेसजी तुम्हास पत्रें पाठविली होती. त्यास दोन महिने जाहाले. आद्याप उतर व कागदी आले नाही. याजकरितां हाली पत्र पाठविले आहे. तरी या समई आम्हास कुमकेस दोन पलटणें पाठऊन द्यावी म्हणजे इकडून बंदोबस्त करीत येतो. भेटीनंतर बोलणे होऊन तुमचे आमचे विचारे जे करणे तें करावयासी येईल. परंतु लिहिल्याप्रमाणें पत्र पावताच दोन पलटणें पाठवावी येविसी गोविंदराव गाईकवाड पाठविले आहेत. मुखजबानी सविस्तर बोलतील तें समजोन घेऊन पलटणमुधा रवानगी करावी. चितात कोणयेक अंदेशा आणूं नये. रा। छ २९ रोवल जादा काये लिहिणे

¶*Chatursing Raji Bhonsle mentions his grievance against Bajirao and applies for redress to Elphinstone and requests him to depute two companies for his help.*

No. 185] [11-2-1818

श्री

विनंती विशेष. पत्र पा। ते पावले लि। मजकूर कळला. झाडे रा। गणपतराव याजवळ दिल्हे आहेत. आलीकडील झाडा पाठवितो. आघल्या पा। नाही-जोरखोरे व बारामुरं याचा मार लि। तो कळला. यास बाकी किती राहती ती पाहून लिहितो. डाकेची पत्रे पाठवीत आहे. सातारियात गावात इंग्रज सिरला आसी आवाई वाटेत यैकिली. भोसल्याकडील काही फौज येऊन लस्करात मिळाली. लस्कर मागोरे ताथवड्याकडे गोखले, विंचूरकर आले. खासी स्वारी आकलुजेवर आहे. आलीकडे आली आसेल. पत्र गुनाड मु॥ पावले. येथे भोजन करून पुढे गेलो. रा। बुधवार छ ५ गाखर दोन प्रहर कृपा कीजे हे विनंती.

¶*The writer reports that the English have marched upon Satara and the Peshwa Bajirao is at Akaluj.*

---

No. 186] [11-2-1818

श्रीरामलिंगप्रा

सेवेसी आताजी जिवाजी साष्टांग नमस्कार विनंती ता। माघ शु॥ ६ बुधवार-पावेतो उतम असे विशेष. इकडील वर्तमान सातान्यास जलचराचा मु॥ आला. किल्यावरून गोळी टाकिली नाही. स्वारी नातेपोते, टेबुणी नजीक आहे. भोसले सिकस्त जाले. त्याची बायकापोरे पाच हजार फौजेसुधा स्वारीत येऊन मिळाली आसे वर्तमान आहे. वहुशा सर्व व्यामि त्याची जाली. आता कोणती गोष्ट होणे हे ईश्वरी इछा. उगीच दुराशा मात्र. आज सलाबत त्यांची आहे. सेवेसी श्रुत व्हावे हे विनंती.

पेशजी मादुलाविसी लि। आहे व नागली रु॥ २५ पंचविसाच्या आम्ही दोन्ही कामे कृपा करून हे वेलेस केलीच पाहिजेत. रु॥ सिध्य आहेत. रुाविसी काळजी न व्हावी; परंतु आपण खरिदी घेतलयाप्रा। त्याजपो। द्यावी. याचे उतर आगत्य यावे. आबासो। वहुत सावधपणा असावा. दिवस अती परीक्षेचे आले. आपण तरी गल्यात धोंड बाधून घेतला आहे. श्रीने सव(र)क्षण करावा. हे विज्ञापना.

¶*Antaji Jiwaji communicates that the Chhatrapati with his family and an army of 5,000 men surrendered to the English.*

7150

No. 187] [12-2-1818

श्री

विज्ञापना येथील कुशल ता। माघ शु। ७ गुरुवार प्रहर दिवस प्रात:कालपावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. फिरंगी याचा मु। कोरेगावाहून मंगळवारी प्रहर दिवसास सातारियास दाखल जाहाला. नंतर त्याच वेळेस नाकेबंदी शहरची करून. लोकास अभय देऊन, किल्यावर चिठी लि। कीं कुपीणबहादर याचा हुकूम किला खाली करून देणे. त्याचे उतर आले की, श्रीमतांची परवानगी पाहिजे. त्याजवर साहेब राग भरून लस्करात जाऊन च्यार तोफा आणू (न) आमचे घराजवळ लाविल्या आणी कुलपी गोळे वीसपर्यंत सोडले. इतक्यात किल्यावरी कारकून बोलणार आला. रुमाल फिरऊन तोफ बंद केली. वरला बंदुखीसुधा बारदेखील जाहाला नाहीं. बोलणे होऊन वर निरोप सांगून खाली निरोप मागावयास यांव इतक्यात दोन तीनसे पलटणचे लोक दरवाज्यास गेले. प्रहर रात्री वरील लोक खाली उतरून आले. कासीपंत याची बायका व आईमात्र खाली उतरू दिल्ही. चीजवस्त सकाळी उतरून देऊ असा करार केल्यानंतर सकाळी बंदी केली. वरले माणूस वर, खाले खाली, असे केले. काल दोन प्रहरी निशाण आपले बंड लाविले; आणि लस्करच्या तोफा वीस केल्या आणि ते निशाण उतरून भगवे निशाण लाविले. याप्रो। इकडील मार आहे. हे वर्तमान परवाच लि। तरी सिपाई नवता. आताच सिपाई भगाजी डाकेवरून आला नव्हा लि।. आपलेकडील सिपाई शाणा पा। पा।. कोकणा सिपाई पा। नये. नाही तरी आमची येथे काही राहणार नाही. जिनस दोन बेला बैल दोनी पा। ते येऊन पोहचले असतील. येन जिनस पा। नये असे लि। आले. त्याचे पूर्वीच रवाना केला. कळावे जिनसाची पावती देखील पा। तरी नाव वाटू नये. जमाखर्च आसल्यास चिंता नाही. आजचा रोख वाईस जाणयाचा बोलतात. या बेलपावेतो मु। आहे. वरला गोळा वाजला नाही म्हणोन शहरचा बचाव जाला. कळावे. आद्याप कोणतेहि गोष्टीचा इतबार नाही. सरकार फौजाची बातमी काही कळत नाही. हे विज्ञापना.

*¶This despatch describes how the English took possession of the fort of Satara without any resistance being offered by the garrison.*

7151

No. 188] [18-2-1818

पौ छ १३ रबिलाखर
सन समान अशर माघ मास
शके ३९ ईश्वर

**श्रीरामलिंग प्रा**

**राजश्रिया विराजित राजमान्य**
**राजश्री गणपतरावजी स्वामीचे सेवेसी**

पो अंताजी जिवाजी साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल ता। माघ शु॥ १३ बुधवार दोन घटका दिवस अस्तमानपूर्वपावेतो आपले कृपेकरून, यथास्थित असे विशेष. अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी सर्व मजकूर लेहून येत असावा. इकडील मजकूर तरी राजश्री भाऊ व सर्वत्र मंडळी झाडून येथे राहावयास येणार, असे आज राजश्री केशवरावजी बोलत होते कळावे. वडील आले म्हणजे लेहून पाठवीन. स्वारी श्रीमंताची सुरापुराकडेस गेली, आसी आवई आज बोलतात. नाल्यापाल्यावर इतक्यात होती, पुढे गेली. इंग्रजहि सातान्याहून गेले. ते स्वारीचे दुमदारीवरच गेले. रावजी, काळ अती विपरीत आला. सर्वत्र निर्वीर्य जाले. त्यासच सदी आली. आसो ईश्वर कृपा करील तेव्हा खरं. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ करावा हे विनंती.

¶ *Antaji Jiwaji communicates to Ganpat Raoji that Peshwa Bajirao is proceeding towards Surapur and that the English are engaged in circumventing his movements. The writer bewails the evil times.*

---

No. 189] [20-2-1818

**श्री**

बारनिसी श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी मु॥ समान अशर मयातेन व अलफ शके १७३९,

१ बाजीराव याचे लस्करांत स्वारी असतां अष्टी वालकीचे मुकामी छ १४ रबिलाकर माघ शु॥ शुक्रवारीं प्रात:कालचे साहा घटिका दिवसास जर्णेल * * * बहादुर फौजसुद्धां * * * * * म्हणून व आनंदराव बाबर एसीं चांगलीच माणसें पडलीं. इकडे गोर गुंतले, काले रुप डावे व उजवे येसें * * * वेले न मिलोन दाग आभ्र येतें व संगीना उन्हानी चकाकू लागल्या येसें दिसों लागलें, तेव्हां आपाजी माणकर बाजीरायाचे स्यान्याजवल येऊन रागें भरला कीं हा समये स्यानांत

बसावयाचा नव्हे, तेव्हां उतरोन घोड्यावर बसिले आणि माहाराज छत्रपति व भाऊसाहेब महाराज व आपासाहेब महाराज यासही घोड्यावर बसविलें, आणि भरधांव घोडा हाकला तो लगट फारच जाला. या त्रिवर्गास पुढें घालून बाजीराव पाठीमागें चालले तो श्रीमंत मातुश्री माईसाहेबमाहाराज मेणयांत होतीं, तो मेना मागें राहिला. यामुळें त्रिवर्ग माहाराजांनीं गलबला करून हात घोड्यास घातले तो मेना येऊन पोंहचला, व यमा बानकर याजबरोबर बाजीराव यांनी आपला घोडा बसावयास पाठविला. याजवर बसून जलद चालावें सांगितलें, तेव्हां उत्तर केलें कीं आगोधर घोडी मागितली तेव्हां आम्हांविसी दुस्काळ पडला होता, आतां या घोड्याचा हासभास नाहीं. मी बसत नाहीं. आपल्याच घोड्यावर बसून येतों. शामराव व बालाराव रास्ते मागें चालूं लागले. जलद चाला ऐसें वेगा करूं लागले, तेव्हां माहाराजांनीं पुसिलें हे कोण आहेत. तेव्हां राघोपंत जोसी यांनी सांगितलें रास्ते आहेत. इतके दिवस मागें चालण्यास कोण्ही नहुतें आतां कोठून आले, ऐसी बोलिले, त्याजवरून ते तोंड चुकाऊन पुढें गेले. माईसाहेब यास माहाराज त्रिवर्ग पुढें गेले ते दिसेनात. त्याजवरून रागे भरली कीं तिघाची भेट लौकर करा. ते बाजीरायांनीं येकून मखू खैरा यास पाठविलें, आणि त्याजबरोबर निरोप पाठविले कीं या समई मजवर मर्जी प्रसन असावी. दोन कोश सांभाळून गेल्यावर मी विनंत्या करून सर्व स्वारीचे पुढें ठेवितों. तो त्रिवर्ग महाराज यांची गाठ पडली. तो गर्दीचा समय, घोड्यावर स्वारी करविली, व आपली बायकोस बाजीराव यांनीं छिटाचा अंगरखा व पायजमा घालविला व रुमाल बांधविलाच होता तिजला व दमडेरी वगैरे दोन तीन बायेका यांस घोड्यावर बसविलें आणि पलांव हेच चालले. तो ज्या बाजूनीं जवळ दिसते तो मार्ग सोडून डावे उजवे पळता वाव नाहीं. नागरट वाटेस लागले त्यांत येक तोफेचा गोळा येऊन जवळ पडिला, त्याणी फारच गलबल जाली. पिस्तोल गोल्या येऊं लागल्या; परंतु येकाचेंहि तरवारीचें मेण निघालें नाहीं. या धुमाळी व घोड्याचे दलवटींमुळें घोडीं धाऊं लागलीं तेव्हां हिसका व घोडींची ज्या * * झाले आणि इंग्रजाकडील स्वार फारच सनिध येऊन पोहोंचले; तेव्हां श्रीमंत भाऊसाहेब महाराज याणी श्रीमंत मातुश्री माईसाहेब यांस पाठीसी घेऊन शालनाम्याचे हातीं रुमालानी पाठीसी बांधिली. तेव्हां निली घोडी * * तुरुपानी नेली. घोड्यावरून उतरून बसण्यास संधीस आवकाश पडला ते समई हजार स्वार बाजीराया-कडील होते, ते जलद चलावें बोलले. चालतां हे दिसतें की नाही, उत्तर केले. तो फारच येऊन गोश वाढलें. इतके संधीत बाजीराव लांबले

व जवळ स्वारसुधां कोण्ही नाहीं, पळाले. तो गोळीचे टप्यावर समीप आले. पायाचे स्वार यास जवळ गोळ्या लागून माणसें मरूं लागलीं. राघोपंत जोसी व दाजी काळेसकर उधळला. राघोपंत जोसी पुढें पळावयास लागला, तों त्याचे पुढे गोळीनीं येक मुडदा पडला. तो पहातांच पुन्हां यजमान माहाराज स्वामीयाजवळ मागें फिरोन येऊन बोलले जे, जवळ कोणी उरलें नाहीं. इंग्रज सभोंवतें मिळाले. आतां पळूं नये. येथें मरूं नये. घोड्यास हात घालावे. ते समई सरकारपैकीं बळवंतराव व येशवंतराव चिटनीस उभयतां बंधू व भीवराव पोतनीस व केशरकर जवळ चालले होते. या-समई जवळ आसावें येसी आज्ञा. पैकीं केशरकर त्या गलबलीत उधळले, चुकले; व पोतनीस यास बाजीरायाकडे जाऊन सांगावें कीं आम्ही सांपडलों, पळूं नका, माघारी फिरोन आम्हांस काढून न्यावें, ऐसें सांगोन पाठविलें. त्याणीं जाऊन सांगितलें. कपाळास बोट लाविलें, परंतु माघारे न फिरले, व फौजही न पाठविली. पोतनीस निकडेच राहिले. माहाराजावर सात आठसें तुरुप नागव्या तरवारा व पिस्तोल सहीत * * जवळ आले, मोठा समय कठिण, तेव्हां तिघा खासीयानीं नागव्या तरवारा व येक स्वार निसबत निंबाळकर वाईकर व उभयता चिटनीस याणीं * * केल्या तों येऊन मिळाले. तेव्हां येका तुरुपास बळवंतराव चिटनीस यास घोड्यावरून उतरून पुढें धावून हाक मारावी म्हणोन सांगितलें. त्याजवरून चिटणीस घोडीवरून उतरोन पुकारा केला कीं छत्रपति माहाराज सातारच्याचे आहे. गोळी घालूं नका. इतकियांत * * आसामी मेजर दपटीण पांचेच तुरावांपैकीं सेख वडेबावा जमादार व सेख मकबुल येसे पुढें आले त्यास सांगितलें त्याणीं तरवारा आंगाभोंवती फिरविली, आणि धरा मात्र दिल्हा. मारणें हाणणें बंद केलें. तों खासा मेजर दपटीण येऊन पोंहोंचलें. त्याणीं राजे सातारकर सचे म्हणून वचन घेतलें, आणि बंदोबस्त केला. येसी ईश्वर खैर माहाराजाचे पुण्यप्रतापें जाली. समय परम दुर्घट; परंतु पार पडली. तरवार हातच्या घेतल्या ते समई मेजर दपटीण यास दुपटा भारी आंगावर घातला. दोघां तुरुकांस आंगठ्या व शाल नामी रुमाल दिल्हे ते समई जवळ असाम्या ठरल्या होत्या बितपासील :—

३ हाती आंबारीचे व चौघड्याचे व खुजे

१ बाळासाहेब भोसले चेतरसिंगाचे पुत्र

१ आबाजी

१ पांडोबा वैद्य सिशा बाजीरायाची

३

7154

२ चिटनीवीस आसाम्या
  १ नरहर मल्हारराव
  १ यशवंत मल्हारराव

  २

१ राघोपंत जोसी निसबत बाजीराव

१९ हुजरे वगैरे.

| | |
|---|---|
| १ गोदाजी | १ जोतीज गनाप |
| १ खंडू सिंदे | १ जोती ढवरे |
| १ कोंडी भोसले | १ माहादू सूर्यवंसी |
| १ बापू जाधव | १ धोंडी घोरपडा |
| १ विठू जाधव | १ मुगरजी रेणुसे |
| १ सिनु वाळके | १ धोंडी वानवडीकर भोसले |
| १ बारगीर निसबत वाटीरकर | १ द्वारकू बायको |
| १ संकू | १ राघू |
| १ बहिरू | १ इं |
| | १ आन्या |
| ९ | १० |

१९

२५

या प्रमाणे पंचवीस असामी व चयार ग्वासे इतके राहिले. ऐसी गुजरून गेलियावर बिलिमारसाहेब जर्णल याचा कारभारी घेऊन पावला. तो भेटला. पाहून जाऊन जर्नेल स्मिथ यास कळविलें. सर्वास घेऊन जर्नेल मागें होते त्याकडे मेजर दपटीण चालले. हाती आंबारी व हौदा व चौवडे बगीवरील व दोन हती खुजे मिळून बारा व उंटावरील नौबती दोन थैसे आम्हां घोड्यावर बसविले ते हाती वगैरे आपले म्हणून आपलेजवळ घेऊन स्वारी चालली. आंबारींत माईसाहेब यास बसावें म्हणून मेजर दपटीण यानी विनंती करून बैसविली. खवासी-

यांत भाऊसाहेब महाराज बसले. माहाराज छत्रपतीचा हात धरून मेजर दपटोण चालला. भाऊसाहेब महाराज घोड्यावर येसे चालले. तों जर्नेल जखमी मेण्यांत होता, तो पुढें आला; मेन्यांतून उतरून टोपी काढून सलाम केला भेटला. नंतर आष्टीवालकीवरच त्याचे तलावर मुकाम जाला. तेथे स्वारी उतरली. बाजीराव वगैरे सर्वांचें खटले लुटले गेले, फार नाश जाला. कांहीं रुपयांचा विषय इंग्रजांस सांपडला. फरासखाना कांही वगैरे लुटींपैकीं सत्रा उंट माहाराजांकडे दिल्हे ते डेरे उभे केले. विलिमोरसाहेब व त्याचे निसबत बाबाजीपंत व खंडोपंत व बाजीपंत हे उभयतां निसबत मोंगली पठाण हे जवळ समाचारास येऊन, साकरपाणी आणिले. सर्वांनी निरोप घेतले, तो बापू गोखले याचा मुर्दा डोलीत घालून आणिला. तो वोळखण्यास कोण्ही पाठवावें म्हणोन जर्नेल याणी निरोप पाठविला. त्याजवरून नरहरराव चिटनवीस यास पाठविलें, नंतर वोलखले. फक्त आंगरखा मलमलीचा आंगात उरला होता. घोड्यानी तुडविलें त्याणी पायांचें कातडें गेलें, व दोन जखमा होत्या, व आंताजीपंत हुजरनीस निसबत गोखले जखमी ऐशा दोन डोल्या माहाराजांपासीं डेन्या-जवळ * * * * * * * भन वगैरे कलविलें वेळ जाला च्यार घटिका रात्रीस लस्करचे आबाजीपंत याणी अन्न दिल्ही. रावोपंत व पांडोबा निसबत बाजीराव हे जाईनात. अन्न देववणे प्राप्त म्हणोन देवविलीं. च्यार घटिका दिवस आस्तमानचा राहता जर्नेल स्मिथ-साहेब व विलिमोरसाहेब ऐसे डेरियास आले. खुसी वगैरे वोलनें जालें. नंतर काये मर्जी बोलले त्यास इकडून उत्तर केलीं                                   कलमें

१ तुमची अल्पिष्टना आगोधर भेटी जाली. सर्वत्र लाहान थोर पळाले. आमची घोडी लाहान होती येसे नाहीं; परंतु पूर्व संकेत समजोन तुम्हांस पाहतांच हात घालून उभे राहिलों. त्यास अल्पिष्टनाची भेट लौकर व्हावी.

¶*This is a summary of news-letters from the battlefield which describe how Bajirao, in order to escape from the hands of the English, ran away, leaving the Chhatrapati to his own fate in the midst of difficulties. This is an important journal of the battle of Ashti. The paper is printed alrecdy in Bhave's* मराठी दप्तर रुमाल *No. 2.*

No. 190] [22-2-1818

पौ छ २४ फेब्रवारी मुा
छ १८ राखर

**श्रीशंकर**

**अजम आलपिष्टण साहेब सर-**
**लस्कर गोसावी यासी**

ऽ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री आमृत-राव देवाजी मुा किले वितंडगड राम राम विनंती. येथील कुशल ताा छ १६ राखर जाणून साहेबाचे मेहरबानेकरून खैरखुसी असे विशेष. किले सुधागडाखालीं सरंजाम घेऊन आजम जारनल प्रात्रसाहेब किला सर करावयास आले. तव्हा तेथील किलेदार व आम्ही येका धण्याचे, याजकरिता आम्हास कुमकेविसी पत्र आले. त्याचे उतर पाठविले की लोक पाा देतो, परंतु आम्हाकडून लोक तीन रोज किला लढत होता परंतु पाठविले नाही. मी साहेबाचे दोस्तीतील आहे. माझा जेष्ट भाऊ तीर्थरूप राजश्री विठलराव दिवाणजी काठेवाडास आहेत, त्यांची व आजम वाकरसाहेब व आजम करनेक रिसडीट बडोद्यातील व आजम बलीटणसाहेब आसिष्टंण व आजम मेकमरुद साहेब कच भुजेस आहेत त्याची मेहरबानी मजवर आहे व आजम मेकमरुदसाहेब कुंपिणी सरकारचे व गाय(क)वाड सरकारचा सरंजाम घेऊन भूजप्रांत सर करावयास गेले तेव्हा फौजासुधा माझे बंधु व मी साहेबाचे तैनातेस होतो. मजवर सर्व साहेब मेहरबानी करीत आले. पेशजी आजम वाकरसाहेब काठेवाड प्रांती आले होते तेव्हा मजवर फार मेहरबानी करीत होते आणि मी साहेबास वडील म्हणत होतो. तीर्थस्वरूप वेदशास्त्रसंपन्न कैलासवासी शास्त्रीबावा दाजीसाहेब याचे आम्ही चिरंजिवातील. याप्रमाणे माझा वेव्हार आहे. येथे राहावयास कारण श्रीमंत राजश्री पंतसचिव याचे पदरचे वडील च्यार डोयाचे चाकर, तेव्हा कोणी येथे आसावे. परंतु आम्ही कोणी राहात नव्हतो. शास्त्रीबावा याणी परलोकसाधन केला तव्हा गुजराथेतील पूर्ववतप्रमाणे चालेना, तेव्हा स्वदेसी आजम रिसडिट साहेब याचा हुकूम घेऊन देसी आलो. त्यास दीड वर्ष जाले. सचिव येजमान स्वामीनी आग्रह करून राहविले. वडिलोपार्जित जागा, राहाणे प्राप्त जाले. साल मारी पेशजी मामलेदार गोपाल हरि होते त्याणी गैरराहा वर्तणूक करून धण्याचे मानिना, तेव्हा मजला लोक देऊन पाठविले. येक महिना लढाई होऊन उपरांत किले मारी प्राचीन गडकरी चाकर होते त्याणी फितूर करून आम्हास ब्रूर घेतले. उपरांत येजमान स्वामीची आज्ञा जाली कीं तू तेथेच

7157

राहाणे, त्याजवरून मी येथे राहिलो आहे. त्यास साहेबी माझा सांभाल केला पाहिजे. साहेब सचिव याचे संस्थान हे कशात जमा. याणी आपले यांसी तिलप्राय वाकडे नाहीत. पुण्यांत गलबल जाली ते वेलस माहालांत आपलेकडील कोणास तिलप्राय उपद्रव जाला नाही. येविसीची खातरी राजश्री रामचंद्रपंत लिमये व खंडेराव भोसले करतील व सदरी मजकूर लिहिला आहे त्याची खातरी तीर्थस्वरूप राजश्री सखारामभट दादा शास्त्रीबावाचे बंधु आपलेजवल आहेत ते करतील. मौरांप+ माझे सरकारचे जाग्याचा व माझा अभिमान साहेबी मेहरबानी करून करावा. सर्वो प्रकारें साहेब मजला मुरबी आहेत. पत्राचे उत्तर द्यावयास हुकूम जाहला पाहिजे. बहुत काये लिहिणे कृपालोभ करावा हे विनंती.

¶*Amritrao Dewaji writes to Elphinstone from Vitandgad in Bhor giving details of his own and of his brother's activities in Gujarat. These may throw some light on the history of Baroda and Gujarat.*

---

*No. 191*] [*February 1818* (?)

श्री

शेवेसी सखाराम महिपत वाघ मुा गुळुंब सिर सा नमस्कार विज्ञापना ऐसीजे. आज वर्तमान माघारें इंग्रज फिरोन साल्प्याचा घाट चढून, वर येऊन मुकाम पिंपोडे धाकटे येथे जाहाला आहे. चंदनासी गोळा गोळी चालली आहे. निमे इंग्रज लोणदावर मुकाम जाला आहे. येथून दिसतो. त्याची बोलवा पुरंधरास जाण्याचा बेत आहे. निमे सडा आला आहे. तोफा घोड्यावरील दाहा बारा आहेत. आणखी बैलाच्याहि दाहा आहेत. किल्यासी त्यासी लढाई लागली आहे. आपण सावधता करावी. मागाहून आणखी बातमी येईल ते लेहून कळवितो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

पत्र रवाना दोन घटका रात्रीस.

¶*Sakharam Mahipat Wagh reports that the English had left Salpa and therefrom intended to proceed towards Purandhar.*

---

*No. 192*] [*February 1818* (?)

श्री

विज्ञापना ऐसीजे. आपण पत्र पाठविले ते पावले. लिहिला मजकूर कलला. स्वार पाठविले आहेत म्हणौन लिहिले. त्यास आस्तमानचा दोन घटका दिवस-

+ अक्षर निराळें.

7158

पर्यंत आले नाही. आले म्हणजे लिहून पाठऊ. इग्राजाचे कूच पुरंदर घेऊन इकडील रोखानें जाले. येथे येणार म्हणौन बहुत आवई आहे. वो राजश्री वेणीमाधवाच्यार्य यांचे चिरंजीव\यास पाठवावे म्हणौन लिा त्यास आच्यार्य याचे चित्तात यावे आसे\आहे. चिरंजीव गडबडीचे दिवस याजमुळे घरी पाहिजेत, त्यास आपलें पत्र आच्यार्य याणी यावं आसे आल्यास त्यास पाठऊ. चिरंजीवच त्याचे पाठवावे आसे आल्यास त्यासच पाठऊ. पुराणि( क )बावाचे चिरंजीव गावास गेले आहेत. ते आले तरी त्यासच पाठऊ. ते आज न आले तरी पुराणिकबावा उदईक येतील. घराचा मजकूर लिा त्याप्रा करितो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. मध पो तो पावली. सेवेसी आनंदराव लक्ष्मण सां नमस्कार विज्ञापना. तिकडे यावयाकरिता चार पाच दिवस येथे आलो. दाजी घोडे देणार आहेत. दिल्यावर येतो. ठिकाणाच्या घेऱ्यास परवारी असतील, ते फितुरी पकें ध्यानात ठेऊन येविसीचा बंदोबस्त ठेवावा. अळस होऊ नये हे विज्ञापना.

¶*The writer states that the English have occupied Purandar and now march onwards.*

---

*No. 193*] [*4-3-1818*

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**निलोपंत आबा स्वामीचे शेवेसी**

पो धोंडो विश्वनाथ सा ना विा येथील कुशल ता छ २६ राखरपावेतो जाणोन स्वकीय कुशल लिा जावे विा. श्रीमंत रा आणासाहेब यांस पत्रे देऊन सिपाई पाठविला आहे याजबरोबर तेथून माहीतगार आसामी देऊन पुढे रवाना करावा. किले पालगड व रामगड येथे आज प्रात:काल पासून तोफा होत आहेत. किल्यावर आग लागली ती येथून दिसत होती तेव्हा गेल्यातच आहे. सायंकाल मर्याद वर्तमानहि येईल. अंजनवेलीस इंग्रजाकडील सरंजाम गेला, कठिण आहे. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनंति.

¶*Dhondo Vishvanath writes to Nilopant Purandare reporting the arrival of British troops against the forts of Pal and Anjanvel.*

No. 194] [11-3-1818

पो छ २९ आप्रेल सन
१८१८ छ १८ जाखर
सन समान असेर.

श्री

खुदावंत न्यामत अलेपिष्टीन सो

साहेबाचे खिजमतीस येशवंत बाबूराव तुळजापूर सलाम आकी आम्हाकडील वर्तमान तर रो गनपतराव पानसे तोफखानामे सरंजाम सुधी वयेरागाजवळ सासुरगाव दोन कोसावर आहे. आम्हापासून आठ कोस आहे. फार दंगा मांडला तो लिा पुरवत नाही. आम्ही साहेब चाकरीस फार जपून आहोत, परंतु लस्करचा बंदोबस्त करावा म्हणजे प्राची वाट चालेल. नवाब कगर नवाजंग याणी पत्र पाठविले ते घेऊन उतर पा. कळाव. बहुत काये लिा लोभ कीजे हे किताबद. छ ११ मार्च सन १८१८.

¶Yashwant Bapurao reports the arrival of Ganpatrao Panshe with his artillery near Sasurgaon and the precautions taken by the writer to meet him.

---

No. 195] [19-3-1818

पा छ २९ आप्रेल सन
१८१८ छ १८ जाखर सन
समान आसेर.

श्री

खुदावंत न्यामद डाकतर ज्याफकरी मो
साहेबाचे खिजमतीस येशवंत बाबूराव

टपा तुळजापूर सलाम आकी. साहेबी बुलेग्वा नवाब बाहादुर याचे नाव पत्र पा होते ते पत्र त्यास पावते केले. त्याचे उतर आले म्हणजे साहेबाकडे पाठऊन देऊ. दुसरे, तोफखाना झाडून सोलापुरास गेला त्यापो काही निमे तोफा व पायेदळ सोलापुरापर्लीकडे तीनच्यार कोसावर मिणा नदीवर जाऊन पडला. बाकीचे रो गणपतराव पानसे सोलापुरात राहिले ते कोनीकडे जातील ते न कळे. श्रीमंताचे लस्करातून छ १८ तारखीस दोनसे तीनसे स्वार आले. बहुत खराब होते. त्यास पुसले; त्याणी सांगितले की, आम्ही तोफखान्यास मिळावयास जातो. पुरती बातमी सांगितली नाही. येणेप्रा वर्तमान आहे. सो कळाव. बहुत काये लिा, लोभ कीजे, हे किताबद. छ १९ मार्च्ये

¶News of the movements of the Peshwa's army is given in this letter by Yashvant Baburao.

No. 196] [26-3-1818

नकल छ २१ जो सानी (?)
सन १२२७ फसली

श्री

वडिलांचे शेवेसी गणपतसिंग कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना. ता। छ १९ जाखर येथास्तित प्रात:काल जाणौन श्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पा। विशेष. आपणाकडून पत्र छ १८ तारखेस जेवानाबरोबर आले त्यांतील मा।र ध्यानास आले. जेवान पुढे जवल्यास राजश्री सिवप्रसाद याजकडे रवाना केले आज धारुराहून राजश्री बालदीराम तिवारी यानी टपेवर पत्र आपले नावी व आमची नावी पाठविली. त्यास आम्ही पत्र अवलोकन केले. त्यात मजकूर लि। कीं, गनिमाची फौज घाटाखाले छ १७ तारखेस आली. छ १८ तारखेस आपले तालुकेत रुईचे राणात येऊन मुकाम केले. आसपास आसवल वगैरे गावबगाव कही केली आणि धारुरची बैल बकालाचे घाटाखाले लुटले. याजप्रो कैफियत लिहिली आणि मागाहूनहि दाहा पंधरा हजार फौज येणार. कोणीकडे जाती हे न कले. या मुकदमेन जरूरीयात पत्र रवाना केले आसेत, पोहचतील. इकडे हुशारीने आहोत. बातनी वरचेवर ठेऊन आहोत. त्यास जमियेत काही पाठऊन द्यावी. दुसरे उमरावतीहून येक वाणी आला. त्याने जुबानी कैफियत श्रीमंताचे लस्करची सागितली जे फौजमुधा बाजीरावसा। उमरावतीपरियेंत येऊन बारी पलीकडेस मुकाम केला. आसपास कही करण्यास गेले तों फिरंगीयानी बारी धरून राहिले. इंग्रेज बाहादूर यांची बाजीरावसो याची फौजेची नाकानोकी होऊन आपले जागीं आनमान राहिले. दुसरे दिवसी बाजीरावसा। यांची फौजचे कूच होण्याची बातनी इंग्रेजबाहादूर यानी राखून बारीचे तोंड धरून बाजीरावसा। याचा खजाना वगैरे लुटून खराब केला. फौज जिकडील तिकड फरारी जाहली. बाजीरावसा। पाच सातशेहे सवारानसी पलून गेले. याप्रो। वाणी मा।र याने सांगितले, त्याजवरून आपणास इतला लि।. धारुराहून टपेवर पत्र दोन लांजेस आल. लांजेकरानी इकडे पाठविले ते आपणाकडे रवाना केले आसे. पत्र लिहीते वलेस धारुराहून पत्र आले, त्यात मा।र लि। की मागाहून फौजा वीस पंचवीस हजार येताती. त्यात सरदार श्रीमंत चिमणाजी आपा व घाटके व निपाणीकर वगैरे ऐसे येतात. त्यास जमियेत काही त्वरित पाठऊन द्यावी. आम्ही आपले ठिकानी हुशारीने आहोत. कदाचित फौजचा रोख कलंबाहून दिसल्यास नवीन लोक ठेऊं. कलावे बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*Ganapatsing sends news of Bajirao's flight to Umarawati and of a brush he had with his British pursuers.*

7161

No. 197] [29-4-1818

**श्री.**

यादी चैत्र वा। ८ बुधवार.

१ बाळाजी कुंजर याजकडील काही सरंजाम मौजे सरडसाठ येथील कुरणात होता. पलटणे निरापार होताच त्याजकडे जाऊन मिळाला.

१ लस्करचा मुकाम मौजे मांडव येथे आला तेव्हा नाझरे आटपाडी येथील फौज मौजे पार नजीक इटे भाळवणी येथे आला.

१ पलटणं नजीक आली तेव्हा फौजेतून निघोन फलटणांत छपून होते व त्याची खास पागा धर्मपुरीवर होती ती मौजे दुधबाव येथे फलटणानजीक आठ कोस घाटमाथ्यावर, ठेविली होती. मंगळवारी ती पागा व दुसरे दोनसे स्वार ऐसे मौजे माळेगाव, अमरसिंग जाधवराव याचे, त्या गावी गेले. आमचे गावचे स्वार आहेत त्याणी खचित बातमी सांगितली. ते स्वार आजच तिकडे गेले. फलटणांत कारभारी निंबाजी जाधव आहेत.

१ निपाणकर व सांगलीकर यांची फौज पेंढार त्यास सामील होणार असी बातमी आहे.

१ पुण्याकडील स्वार फुटकळ येतात ते पलटणचा मार्ग सोडून रानातून रात्रीस जाऊन त्यास मिळतात.

१ माहादेवाची यात्रा मौजे लाहासुर्ण पा। इंदापूर येथे वद्य प्रतिपदेस दोनसे स्वार येऊन लुटली.

१ तुरुक स्वार व चटेकरी गावोगाव चौकसीकरितां फिरतात परंतु ठिकाण लागत नाही. आपाजी पा। कुरवावीकर व बापू कुलकर्णी वरडकर व व वागमोडे फोंडसिरसकर हे त्याचे मिलाफी आहेत.

¶*Items of news communicating movements of the remnants of the followings of Baloji Kunjar, Nipankar and Sanglikar are noted in this paper.*

---

No. 198] [ Recd. 1-5-1818

पा। छ २४ माहे जा। सानी
सन १२२७ फसली.

वडिलाचे शेवेसी विज्ञापना जे. श्रीमंतांचे फौजपो पांच हजार लस्कर मौजे सुकली ता। धारूर व गोयेगाव प्रा। आंबाजोगाईचे रानात कजेडी नदीवर उतरले आहेत. त्यांत सरदार येशवंतराव गोकले व विठलराव नाईक ऐसे आहेत

पुढें कूच करून कोणते मार्गानें जातात हें न कळे. सिराढोणावरून जातात किंवा कळंबाहून जातात हें नकळे. सिराढोणावरून जातात किंवा कळंबाहून जातात हे आदियाप समजत नाही. मागाहून सोनपेयवर फौज आली त्यात श्रीमंत बाजीरावसाो नाहींत. जमियेत भारी आहे म्हणोन वदंता आहे. तहकीक नाहीं. बातमीस माणसें पाठविले आहेत. बातनी आल्यावर आपणास टप्यावर पत्र रवाना करून देतो. लस्करचा मार्ग आपले तालुकेतोन पडला, याजकरिता रात्रंदिवस बहुत राखून आहेत. आपणास कळावे हे विज्ञापना.

¶*The arrival of Yashwantrao Gokhale and Vithalrao Naik with their forces at Ambajogai is reported. The writer further says that Bajirao was not seen with the forces that subsequently came and encamped there.*

---

*No. 199*] [*1-5-1818*

पाो तारीख ६ माहे मे
सन १८१८ इसवी मुता-
बीक छ २९ जाखर.

कैफियत लष्कर बाजीराव ताा छ २४ माहे जमादिसानी.

१ फौज चैंद्रपूर नागपूरचे ख्यालत आहे तेथवर गेली होती. तिकडे इंग्रेज बाहादुर याची फौज आली म्हणून आवई खाऊन माघारे फिरून वरधा नदी नागपूरच पैलीकडे च्यार मजली आहे तेथहि इंग्रेज बाहादुर यानी नागपुराहून येऊन गाठ घातली. काही लडाई जाहली. तुरत सवारानी दाटी करिताच फौजेची फुटाफूट होऊन फौज ताराज होऊन त्यास जो मार्ग समजला त्या मार्गे गेले. बाजीराव येका माळावर उभे होते ते पलीकडे येक घोडे व येक आंगावरील वस्त्रासुधा मात्र गेले. समागमे विंचुरकर व निपानीकर खासे गेले. दाहावीस हजार फौज निभून या देशास आली, त्यात निपानीची व इंचुरकर वगैरे फौजहि आली. आकलकोटकराची फौज काही निघून मांडव प्रांाचे ठाण पानगाव येथ मोकाम करून आज करंजाळच मोकामास आले. फौज तेथून सता आठ मजली करून या प्रांतास आले. आपलाले सोईप्राो गेले. बाजीराव याचा सरंजाम व हाती, उंट वगैरे तमाम सलतनत लुटली गेली. आकलकोटकरी खासे या रोख आले म्हणून वर्तमान आहे. त्यास आद्यापि खचित वर्तमान आले नाही. याप्राो वर्तमान आहे. कलम.

7163

१ तोफखाना गुणवनच्या नदीवरून कूच करून पो इंडीस जाऊन मोर्चे लाऊन तेथ चालीसपनास माणस जीव मारले गेले. लषकरचेहि लोक जाया जाहले. गाव घेऊन लुटून खराब केले. ठाण घेऊन मौजे हिली पो आकलकोट मोकाम करून घासदाणा देणे म्हणून तगादा मौजे नागनसूर वगैरे स्वार पाठविले. तेथून कूच करून मैंदरगी व बंडगर तालुका तेथून मोगलाईत येणार येशी आवई आहे. कलम.

१ निपानीस इंग्रेज बाहादुर यांची फौज घेऊन दाखल जाहली म्हणून वर्तमान आहे. तहकीक समजल्यावर लिहिणेत येईल. कलम.

येणेप्रा वर्तमान आहे. आणिखी वर्तमान येईल ते लिहिणेत येईल. तोफखानेच वर्तमान इकडून पाठवीत जाऊ. निलेगावकरास ताकीद आसावी म्हणजे वरचेवर आपणास पोहचत जाईल.

¶*The defeat of the Peshwa's force near Chanda and its subsequent flight is reported in this news-letter. It also refers to some military action in Karnatak near Indi and Nipani.*

---

*No. 200]* *[3-5-1818*

पो छ ६ म इसवी
मुताबीक छ २९ जाखर
सन १८१८.

श्री

साहेबाचे सेवेशी उमाजी शंकर मुा जेजोरी विज्ञापना. ता चैत्र वा १३ प्राथःकाल येथील वर्तमान: श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे लस्करातून दोन सिलदार आले. त्यानी वर्तमान सांगितले की, नागपूरचे आलीकडे वीस कोस बाजीरावसाहेब यांचे लस्करचा मुकाम होता. तेथे कुंपणी सरकारचे फौजचा छापा येणार असे समजले. त्याजवर बाजीरावसाहेब यांचे लस्करचे कूच होऊन नागपूरचे सुमार झाडीतून जात होते. बाजीरावसाहेब मेन्यांत बसून चालले तो पुढे खेत, पांच्यार तोफेचे बार जाले व छापा आला असे समजले. नंतर बाजीरावसाहेब मेन्यातून उतरून कुटुंबसुधा घोड्यावर स्वार होऊन पंचवीस तीस हजार फौजेनसी पळाले. मागे पुरंदरे व रामचंद्र सुभेदार व विंचुरकर यांची फौज होती ती मागले माघ पळाली. बुनगे लुटले गेले. तीस पस्तीस हजार फौजसुधा त्रिवर्ग गंगाखेडास अले. तेथून फौज फुटोन लोक आपलाले घरास जावयास लागले, तेव्हा पुरंदरे व रामचंद्रपंत लोकास म्हणू लागले जे तुम्ही घरास जाऊ नये;

बाजीरावसाहेब याजकडे जाऊ. लोक खर्चास मागू लागले तेव्हा उतर केले जे, बाजीरावसाहेब यांचे लस्करात पोहचल्यानंतर तुमचा रोजमुरा देऊन बक्षिसा देऊ. लोकांस खातरी होईना, तेव्हा बाहाना केला किंवा खरे हे न कले. दोन जामूद पत्र घेऊन बाजीरावसाहेबाकडोन अले की, आम्ही फौजसुधां उबरखेडावर आहो, तुम्ही यावे. तेव्हा पुरंदर व रामचंद्र असे वीसपंचवीस हजार जमेतीनसी उबर-खेडाकडे गेले. काही सिलेदार व विंचुरकराची फौज आठदाहा हजार असे फुटोन आपलाले घरास गेले. आम्हीहि त्याबरावर आलो, असे त्यानी वर्तमान सांगितले आणि अज आपले घरास सिलेदार गेले. मुख्याकडून वर्तमान अनविले तथ मार की, इभ्रामभाई जिंतीकर पलसदेव इंदापुरचे सुमार बंड करून तिकडील गावास उपद्रव मनस्वी देतो व पाटसचे आलीकडे स्वार, चोर, गाऊन गणात बेपारियास लुटून मानसे मारामार करून जखमी केले व मानसे मारिले. याप्रा वर्तमान कलल ते शेवेसी लिा आहे. गंगाखेडास व औरंगाबादेकडे जामूद पाा ते अले नाही. वरचेवर वर्तमान आणून लेहून पाठवितो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*News of Bajirao's journey towards Nagpur and his sudden flight back to Umarkhed owing to British troops following him in pursuit, is sent by Umaji Shankar.*

---

*[No. 201]* *[4-5-1818*

नकल

पाा तारीख १४ माहे म

सन १८१८ इसवी मुताबिक

छ ८ रजब सन समान असेर मया

तेन व अलफ

रास्ते इलाका अथणी मामलेदारान

जेनेल तामस मंड्रोल साा यांजकडे

असणार इलाका रास्ते यांचा वकील

बच्याचीपंतास लिहिल कागदाच नकल.

राजेश्रियाविराजित राजमान्ये राजेश्री बच्याजीपंत आपा स्वामीचे सोसी पाा गोविंद वासुदेव साा नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम ताा चैत्र वाा १४ येथास्थित असे विशेष. खेमासिंग म्हणून सिलेदार आपले येजमानाजवळ चाकरीस होते ते लष्कराहून आल. त्याणी वर्तमान सांगितले जे श्रीमंताची व फौजाची गाठ नव्हती. साहावे दिवसी उमरखेड्यावरी फौजेत श्रीमंत आले. तेथून अलीकडे

आउढा नागनाथचे मोकामास श्रीमंत फौजसुदा आले. आउढाचे मोकामिहून खेमसिंग मजकूर निघून काल येथ बारवे रोजी आला. आपले येजमानसा॑ फोजेंत आउढाचे मोकामेंत आहेत. निपाणीकर व अकलकोटकर राजे लढाई जाहाल तेव्हा फौजेतून निघून गेले ते पुन्हां फौजेत आले नाहीत. निपाणीकराकडील सरजेराव घाटगे कांहीं जमियेतनिसी निपाणीस जावयास आले, त्याच सोबतीने खेमसिंग पंढरपुरापरियेंत येऊन इकडे आला. सरजेराव निपाणीकडे गेले. अकलकोटकर राजे अकलकोटेस गेले असे जबानी सांगितला, व तोफखानेस मिळावयास सोलापूरच रोखे श्रीमंत येणार असा बोलवा होता म्हणून सांगत होता, सिवनीवर लडाई जाहली, इंग्रज बाहदूर यांची पलटण व तुरूपस्वार दोनीकडून आले. त्याजवरून श्रीमंत उभयेतां फौज सोडून गेले. विसाजीपंत गोकलेजी पळून झाडींत गेले, तेव्हां फौज उधळून उमरखेड्यास आली. नंतर माहत्रे रोजी गांठ पडली. येजमान आपले अलीकडे च्यारी मजल आले, म्हणिजे निघून जागेवर येणार असें जबानी सांगितले. फौज व श्रीमंत तोफखान्याकडे सोलापुराच सुमार येणार, तोफखान्यास मिळून घेणार असेंहि बोलत होते म्हणून सांगितले. येकिल बातमी समक्ष मी विचारून लिहिले आहे. चैत्र वा १४ इंदुवासर प्रातःकाल हे विनंती.

¶*Govind Vasudeo writes to Bachajipant, a Vakil of Rastia, reporting the news communicated to him by one Khemsing a deserter from Bajirao's army. It refers to the fighting between the Peshwa and the English near Sioni.*

---

*No. 202*] [*Received on 5-5-1818*

पो छ ९ माहे मे सन
१८१८ छ २ रजब.

कैफियेत लस्कर.

१ आज आलफते दिवसी दिवसा राजे आकलकोटकर दरशणहलचे मुकामांस आडीच प्रहरा दिवसा आले. दीड प्रहर रात्रीं कसबेस गेले. कलम.

१ बाजीराव यांची व राज्याची फूट च्यारठाणेवर जाली. ते राज्याचे देवलेकडे गेले. तेथून सातपुडचे घाटाकडे जाणार. समागमे फौज च्यारपांच हजार आहे. इंचूरकर दीड हजार, निपाणीकर पांचशे व होलकराकडील दोन हजार व गोखल्याकडील सुभेदार च्यारपांचशे येणप्रो जमियेत आहे. कलम.

7166

१ फौजवर धांदल जाली. ता। १० जारीस पांचश लैन व तुरप सवार तीनश होते. धांदल केली. कलम.

१ फौजतून बाहीर व बुनग आल त्याचे पिछ्यावर येक टोली आंबेकडून आली व येक टोली धारूरचे घाटाखालून नजीक हिंगणीवर मुकाम दोनी टोल्याचा जाला. कोणीकड जातात पाहाव. कलम.

१ तोफखानेवाल्यानी आकलकोट प्रोचे हिलीवर मुकाम करून तालुकियात धांदल केले. काही घासदाणा घेऊन तह ठरविला. उदईक कूच करून जेऊरी प्रो आबजलपूर येथे मुकामास जाणार. लस्करात श्रीपतराव बाळ-गेस गेलेत ते लस्करातच आहेत. लस्करात तोफा सुमारी १४, पायदल पांचसाहा हजार व सवार दीड हजार व लुटारी, येणप्रो जेमियेत आहे. कलम.

¶*News about the dissolution of Bajirao's army is reported.*

---

*No. 203*] [*5-5-1818*

प्रो तारीख ६ माहे जून
सन १८१८ इसवी मुता-
बीक छ २ शाबान.

**श्री**

**हजरत खुदावंदन्यामत सरदार अलिशान खुदायगा**
**नवाबसाहेब बाल बाहादुर याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बज्या आऊर दे मारूज मे रसानद आके येथील खैरसला अखबार देवढी मुकाम मगलवेढ नजीक श्रीपंढरपूर तो छ ५ माहे जून सन १८१८ इसवी मुताबीक छ ३० माहे रजेब सन १२३३ रोज शुक्रवार प्रो येथास्थित असो विशेष.

इकडील मार :

१ पंढरीकडील मार :

१ सातारियाकडील ठाणे रो आबाजी नरहर घेऊन क्षेत्री राहिले होते. हुकूम येताच सिबबंदीचे लोक फलटणाकडे गेले व मोहोलकडील मोहोलस गेले.

१ बडवे यास, ववरी खाली करून देणे, देवाचे वस्त्रआलिंकार काये आहे ते लेहून देणे म्हणोन जरब दिल्ही होती. सबब उगेच बसण्यास साहा हाजार रो ठाणेदार याणी घेतले. [ पुढील ३ कलमे गाळलीं. ]

7167

१ उतरेकडील वदंता लोक बोलतात, पेंढारी याणी च्यार टोल्या करून चौ दिशेस गेले. सिंदे, जाट, होलकर, राजेरजवाडे येकत्र होऊन श्रीमंतांच्या भेटी जाहाल्या. सिंदे इकडे येतात ऐसी बोलवा उठली आहे.

१ लस्कर पंढरीस येऊन दाखल जाले. सरदाराचे नावाचा शोध घेऊन वर्तमान लिहितो.

[ पुढील १ कलम गाळलें. ]

१ छ ३ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशेल.

१ रा। येशेवंतराव पानशे येथे येऊन राहिले आहेत.

[ पुढील १ कलम गाळलें. ]

१ रा। चिंतामणराव आपा याजकडील तेरा स्वार सांगलीकडोन येथे आले.

१ मौजे येतन्हाल येथील कनवा व मौजे हाटगी येथील कनवा ऐसे सातारियास रवाना जाले.

सदरहू मार साहेबाचे खिजमतीत लि॥ आहे. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*Balvantrao Bapuji reports the news received by him from Satara and from the north regarding the movements of the Peshwa and some of his Sardars.*

---

*No. 204]* *[6-5-1818*

पो। छ १० माहे म

सन १८१८

इसवी मुताबीक छ रजब



अजम आक्रम इल्फिस्तन

साहेब बाहादूर दाम मोहबत हू

ई साहेब खुपवस्त मेहरबान कदरदान नियाजमंदा आजनीयां आजम रंगो वासुदेव सलाम बाजद सलाम अर्की. येथील खैर आफीयत तेरीख छ २९ जाखरपावेतो साहेबाचे येकबालेकरून मु॥ फलटण येथे खैर आसो. दिगर ठाणे मजकूरचा बंदोबस्त हुकुमाप्रमोजीब हुशारीने राखोन आहे. बाजीराव-साहेब याचे लस्करावर सरकारचा छापा पडोन उधळली ते आपलाले घरी जीव संरक्षून येत आहे. याचा पर्याय चौकसी करून सातारियांस साहेबास लिहीत आहे. बाजीरावसाहेब याजबरोबर पुरंधर, आपटे, डेंगले वगैरे सरदार दाहा वीस हजारानिसी पुढ पळोन आवंढ्या नागनाथाचे डोंगरचे झाडीत हाली आहेत म्हणौन वार्ता ऐकण्यात परस्पर येत आहे. याचा पका तलाश करून खिजमतीस

आर्ज तपशीलवार लिहून पाठवीन. बाजीरावसाहेब याजबरोबर जानराव नाईक निंबाळकर व निपाणकर आहेत. ज्यादा काय लिहिणे. प्यार मोहबत कीजे हे किताबत.

¶*Rango Vasudeo reports to Elphinstone news from Phaltan regarding what he had heard of Bajirao's flight.*

---

*No. 205*] [*9-5-1818*

पौ तेरीख १४ माहे मे

सन १८१८ * * ८ रजब

सन समान असर

श्री

हजरत खुदावंत न्यामत सरदार

अलीशान खुदायगा नबाब साहेब

बालगहादूर यांचे खिजमतीस

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बज्या आउरदे मारूज मे रसानद आंक. येथील खैर सला अखबार देवढी मुा मंगळवेढ नजीक पंढरपूर ताा छ ९ माहे मे सन १८१८ इसवी मुताबीक छ ३ माहे रजब सन १२३३ रोज शनवार पौ यथास्थित असो विशेष. इकडील मार.

१ पंढरीकडील बातमी

१ पंढरीस रहिमतपूरकर गा जोरावा माण निा निपानकर पंचेवीस स्वार दोन हाती वगैरे सरंजामसुधा पट्टन आलेला येऊन राहिला आहे.

१ तालुके मोस येथे ठाण्यात सिवबंदी होती त्यास बरतर्फ करावयास लागले आहेत.

१ आपल्याकडील सरंजाम ठाणे बसावावयाकरिता येलापुराकडे नरसिंव्हपुराकडे आले आहेत म्हणोन

१ श्रीमंत पंतप्रधान बंधूच्या भेटी होऊन वारीपार होऊन फौजसुधा गेले म्हणोन पंढरीस बोलवा आहे.

१ पंढरीस बरतर्फी आरब दीडशे दोनशे येऊन राहिले आहेत.

१ या माारची अखबार हजरत जनरेल तामस मडराल साहेबास दाखल केली. आजचा त्याचा मुकाम सोलापूरचे आलाड दोन तीन कोसावर आहे म्हणोन बातमी आहे.

१ छ ७ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहचलीच आशल. मार साहेबाचे खिजमतीस लिा आहे. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*The arrival of Thomas Munro near Sholapur and other items of news from Pandharpur are reported by Balavantrao Bapuji to Elphinstone.*

No. 206] [10-5-1818

तरीख १४ मांहे मे सन १८१८
इसवी मुताबीक छ ८ रजब
सन समान असेर

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार
अलीशान खुदायगा नवाब साहेब
बालबाहादूर याचे खिजमतीस

अर्जदास्ता फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बज्या आऊरदं मारूज मे रसानद आके. येथील खैर संला अखबार देवढी मुा मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ १० मांहे मे सन १८१८ इसवी मुताबीक छ ४ माहे रजब सन १२३३ रोज रविवार पाा येथास्थित असो विशेष. इक-डर्ल। मार

१ येथे आरब पनास साठ आा येऊन उतरले होते म्हणौन लिाा होते, ते काल तोफखान्यास जाऊन मिलाले म्हणौन बातमी लागली. कलम

१ निपानकर याचे तर्फेचे सिलेदार पलून आलेले येथे पंधरा स्वार च्यार उंट येऊन उतरले आहेत.

१ छ ९ तारखीस आस्तमार्णी लस्करात अखबार घेऊन गेला होता तो आला. त्याणे बातमी आणली. तोफखाना छ ८ तारखीस दोन प्रहरा रात्रीस सोलापुरास दाखल जाला. आपलेहि लस्कर मौजे देवगावचे वढ्यावर जाऊन उतरले आहे. आपल्याकडील तुरूप तलाव्यास गेले होते, त्याणी किल्यावरून च्यार तोफा डागल्या म्हणौनहि बातमी आणली. तेथून पुढे कचा येक कोस मौजे बाले म्हणौन गाव आहे. तेथील गढी लढाऊ आहे. तेथे पानशे याणी च्यार तोफा ठेऊन जागा बलाकाविली आहे. मोर्चा बदला आहे. लढावयाचा दम बहुत आहे. आणखी किल्यात गावची रयेत देशमुख व देशपांडे शेट्ये माहाजन व बारा हाकदार नेऊन बसविले आहेत. फितूर होईल म्हणौन. आज आणखी अखबार लस्करात पाठविली आहे. काये बातमी येईल ती खरी

१ रो चिंतामणराव आपा याचे आपल्या लस्करात पंचेवीसक स्वार कारकून भालदार गेले होते ते माघारी आले. कलम

१ आपले लस्करांत मौजे पाथरीचे मुकामी नवकर राहावयास मुधलकर घोरपडे लाहान मोठे शेंभरीक स्वार आले आहेत. हजरी घेतली. जामिन मागत होते. साहिबाचीहि भेट जाहाली होती. कलम

१ आपल्याकडील पलटण हैदराबादकडोन दुरगाकडोन काटेमारडीचे मुकामास आले म्हणोन लस्करांत जासूदच आले होते. कलम

१ सोलापूरचे आसपासचे खेड्याचे जमिदार साहेबास येऊन भेटले आणि चेटकरी रखवालीस नेले :—

| | |
|---|---|
| १ मौजे हिरज | १ मौजे कामथी |
| १ मौजे देगाव | १ दुसरी कामथी |
| १ मौजे बेलाटी | १ मौजे वटवट |

१ आपल्याकडील ठाणे बसविले व ताकीद केली :—

| | |
|---|---|
| १ काशेगाव | १ मासणूर |
| १ सांगोले | १ बेगमपूर |
| १ बेरडी | १ बनपुरी |

१ किल्यांत सोनार गोल्या चढावयास लावले आहेत. मौजे बाल येथपर्यंत झाड होते ते तोडले म्हणोन बातमी आली. जागा मैदान केले. कलम

१ नरखेडाजवळ मौजे देगांव येथील घावणे सिलेदार पळून आले. बरात आले आहेत. म्हणोन बातमी आहे. कलम
मौजे कडलास प्रा। सांगोले येथील मुसलमान व मऱ्हाटे शे दीडशे स्वार पळून आलेले घरास आले आहे. रा। वामनराव आपटे याचे हुजरातीत होते. कलम

१ छ ९ तारखीची खबर रवाना केली ती येऊन पोहोचलीच असेल.

सदरहू कलम साहेबाचे खिजमतीत लिा आहेत. बंदगीस रोषन होये हे अर्जदास्त.

¶*Balvantrao Bapuji reports to Elphinstone the operations at Sholapur. Some administrative items are also mentioned.*

7171

No. 207] [11-5-1818

तरीख १७ माहे मे सन
१८१८ इसवी मुा छ १२
रजब.

श्री

HONOURED SIR,

साहेबाचे शेवेसी रावजी बालाजी विनंती विज्ञापना विशेष. श्रीमंत बाजीराव-साहेब यांची स्वारी धुलकोटास आहे. धुलकोटास अशरखाली गाव आहे. बराणपुरापुढे बारा कोश बाजीरावसाहेब याचे भेटीस राजश्री येशवंतराव लाड अशरचे किलेदार हे गेले होते व कृष्णराव माधव मुसकुटे सरदार सिंदे याजकडील बराणपुरी असतात याजकडील कारकून व बराणपूरचे सुभेदार याजकडील कारकूण काही सिधा व पोशाक घेऊन गेले होते व लाडानीहि मेजवाणी केली व सूरयाजीराव निंबाल्कर यावलकर याजला श्रीमंतानी बोलाऊ पाठविले होते, परंतु ते गेले नाही. कारकुनाबरावर काही पोशाक व भोजनाचे सरंजाम पाठविले होते. पुढे श्रीमंत कोठे जातील हे समजत नाही. बरावर सितू पेंढारी व कान्ह्या भिल आहे. कुटुंबास असरीचे किल्यात ठेवणार असी बंदता आहे. मग पाहावे. बरावर फौज सुमारी सात हजार आहे व गारदीनहि आहे. साहेबास कलाव हे विज्ञापना. छ ११ मे सन १८१८ * * * वाजता रात्रा.

Honoured Sir,
Your most obedient humble servant,
Rowjee Ballajee.

Kherighaut +
11th May 1818.

¶*Raoji Balaji communicates news of Bajirao having arrived at Dhulkot near Ashirgad whose killedar Yashvantrao Lad, says the letter, gave shelter to the family of the Peshwa.*

---

No. 208] [11-5-1818

तारीख २१ माहे मे सन १८१८
ईसवी मुताबिक छ १६ रजब

श्री

साहेब वाला मुनाबीक अलीशान
हनरावल मौन्ट इष्टवारीट इलफिसतन
साहेब बाहादूर सलामत

ॐ खिजमतसि बालाजी नारायण नातू बाजद सलाम अंके येथील खैरयत छ १२ रजबपावेतो साहेबांचे मेहेरबानीचे नजरे करून खैरयत असे. दर्शविला मुलीचे

+ खेडीघाट.

लग्न करावयाचे, त्यास साहेबांस अर्ज करून व्हावें ही इछा. परंतु साहेबाचे कदमापासून दूर राहणे जाहाले, यामुळे मेहरबां ग्रांटसाहेब याजवळ साहेबाचे खिजमतींत ल्याहावयाविसी अर्ज केला, त्याणी साहेबास लिहिलेच आहे व तर्तूद करण्याविसी मला हुकूम दिल्हा, त्यावरून वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नीलकंठ शास्त्री थते याचा पुत्र वर निश्चय करून वैशाख वद्य पंचमीस लग्न-तिथीचा निश्चय केला आहे. साहेबाचे कदम मुबारख होऊन कार्य सिधीस जाई ते जाहाले पाहिजे. लोखंड परसास लागल्यावर सोने होईल की नाही ही कालजी लोखंडास राहात नाही. माझे मनांत काय आहे ती येते वेळेस विनंती केलीच आहे. हे आर्जदास्त.

¶*Balajipant Natu communicates to Elphinstone that he intends marrying his daughter to the son of Nilkanth Shastri Thatte and asks his blessing.*

---

*No. 209*] [*12-5-1818*

पौ छ १५ माहे मे सन
१८१८ ईसवी मुताबीक
छ ९ रजब

**श्री**

**हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान**
**खुदायगा जरनेल तामस मंडरोल**
**साहेब बालबाहादूर याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलीमात कुर्निशात बज्या आऊर दे मारूज मे रसानद आके. येथील खैरसला अखबार देवढी मुकाम मंगलवेढ नर्जाक श्री पंढरपूर ता। छ १२ माहे मे सन १८१८ इसवी मुताबीक छ ६ माहे रजेब सन १२३३ रोज मंगलवार पौ। यथास्थित असो विशेष. इकडील मा।र.

१ सोलापुराकडील वर्तमान आपल्याकडील दोघे तिघे जासूद दोघे तिघे लष्करात बातमीस गेले ते परतले नाहीत. परंतु तोफखान्याचा पल दरोबस्त स्वार व काही आरब व सिदी व काही गोसाई जखमी केलेले येथ येऊन उतरले आहेत. छ १० तारखीस मोठीच लढाई जाहाली. आवायाहि फार आले. तोफखान्याकडील हजार पाचशे मणुशे ठार जाले. तिकडील सरदार रा। विठल बच्याजी व काकोपंत ठार जाले. आपल्याकडील याणी पेठत जाऊन मोर्चे लावले, त्यामुळे आपल्याकडीलहि बहुत खराबा जाहाला.

प्रहरा रात्रीस काल पटवर्धण याचे वकिलाचे पत्र आले. हजरत जरनेल नामस मंडगोल सो पडले. काही काल बहुतसी लढाई जाहाली नाही. तोफखान्याचे पलामाघे आपल्याकडील तुरुपानी दऊड करून सापडले त्यास तोडलेच. मोठी मडर्वान केली. हजार पाचशे मणुश जखमीहि केले. ज्याला जिकडे वाट फुटली तिकडे पलाले. याप्रो मार आहे. पुढे काये खबर येईल ती खरी.

१ किल्यात फितूर होईल म्हणोन रा। भाऊ गोडबोले व विठलपंत गाडगील या उभयेताचे पायात बेड्या घालून पानशे यानी टाकले आहेत. हाली लढाई चालिली आहे. मोठा दम आहे. किला बलकाऊन रा। गणपतराव पानशे याचे हातास गोल्याची जखम जाहाली म्हणोनहि बातमी आहे. आपले लस्कर किल्याचे पाटी पडले आहे. येथे पो लाग केला आहे.

१ रा। दुलखान आपले लस्करास मामील आले होते नहि पडले म्हणोन आवाई आहे.

१ रा। विठोजी नाईक गाईकवाड पलून आलेला च्यालीस पनास सरंजामानसी पंढरीस येऊन राहिला आहे.

१ आपल्याकडील ठाणे या प्रांतास दरोबस्त बसले. पंढरीस माल्वणी आकुलजेस ठाणे गेले आहे.

१ तालुके भोस येथे आपले राजकडील ठाणे होते ते जाऊन माणकेश्वर याचे ठाणे बसले. तेथे आपलेहि ठाणे जाणार होते. कलम

१ रा। महिपतराव मामा रेवडीकर पलून आलेले पंढरीस येऊन राहिले आहेत. त्याणी सांगितले, जे दिवसी श्रीमंत पलाले ते दिवसी येके दिवसात वीस कोस गेले. जवल खावयास काही नाही. माझे परतालेचे नट येऊन मिलाले तेव्हा आन्न मिळाले. जितके सरदार तितके बरोबर आहेत. दशा सांगता पुरवत नाही. दाहा पंधरा हजार फौज बरोबर आहे म्हणोन सांगत होता.

१ छ १० तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशल. बातमी लवकर कळवावी म्हणोन लखोट्यास घागरी बांधली आशे. रागास येऊ नये.

मदरहू कलम माहेबाचे खिजमतीत लि॥ आहे. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

*¶Balvantrao Bapuji communicates the progress of the siege of Sholapur. He also reports the distressing condition of Bajirao's flight.*

1 Marred or spoiled state = शेणसड्याची घाण, अवस्था.

*No. 210]* *[13-5-1818*

तारीख २७ माहे मे सन
१८१८ ईसवी मुताबिक छ १४
रजब

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अली
शान खुदायगा नबाबसाहेब बाल
बाहादूर याचे खिजमतीस

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादवेदरी आदाब तसलीमात कुरनिशात बन्या आऊरदे मारूज मे रसानद आहे. येथील मेर मलो अखबार देवदी मुा मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ १३ माहे मे सन १८१८ ईसवी मुताबिक छ ७ माहे रजब सन १२३३ रोज बुधवार पाो येथास्थित असो विशेष. इकडील सार कालचे अखबारांत लिा. जासूद गेले ते आले नाहीत. त्यास काल प्रहर रात्रीस जासूद आले. त्याणी बातमी आणली. लढाई चालली आहे. तोफखान्याचे दरोबस्त लोक किल्यात सिरले आहेत. आपल्याइकडील लोक पेठत जाऊन मोर्चे लाऊन रवर्णीस लागले आहेत. लस्करात हावालदिली नाही. लोक हुशार आहेत. वरचेवर मणुशे पडतात. किला आद्याप जेरीस आला नाही. मणरूपचे आंगून तोफा लावल्या आहेत. कोण पडले कोण राहिले हे कोन्ही लस्करात बोलत नाहीत. पनास पाऊनशे डोल्या जातात येतात. तोफखान्याचे स्वार व पायदल बाहार होते त्यास निरोप दिल्हा. त्याचे मागे आपल्या इकडील तुरूप व काही लयणचे लोक याणी दऊड करून मोठी सडवान केली. दोन तीन कोस मुडदे पडले आहेत. काही पलून गेले. लस्करात याप्रा बातमी आहे. बाहार व येथे मुखल्याराच पडले म्हणोन लोक स्पष्ट बोलतात. किल्यात येथे वकिलाचे पत्र आले त्यात सरदार पडल्याचे वर्तमाण लिा ती बातमी राा गोविंदपंत बोक याणी येऊन सांगितली त्यावरून ऐकिले ते लिहिणे प्राप्त जाले. परंतु लस्करातहि बोलतात. ऐसी लढाई कधीच येतली नाही. उभयेपक्षी मणुशे बहुत मेले. बाजार बातमी तर मणश्वी येतात. रात्री येकाण सांगितले की दुलेखान यास गोळी लागली, तेव्हा धोत्रीकडे घेऊन चाले तो वाटेतच काल जाहाला आणि लस्करात तर कोन्ही कोन्हासी बोलत नाही. निवल जाल्यावर खरं खोटं वर्तमाण कलल. दुसर येकाण सांगितले ज्यानखान जमादार पहिले पानशे याजकडे नवकर होता. हाली त्याजपासी च्यार हजार आरब आहेत त्यास पत्र पाो आहे. तिसरे येकान सांगितले राो भाऊ गोडबोले पुढे होते त्याणी व

पेठचे शेख्याने फितूर केला म्हणौन आपल्याकडील लोक पेठेत सिरले. गोडबोले आपल्या लस्करात मिलाले. शेख्या यास धरून पानशे याणे तोफचे तोंडी देऊन उडविला. जेऊरचे टप्याकडील वरधी आली. आपल्याकडील येक पलटण * * सिनावर आले आहे व श्रीमंताचे मागे पलटण होते ते धारुराकडे आले आहेत. कलावे. तासगावकर पटवर्धण याजकडील वकील रा बापू म्हसकर आज येथून आपले लस्करास गेले. छ १२ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पाहोचलीच आशल. मार साहेबाचे खिजमतीत लिहा आहे. बंदगीाम रोशन होये हे अर्जदास्त.

¶*Balwantrao Bapuji reports the severe fighting at Sholapur and news from other places.*

---

*No. 211*] [*14-5-1818*

नकल.

**श्री**

**मोहर.**

यादी किले सोलापूर येथील ठरावाची कलमे. सुाा समान असर मयातैन व अलफ. छ ८ रजब सन १२४७ वैशाख शुाा ९ गुरुवार शके १७४० सन १८१८ माहे मे छ १४.

१ किलेदार व दरकदार व कारकून जमादार व सिलेदार बारगीर व बाजे लोक वगैरे आपलाली बायेकामुले कचेबचे चीजबस्त हत्यार पत्यार घोडे तट्टू बैल गुरे वगैरे सुधा घेऊन जातील त्यास उपसर्ग देऊ नये. पार करून द्यावे. कलम.

१ गणपतराव भाऊ पानसे यास व त्याची चीजबस्त घोडे तट्टू कारकून मंडळी शागीर्दपेशा झाडून पार करून द्यावे.

१ गावातील कारकून हाजरनीस सिबंदी किल्यात चाकरीस होते ते किल्यातून बाहेर निघोन गावात व परगावी आपलाले घरी मुलखेकर चीजबस्त सुधा राहतील त्यास कौल देऊन हरयेकविसी उपद्रव लागो नये.

१ कौल द्यावयाचे तपसील :

१ गणपतराव भाऊ यास कौल व पत्र :

१ चीजबस्त कारकून व मंडळी सुधा व खासगत पार व्हावयाचा कौल;

१ पुण्यात जाऊन आपले वाड्यात हरयेक जागा राहतील व त्याचे सरंजामाच्या वगैरे पेशजीप्रमाणे बंदोबस्त करून देण्याविसी अलपिस्तन साहेब यास पत्र.

---

१ विसाजी देवराव किलेदार यास कौल व पत्रे :

१ चीजबस्त मंडळीची व खासगतसुधा घेऊन जाण्याविसीचा कौल.

१ पाछापूरचे वतन पेशजीपासून सालगुदस्तपावेतो चालत अल्याप्रो पुढे चालवण्याविसी मामलेदार यासी पत्र.

१ घरची बायेकामुलेमाणसे चीजबस्त व जमी व बंदीस ठेविले आहेत म्हणोन वर्तमान आहे. येविसी मामलेदार याचे नाव पत्र देऊन मोकळे करून स्वाधीन करावे.

१ पुण्यात बाग नवी विहीर खणून केली आहे. आम्हाकडे चालविण्याविसी अलपिष्टनसाहेब यास पत्र द्यावे.

---

४

१ जमादार व लोक वगैरे यांचे नावे कौल की, ज्यास जेथे सोय पडेल तेथे त्याणी राहिले असता उपसर्ग देऊ नये.

१ गणेश नारायेण जोसी कारकून याचे घर मौजे हिडील ता। साळसी येथे आहेत. ते आपले घरी चीजबस्तसुधा जाऊन राहातील. त्यास हरयेकविसी उपसर्ग होऊ नये म्हणोन किल्ले मालवण येथील मामलेदार यास पत्र.

---

४

सदरहूप्रमाणे ठरून कौलपत्र देऊन गोलागोली बंद जाहालयापासून साहा प्रहरात किला हवाला करून बाहेर निघोन जाऊ.

येणेप्रमाणे पाच कलमे.

इंग्रजी हरफ.[1]

¶ *This paper mentions the terms of capitulation agreed to between the British commander and the defenders of the fort of Sholapur, Ganapatrao Panse and Visaji Devrao Deshpande of Pachhapur. The siege of Sholapur was a memorable event of the last Maratha War and has been graphically described in these papers.*

---

[ १ हर्फ ; हरफ=अक्षर ; लेख. ]

7177

No. 212] [14-5-1818

तेरीख १७ माहे मे सन १८१८
ईसवी मुा छ ११ रजब

श्री

हजरत खुदावंदन्यामत सरदार अली
शान खुदायगा नवाब साहेब बाबल-
बाहादूर याचे खिजमतीत.

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाटबंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बजा आऊरदे मारूज मे रसानद आके. येथील खैरसला अखबार देवटी मुा मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ १४ माहे मे सन १८१८ इसवी मुताईक छ ८ माहे रजब सन १२३३ रोज गुरुवार पाा येथास्थित असो विशेष. इकडील माार लस्करातील आ(ख)बार शोध आनविला. त्यास आपल्याकडील

१ सरदार लोक व साहेब लोक व हजरत खुदावंद जनेल[1] तामस मंडरोले साहेबसुधा खुशाल आहेत. रविवारचे लढाईतच काही लोक पडले ते मात्र पडले. आलीकडे काही (लो)क बहुतरो पडले नाहीत. पाटीमी पेठ टाकून गाव हास्तगत करून कौल देऊन किल्यानजीक जाऊन मोर्चे लावले आहेत. लढाई चालिली आहे. किल्याकडील जमा(व) बाहीर काही नाही. आत पाच साहा हजार लोकाचा जमाव सांगतात. कलम

१ श्रीमंताकडील माार आशेरास दाखल जाहाले म्हणोन बोलतात. तिकडील पत्र आले ते आपले लस्करात सापडले म्हणोन बोलतात. त्यावरून शं पनास तुरूप कामगारीस जरूर पाा म्हणोन बातमी कलली. बाजार आवाई बोलतात की वैशाख आखेरीस आम्ही येऊन पोहोचतो म्हणोन लिा होते. रूमचे पातशाहाकडील तीन दस्ते फौज कुमकेस आली आहे व होलकराकडील दोन कंपू सामील जाहाले आहेत. याप्रो जेण वदंता उठली आहे. कलम

१ राा रामचंद्र व्यंकटेश सुभेदार तुलजापुराचे पलाड च्यार मजली आले आहेत. सोलापुरास येणार म्हणोन आवाई बोलतात. कलम

१ छ १३ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशल. खुशालीचे साहेब लोकाचे वर्तमाण एकिले म्हणोन जरूर बातमी पोहोचावी याकरिता लखोट्यास घागरी बांधली आहे. रागास न यावे. कलम

सदरहू कलम साहेबाचे खिजमतीत लिा आहेत. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*This is a news-letter from Mangalvedhe by Balwantrao Bapuji communicating the fighting at Sholapur and the movements of Bajirao.*

1 General Thomas Munro.

No. 213] [Recd. 14-5-1818

तारीख छ १४ माहे मे सन १८१८
इसवी मुा छ ८ रजब.

श्री

खुदावंद न्यामत खुदायेगाण साो आल-
फिष्टीन साो मदीलहुल.

साोर्चा खिजमतीस येशवंत बाबूराव टपा तुळजापूर सलाम खुा सलाम आंकी. येथील खैर सला जाणोन साहेबी आपली खैयेर हमेशा लिा गेले पाहिजे. दिगर मार हजरत जरनेर मकुरर साो याणी छ मार्गे रात्री सोलापुरावर हला चढऊन पेठ घेतली. मणुसहि जाया जाले. रा गनपतराव पानसे याजला जखम लागली. घोडाहि पडला. पानसे माार यांचे मणुस आरब वगैरे फार पडले. जरनेर मकुर साहेब याणी पेठत येक वाडा बलकाविला आहे. पानसे याचे कडील घोडेस्वार जे श्रीमंताकडील आले ते झाडून पळाले. पानसे मात्र येकला किल्यावर गेला येस बातमी आली. आज तोफखाना सोलापुराबाहेर त्याचा आहे. येणेप्रो वर्तमान जाले ते सोास लेहून पा. साा कलाव हे कितावद.

¶*News about the fighting at Sholapur is sent by Yashwant Baburao to Elphinstone.*

---

No. 214] [15-5-1818

तेरीख १९ माहे मे सन
१८१८ इसवी मुतार्बीक
छ १३ रजब.

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान
खुदायगा नवाबसाहेब बालबाहादुर याचे खिजमतीन

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बाबूजी बादवंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बाज्या आऊर दे मारूज मे रसानद आके येथील खैरसला. अखबार देवढी मुा मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर तेाा छ १५ माहे मे सन १८१८ इसवी मुताईक छ ९ माहे रजेब सन १२३३ रोज शुक्रवारपो येथास्थित असो विशेष. इकडील मार :

१ जेऊरचे टप्याकडोन वरधी आली :
  १ आपल्याकडील पलटण आले ती बोलवा तो
    १ पानाचे निंबगावाकडे येक म्हणोन.

१ परांड्याकडे च्यार पलटण व मोगलाकडील दोन हजार फौज म्हणोन बोलवा आहे,

१ पेडगावाकडे तीन च्यार पलटणे म्हणोन बोलवा आहे.

---

१ गोखल्याकडील तीनच्यार हजार फौज मौजे वासीम टप्याचे गावावरून इंदापुराकडे गेले. काही फौज बारसीकडेहि आली म्हणोन बोलवा आहे.

१ रो भगवंतराव निा पिंगले यांणी मौजे निंबगाव लुटले. तीनशे स्वार व दोनशे पायेदल होते म्हणोन वरधी आली.

१ दुलेखान याजकडील सरंजाम वांगीवर होता तो कोरटीकडे गेला म्हणोन वरधी.

---

१ तोफखान्याचा पल पंढरीस जरमी वगैरे पायेदल दोनीक हजार व स्वार च्यारपाचशे ऐशे पंढरीस छ १३ तारखीस येऊन राहिले होते.

१ सातारियाकडोन पंढरीस ठाण्याकरिता च्यार कारकून व तीस आा सिपाई छ १३ तारखीस येऊन दाखल जाहाले.

१ प्रथम पंढरीस आपल्याडील ठाणेदार आले होते त्याणी बडव्यास बोलाऊन हुकूम केला. देवाचे डागिणे काये आहेत ते व वस्त्र व मिलकत व श्रीमंताकडोन काये पावत ते व खर्च ऐशे लेहून देणे. बडवे याणी उतर केले, आमचा मुखत्यार आहे तो पुण्यास गेला आहे.

१ हजरत खुदावंद जरनेल तामस मंडरोलसाहेब यासहि अखबार रवाना केली आशे.

१ छ ३ तारखीचे खत व माहे आपरेल महिन्याचे पगारा बाा हुंडी रवाना केली ती छ १४ तारखीस येऊन दाखल जाले. मुदत प्राा ऐवज पावेल.

१ सातारियाहून जाहीरनामा. श्रीमंताचे बरोबरची फौज दाणादाण होऊन देसी लोक आपले घरी आले ते व येणार व राहिले त्याची चौकसी गावोगाव करून बातमी कलवीत आसावी व बंडाचे बरोबरचे लोक व मुलूक लुटणार याची बातमी कलवीत आसावी म्हणोन हुकूम आला छ ६ तेरखीस खत रवाना केले ते छ १४ तारखीस दाखल जाले. हुकुमाप्राो करितो. पुण्यास व आमचे नजीक जिल्हेस लस्कर येतील त्यास व सा * * यास कलवावे म्हणोनहि लिाो आले.

१ गो वामणराव आपटे याची घोडी काशेगावचे ठाण्यात पहेल होती त्यावर आपल्याकडील ठाणे बसले म्हणोन घोडी पंढरीस होती. चंदी आनावयाकरिता मातानदार मौजे मेलवडीस घेऊन गेला तेथून उधळून ठाण्यात गेली. तेथून ती घोडी सांगोल्याचे ठाण्यास पाठविली. घोडी मातबर होती म्हणोन बातमी कळली.

१ सोलापूरचे लस्करपो दोघे साहेब लोक व पनास पाऊणशे स्वार व च्यारशें साडेच्यारशें बैल व काही सिपाई लोक जाऊन पंढरीस उतरले आहेत म्हणोन बातमी आली.

१ पुण्याकडोन दारूगोळीचे बैल व आपल्याकडील काही सरंजाम दोनतीन कोसावर आले आहेत म्हणोन पंढरीकडील बातमी आली.

---

मदरहू कलम साहेबाचे खिजमतीत लिो आहेत. छ १४ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशेल. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*The news mainly concerning the dispersion of Maratha armies that Balwantrao Bapuji received through his agents from Jeur, Satara, Pandharpur, Sholapur, etc., is reported by him to Elphinstone.*

---

*No. 215*] [*16-5-1818*

तारीख १८ माहे मे सन
१८१८ इसवी मुताबीक
छ १२ रजब.

**हुर.**

**अजम आक्रम हनरबल मौंट इस्त्वारिट**
**इलफिसनन साहेब बाहादुर दाम मोहबत हू**

साहेब खुषवख्त मेहेरबान कदरदान नियाजमदा आजनिश आजमेद रंगो वासुदेव सलाम बाजद सलाम आंकी येथील खैर आफियत तारीख छ १० रजब-पावेतो साहेबाचे येकबालेकरून मुा कसबे फलटण येथे खैर आसो. दिगर छ ८ रजबचे पत्र पाठविले ते आतांच पावले. हुकूम बमोजीब रा जानराव नाईक निंबालकर याचे वाड्यापुढील पाहारे उठविले. ठाणे व कसबा त्याचे हवाली करणे म्हणोन आज्ञा; त्यास, कसब्याखेरीज ठाणे नाहीं. कसब्यांस वेसी व

गावकुसू आहे. जानराव नाईक आद्याप आले नाहीत. आले म्हणजे हुकमाप्रो करीन. सातारियाहून हुकूम आला जे, निग नदीस पूल आहे त्याचे बाजूस दक्षणेचे आंगे उचवटा आहे तेथे चौकी ठेवावयाची आहे. त्यास तुम्हापासी सिबंदी आहे त्यापौ पंचवीस आसामी तेथे पाठवावे. त्याप्रो आज रवाना करितो. हुकमाप्रो माहालचा बंदोबस्त येथास्थित आहे. ज्यादा काय लिहिणें, प्यार मोहबत कीजे, हे किताबत.

*¶Rango Vasudev writes to Elphinstone about the return of Janrao Naik Nimbalkar to Phaltan and reports how he was executing the several tasks that were entrusted to him.*

---

*No 216]* *[17-5-1818*

**अजम आक्रम हसमाबल मोट इष्टवाग्टि**
**इलफिसतन साहेब बाहादूर दाम मोहबत हू.**

ॐ साहेब खुपवक्त मेहरबान कदरदान नियाजमंदा आजनिया आजमंद रंगो वासुदेव सलाम बाजद सलाम आंकी येथील खैर आफियत तारीख छ ११ रजबपावेतो कसबे फलटण येथे साहेबाचे नेक नजरेकरून खैर असो दिगर-इकडील मजकूराची विनंती ऐसीजे. रा जानराव नाईक निंबालकर ठाणे का। मजकूरी आज प्रात:कालचे च्यार घटका दिवसास येऊन दाखल जाहाले. बरोबर सरंजाम स्वार आसामी पन्नास व उंट नफर पंधरा व हत्ती नग येक व पडताळाची तटे व शागीर्दपेशाची माणसे त्यात काही हत्यारबंद व काही गुली याप्रो येऊन पोचले. साहेबी हुकूमपत्र छ ८ रजबचे आले ते काल येऊन दाखल जाहाले. हुकूम बमोजिम केल्याचा सविस्तर कालचे पत्री बजिनस आलादा पो आहे त्याजवरून ध्यानात येईल. सातारियाहून हुकूम आला, जे बाजीरावसाहेब याजबरो-बरची फौज चौतर्फा उधलोन गेली. त्यास तुमचे परगणेयात गावगना झाडा काढून लिहून पा. त्याजवरून गावगना चौकसी करून शोध आणऊन सातारियास लिहून पा आहे. सिलेदार व बारगीर अजमासे आठशेची टीप परत आली आहेत. ज्यादा काय लिहिणे. प्यार मोहबत कीजे हे किताबत.

*¶This is a news-letter from Rango Vasudeo to Elphinstone, reporting the arrival of Janrao Nimbalkar at Phaltan and that of the dispersed Maratha armies.*

7182

No. 217] [18-5-1818

तारीख २१ माहे मे सन १८१८
इसवी मुतावीक छ १९ रजब

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान
खुदायतगा नवाबसाहेब बाळबाहादुर या-
चे खिजमतीत.

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाव तसलीमात कुरनिशात बज्याआऊरदे मारूज मे रसानद आंके. येथील खैरसला अखबार देवदी मुकाम मंगळवेढ नजीक श्रीपंढरपूर ता। छ १८ माहे मे सन १८१८ इसवी मुताबीक छ १२ माहे रजेब सन १२३३ रोज सोमवार पा। येथास्थित असो विशेष. इकडील मार.

१ रा। इसाजीपंत गोखले च्याळीस पनास स्वार नगारानिशानसुधा छ १६ तरखीस दाहावे तास्मी कूच करून पंढरीचे मुकामास गेले. पुण्या-कडे जातो म्हणोन बोलत होते. निवंतसमई रा। चिंतामणराव आपा याची * * * * *

१ हजरत जरनेर तामस मंडरोलसाहेब यास छ १ तरखीचे मारार्ची अखबार व हालीचे माराची अखबार लस्करात रवाना केली आहे.

१ रा। गणपतराव पानशे व किलेदार यांणी किला खाली करून देऊन काल मौजे डोळच येथे येऊन उतरले आहेत. येथे आज येणार म्हणोन बोलवा आहे.

१ आपले लस्कर व सरदारसुधा काल सिना नदीचे काठी मौजे तिरसांगीलीवर उतरले आहे. आज मौजे करमाल्याचे येथे जाणार म्हणोन बोलत होते. किल्यात दोनशे सरंजाम ठेविला आहे. गावचे देशमुख व देशपांडे पा। शेख यास पागोटे बांधून लाऊन करार देऊन निघाले. दारूगोल्याचे बैल येऊन पोहोचले.

१ छ १६ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशल.

सदरहू मार साहेबाचे खिजमतीत लि॥ आहेत. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*Visajipant Gokhale has gone towards Pandharpur with a few stragglers, reports Balwantrao Bapuji along with the movements of the English and the Peshwa's armies.*

*No. 218*] [*18-5-1818*

पो तरीख २४ माहे मे
सन १८१८ इसवी मुताबीक
छ १८ रजब.

श्री

HONOURED SIR,

साहेबाचे शेवेसी रावजी बाळाजी मुा नरबदातीर सलाम आज विनंती विज्ञापना विशेष. श्रीमंत बाजीराव याची स्वारी धुलकोट बारीस येऊन पडली आहे. बरोबर रामदीन, त्रिंबकजी वगैरा सरदार आहेत. आसेरीचे किलेदार भेटीस जाऊन माघारे आले व श्रीमंताकडून येक वकील राजश्री आनंदराव चाळीस स्वारानसी जनराल मालकम साहेबाकडेस गेले. त्याचा मुकाम छ १६ नरबदेवर होता व रास्ते सावदे येथे आहेत. त्यानी ब्रिग साहेबाकडील ठाणे बसू दिल्हे नाहीं. दुसरे वर्तमान काही नाही. सेवका(व)र पहिल्याप्रमाणेच ममता आसावी. बहुत काय लिा हे विज्ञापना.

Honoured Sir,
Your most obedient humble servant,
18th May 1818. Roujee Ballajee.

¶*Raoji Balaji sends news of Bajirao having arrived at Dhulkot and making approaches to Malcolm.*

---

*No. 219*] [*19-5-1818*

तरीख १९ माहे मे सन १८१८
इसवी मुताबीक छ १३ रजब

श्री

**खुदावंत न्यामद खुदायगाण सा**
**आलफिंस्टीन सो म म दी ल हू ल**

६ खिजमतगार येशवंत बाबूराव राार तुळजापूर सलाम अंकी येथील खयेर जाणून साहेबी आपली खयेर हमेशा लिा गेले पाहिजे विशेष. छ १४ तारखीस जरनेर[1] मनरोल साहेबाणी किल्यावर काही लयेन पाठविली होती. आज छ १५ रोजी शनवारी किलेदार व पानसे सिबबंदी जासूद प्राथकाली उतरून बाहेर

---

1 General Munro.

निघाले. त्याचे बरोबर साहेबाणी दुलेखान नवाब याचा सर्मजाम देऊन सिनानदीपार करून दिल्हा. त्या साहेब किल्यावर जाऊन निशाण चढविले. साहेबाची फते जाली. हे किताबद.

¶*Yashvant Baburao reports to Elphinstone the capture of the fort of Sholapur by Munro.*

---

*No. 220*] [*20-5-1818*

तराख माहे मे १८१८
इसवी मुा छ १९ रजब

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अली-
शानें खुदायगा नवाबसाहेब बलबा-
हादुर याचे खिजमतीन अर्जे

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाखंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बज्याआऊरदे मारूज मे रसानद आके येथील खैर सल्ला अखबार दवदी मुा मंगलवेढ नजीक श्री पंढरपूर ताा छ २० माहे मे सन १८१८ इसवी मुताईक छ १४ माहे रजेब सन १२३३ रोज बुधवार पोा येथास्थित आसो इकडील मार

१ रोा सर्जेराव घाटगे येथे आहेत. त्याणी तिकडोन पळून येतसमई रोा रुद्रापा इंगवला मौजे बनपुरीकर हाहि लस्करात गेला होता. तो याचे सोबतीन वैरागापरियेंत आला. पुढे येका कोसावर रानात चीजवस्त व घोडी १ येक ऐस घाटगे याणी लुटून घेतले. त्याजला म्हणतो तुझी फिरयाद लागेल तिकडे त्यास जाव ऐसे बोलतो. त्यास मासणूर तालुका आपला तेव्हा या गरिबाची दाद कोठे लागती. घोडी त्याचे घरचीहि नाही. त्याणे दुसऱ्याची आरधेलीन नेली होती. त्यास आता भवताली तालुके आपले तेव्हा कितेक प्रकारचे बोभाट पडतील.

१ रोा गोपालपंत गाडगील याचा मार लस्करात लिा होता, त्यावरून हुकूम आला की त्याचा शोध करावा तर हुकूम येण्यास आवकाश लागला. ते निघाले मिरजेकडे गेले म्हणौन सोध लागला.

१ रोा चिंतामणराव आपा यास पत्र पोा म्हणौन लस्करात लिा होते. तेथील लिा आले की आम्ही शोध घेतला तर सांगणारानी सांगितले की

जरी वकिलाचे लिा आले तरी तुम्हास सांगणार नाहींत. बुध्या तुम्ही पत्र आणून लावल्याखेरीज काम चालते होत नाही. याकरिता लस्करात आणखी लिा की पत्र आम्हाकडे पा. यावर मर्जी.

१ छ १८ छ १९ तारखेचा स्वार लस्करात लेहून पाठविला.

१ छ १९ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशल.

स्वार साहेबाचे खजमतीत लिा आहे. हजरत जरनेल साहेबाचा मुकाम कालचा मौजे मुडवेचा होता आज तावसीचे सुमार जाणार म्हणोन बोलत होते व काही लस्कर सोलापुराहूनच इन्दापुराकडे रवाना जाले. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*Balwantrao Bapuji a news-writer reports to Elphinstone several items of news, referring to Sarjerao Ghatge having plundered Rudrappa, of Gopalrao Godgil having gone to Miraj and of other persons.*

---

*No. 221*] [*About 21-5-1818*

नकल

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**नीलकंठराव आबा स्वामीचे सेवेसी**

पो। बाळाजी नारायण नातू सा। नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ ५ रजब जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. परंजी आपले पत्र आले व राजश्री विठलपंत भाऊ याणी आपल्याकडील निखालसतेविसी साहेबाजवळ बहुत खातरजमा केली व आपण राजश्री पांडुरंगपंत अत्रे यास पा। त्याची साहेबाची समक्ष गाठ पडून बोलणी जाली ती त्याणी लिहिलीच आसतील. सर्व आर्थ ध्यानात आणोन फौज येण्याचे पूर्वी आपण हे बोलणे लाविले याणे बहुत चांगले जाले. राजश्री आणा टिलक लस्करातून आले ते आपलेकडे येत आहेत त्याणी हाली (लि)हिल्यावरून कळले. साहेबाचे मनात कोण्हास उपद्रव करावा असे नाही. राजश्री गोविंदपंत आन्यास आपण किला खाली करून न दिल्ह्यामुळे उपद्रव * * तोही दूर होईल. काळजी करू नये. किला हवाली करण्यास येक घटकेचा विलंब न करितां खाली उतरोन हवाली करून म्हणजे साहेबाची मर्जीचा बहुत संतोष होईल. याणे पुढे तुम्हासच उपयोग आहे. घर वतन माल वगैरे यास काही येक उपद्रव होणार नाही. पत्रात लिा त्याजवर दृढ निश्चय ठेवावा. कोणतीहि कल्पना घेत बसू नये. राहातेकर याचे वर्तमान

समजलेच असेल. सारांष इकडून वाकड कोणाचें व्हावें ही इछा नाही. काग आचरण वाकडे व्हावें असें करूं लागलीयास मग करावें लागत नाही. आग किले हवाली करून आला असता कोणताहि उपद्र(व) न लागतां पुढे राजश्री जनोबा भाऊ आलियावर बोलण्यास बरें पडेल. विस्तार काय ल्याहावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

¶*Balaji Narayan Natu writes to Nilkanthrao Aba Purandare suggesting to him a line of conduct to be adopted in furthering his own interests. The fort—says the writer—should be evacuated and handed over to the English. The writer gives him assurances of lenient treatment from the English.*

---

*No. 222]* *[21-5-1818*

मोहर दाखेची नकल

श्री

साहेब मेहरबां नीलकंठराव नारायण

सलामत

ऽ आर्जी नवाब बाहादुर सलाम आंक दिगर. किले प्रतापगड व मकरंदगड हे दोन किले चिचूरकर यांचे तर्फेने आहेत. ते तुम्ही कंपनी सरकारात देणार येविसी बोलण्यास आजम विठलपंत बा(वा?)कील व पांडुरंगपंत आत्रे यास तुम्ही पाठविले. त्याचे बोलणे किले कंपनी सरकारात हवाली करितां, परंतु काही येक उपद्रव न लगे येविसी पत्र आसावे त्याजवरून लिा असे. तरी विठलपंत राजश्रीवर कंपनी सरकारचे सरदार किले हवाली करून घ्यावयाकरितां रवाना होत आहेत. हे किल्यानजीक येऊन पोहचताच तुम्ही आपली व सिपाई लोकाची चीजवस्त व हत्यार खासगत आसतील ती घेऊन किल्याखाली उतरोन किले कंपनी सरकारचे सरदाराचे हवाली करावे. बाजीरावसाहेब व त्याचे तर्फेचे लोकाची चीजवस्त आसल ती आफरातफरी न करितां किल्यावर कायम ठेवावी. याप्रो तुम्ही केले म्हणजे तुमचें वतन व माल यास हरयेकविसी उपद्रव कंपनी सरकारातून होणार नाही. तुम्ही कुटुंबमुा बेवसवसा आपले घरी राहावे. रा तारीख २१ माहे मे सन १८१८ इसवी मुा छ २१ रजब मुा समान आसेर मयातैन व आलफ

इंग्रेजी हरप लिा आहेत.

¶*Nilkanthrao Narayan is asked to evacuate the two forts Pratapgad and Makarandgad and deliver them to the Company's officers. He is also given assurances of safety and good treatment during good behaviour.*

7187

*No. 223]* *[22-5-1818*

तारिख १ माहे सन १८१८
ईसवी मुताबिक छ २६ रजब

श्री

आखबार सुभे खानदेश सरहद मथावार(?) तापी तीर बऱ्हाणपूर येथील वृत. कपतान हाजी साहेब बाहादूर व मीर फजलआलीखा बाहादूर यैसे उभयेता सावद्यावर आहेत व कपतान ज्यान बिरगसाहिब बाहादूर मालेगावांस मोर्चे लाऊन आहेत. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब आसेर पलीकडे बोरगांव साता कोसावर आहे तेथे मुकाम करून आहेत. आरबाचे बंड तोरखेडे कोपर्लेकडे होते, ते रेणीसाहेब बाहादूर याणी सिंदखेडे येथे लडाया करून पिटून घातले. ते आमलनेरकर आरब आली जमातदार याजकडे येऊन डांगरी पोची गांवे मारून दोन मुकाम करून लोदेवरून चोपडयाकडे गेले. पुढे श्रीमंताकडे बोरगांवावर जाणार. निंबालकर व पंडित याणी काना भील यांस श्रीमंतास भेटविले. या देशाचे पवार पंडित व भोइटे याचे वकील सर्वांचे श्रीमंतापासी आहेत. मीरफज्ल-आलीखा बहादूर व कपतान हाजी साहेब बाहादूर सावद्यावर आहेत. मीर-फजलआलीखान याणी नंदुरबार मुलतानपूर येथे मामलतदार येक मुसलमान तुकू पागया याचा बारगीर होता तो व येक कारकून जालनेकर देशपांड्या व पांच माणसे यैसे पाठविले. त्यासी मार्गात आरबाच्या बंडासी गाठ पडिली, त्याणी धरून नेले. सेवेसी श्रुत होय. रवाना छ २२ माहे म्पे मुकाम पारोले.

¶*This is a news-letter from Khandesh reporting the movements of Bajirao near Asher and the fighting at Malegaon.*

---

*No. 224]* *[3-6-1818*

तेरीख १७ माहे जून सन १८१८
इसवी मुताबिक छ ११ शाबान

श्री

आखबार सुभे खानदेश सरहद मथावार तापी तीर बऱ्हाणपूर येथील वृत. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब धुलकोट येथील पाहाडात स्वार पायेदलसुधा आहेत. त्यासुमारे जरनेल दफटीन साहेब बाहादूर आहेत. पेशजी माजील मामलतदार व सरदार त्याचे आहेत त्याणी श्रीमंत या प्रांती आल्यावर वकील त्याजकडे पाठविले आहेत व कपतान ज्यान बिरगसाहेब बहादूर याजकडेहि मामलती या प्रांताच्या करण्याबदल कारकून येऊन करीत आहेत. मालेगाव आद्याप लडत आहे.

मालेगाव व पारोळे येथील टप्याचे याद्यावरी (?) चैत्रापासून होणार. याविसीची आज्ञा काये ते जाली पाहिजे. सेवेसी शृत होय रवाना छ ३ माहे जून मुकाम पारोले.

¶*News about fighting at Malegaon, of Bajirao's stay at Dhulkot and of the settlement of the country by Briggs, is reported in this letter.*

---

*No. 225*] [*9-6-1818*

छ २१ माह जून सन १८१८
इसवी मुताबीक छ १५
सावान.

श्री

अखबार मुभे खानदेश सरहद मथावार तापी तीर बऱ्हाणपूर येथील वृत: श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब याजकडे जरनेल मालकम साहेब बहादूर याजकडून येक साहेब वकिलीस आले. त्याचे त्याच बोलणे होऊन श्रीमंतानी कूच करून त्याजकडे गेले येसे पत्र जरनेल दफटोण साहेब बाहादूर याचे पत्र कपतान हर साहेब बाहादुर यांस आले. त्यात मजकूर होता तो सेवेसी लिहिला आहे. पांचसे स्वार व दोनसे आरब येसे आसेरकडून येऊन फगन्यावरून मालेगांवाकडे गेले. मालेगांव आद्याप लढत आहे. आहमद आरब व वीस आरब येसे आपले विलायेतास गेले. त्यास येक दसकत व येक चकती सुरतेस कपतान ज्यान ब्रिग साहेब बाहादुर याची देऊन येक हलकारा टप्यापैकी देऊन त्यास पावते करून दिल्हे. मालेगांवचे व येथील टप यास कावर (?) येथून घेत जावें म्हणोन सांगितले. त्यास सरकारची आज्ञा जिकडे कावर (?) घेण्याची येईल तैसे करू. मीर इकरादआली याणीहि सरकारात लिहिलेच आहे. उतराची आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी शुत होय. रवाना छ ९ जून मुकाम पारोले.

¶*News of Bajirao having surrendered to Malcolm and of the fight at Malegaon is sent by the writer from Burhanpur.*

---

*No. 226*] [*11-6-1818*

तरीख १४ माह जून सन
१८१८ इसवी मुताबिक छ ८
साबान

श्री

हजरत खुदावंत न्यामत सरदार अलीशान
खुदायगा नवाब साहेब बालबहादूर याचे
खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलीमात कुरनिशात बज्या आऊरदे मारूज मे रसानद आके येथील खेर सलां अखबार देवडी

मुा मंगळवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ ११ माहे जून सन १८१८ इसवी मुताबीक छ ६ माह साबान सन १२३३ रोज गुरुवार पाो येथास्थित असो विशेष.

१ पंढरीकडोन दोनशे सिपाई दुरगाकडे जाण्याकरिता सोलापुरास जाऊन उतरले ही बातमी दुलखान यास समजताच कूचे करून शेहराकडे गेले. दुरगास ठाणे आपले बसले म्हणौन बोलतात.

१ निपानकराचे तालुक्यापौी तीन गावास ठाणे बसले नाही.

१ कोरकव्यान बसले नाही. १ मौजे आरळी लढती म्हणौन बोलतात.

१ मौजे कसरगीत बसले नाही.

१ सोलापुराहून येथे कारकून यादी घेऊन राा गणपतराव पानशे याजकडे आला होता. कारन सांगणारेन सांगितले की तोफखान्याचा आसबाब सरजाम याचे मारफातीचा याकरिता त्या यादीवर याचे हातची मोहोरा करून घेऊन जाव्या म्हणौन कारकून आला होता. मोहरा करून घेऊन गेला.

१ राा गणपतराव दादा पटवर्धन येका दो दिवसी मांगलीस जाणार म्हणौन बोलतात.

१ नागपुरकर राजे कैदेत होते तेथून गोंडवान येऊन घेऊन गेले म्हणौन आवाई उठली आहे.

१ हैदराबादेकडील आवाई लोक बोलतात. गोंवळकुड्याचा किल्ला इंग्रज खाली करून मागतात.

१ हजरत मंडरोल साहेब धारवाडाकडे गेले. निपाणीवर दोन पलटणे ठेवले. मिरजकर याचे तालुक्यात वसूल पटवर्धणास देऊ नये म्हणौन ताकीद केली. असे लोक बोलतात.

१ पंढरीस नावावर सरकारची डबी बसविली. नावाडीयास दरमाहा द्यावा असे ठरविले म्हणौन बोलतात.

१ गावगंना कतब सातारियास रवाना जाहाले त्यात मार आमचे गावचे कोन्ही गेले नाहीत, पुढे जाणार नाहीत. गेले तर सरकारचे गुणेगार.

7190

१ प्रा काशेगाव

१ मौजे मारापूर

१ मौजे तावसी नेथील

१ कृष्णाजी माणे गेले होते ते चैत्र आखेरीस आले

१ शेटी निकम वारगिरीचे रोजगारास होता. चैत्र आखेरीस आला त्याचा चिरंजीव गर्दीत गेला आला नाही.

—

२

१ मौजे गुंजेगाव

१ मौजे तनाली

—

४

१ का आहीरवाडी तालुका

१ का आहीरवाडी

१ मौजे हातूर

—

२

१ प्रा सोलापूर

१ का सोलापूर

१ मौजे डोनगाव

१ मौजे तलेगाव

१ मौजे मवाट

१ मौजे मंधर

—

५

—

२

१ छ ९ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहचलीच आशल.

१ परवाचे दिवसी आस्तमाणी आकलूजकडोन च्यालीस पनास कानडे सिपाई व तिघे कारकून आपल्याकडीलच काल प्राथःकाली आकलकोटाचे सुमार गेले. ठाणे बसवावयास जातो म्हणोन सांगत होते.

१ पंढरीहून लस्करातून च्यार स्वार येथे कर्णेल साहेबाचा निरोप सांगावयाकरिता रा चिंतामणराव आपाकडे आले होते. कहीचा उपद्रव तालुक्यात होईल म्हणोन कारकून पाा होता, सबब स्वाराहाती निरोप पाठविला. आमचे लस्करचा उपद्रव होणार नाही आणि गोपाळपुरावर आमची छावणी आहे त्यास गाव उज्याड, तेथे छेपर घालितो. वैरन मोल घेतली असता देत जावी.

———

मार साहेबाचे खिजमतीत लिहा आहे. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶*Among the several items of news that Balvantrao Bapuji mentions herein there are some about the activities and movements of the contingents of Panshe, Nipanikar, Munro, etc. The writer also reports the rumour about Appasaheb of Nagpur having escaped from confinement.*

7191

No. 227] [11-6-1818

श्री

जबानी कासी बिन संभाजी जासूद जबानी लिा दिल्ही ऐसीजे. मला सरकारचा लखोटा किले कांगोरीस देऊन रघोजी येवले व भैराळ भाऊ व गुणाजी या त्रिवर्गीनं मिळोन पाठविले. ते समई खर्चास रुपये पाच देऊन मला त्रिवर्गीनी सांगितले की कामगारी बज्याऊन आल्यावर बक्षीस तुझ्या दैवानें मिळेल ते घेणे व दरमाहा रुपये ८ प्रो पावतील. त्याजवरून मी निघोन किले कांगोरीस साहेबाकडे गेलो. परंतु तेथे कागद पोचून जाबसाल हातास आला नाही. किल्यावर दुधापा होता त्यासी ममता लाऊन तेथे चौकीदार कोण आहेत, वर्तमान कसे, याची चौकसी केली. साहेबाजवळ बोलावयाचे जाले नाही व कागदहि पोचला नाही. कागद पोचवावयाचे संधान दुधाप्यास पंचवीस रुा कबूल करून केले होते. इतक्यात किल्यावर बातमी फुटली. किलेकरी मला माग देऊन चोकसी करणार असे समजल्यावर मी पाहाटेस किल्यावरून निघोन मावारा खिवाडीहून घाटाखाली अनछत्राजवळ आलो. तो पुढे कांगोरीकर लोक येऊन खिंड धरून बसले होते. त्याणी मला किल्यावर दुधाप्याचे घरी पाहिले होते. सा तेथे अटकाव केला की दुधाप्याचे घरी सरकारची चौकी बसली त्याचा जाबसाल करून तूं जाणे. असे बोलून मग कांगोरीस मला धरून नेले. बेडी घातली. मग गोखले याचे कागद साहेबास वासोट्यास लावण्याविसी आले त्याजवरून साहेबास वासोट्यास नेले. ते समई तेथील कारकुनास मी बोललो जे मलाहि साहेबाबराबर वासोट्यास लावावे. परंतु मला पाठविले नाही. मागे भरले. त्या ताा मी कैदेत होतो. कांगोरी सरकारात घेतली तव्हा तेथून सुटून अलो. याप्रो माार आहे. तेरीख ६ साबान सुरु तिसाअशर मयातेन अलफ.

¶[One Kasi Jasood narrates the hardships which he had to suffer on his mission to Morrison and Hunter imprisoned at the fort of Kangori where he colluded with Dudhapya, one of the guards was found out and cast into prison.

---

No. 228] [12-6-1818

श्री

आखबार सुभे खानदेश सरहद मथवार तापी तीर बऱ्हाणपूर येथील वृत. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब धुळघाटानजीक सातपुड्या पाहाडात होते. जरनेर दफटीन साहेब बाहादूर बऱ्हाणपुरानजीक लालबागावर आहेत. जरनेल मालकीनसाहेब बाहादूर याजकडून वकिलीस येक साहेब आले त्याचे त्याचे

7192

बोलणे होऊन श्रीमंत कूच करून साहेबाकडे भेटीस गेले. मालकीन साहेबाच्या भेटीही जाहल्या. श्रीमंताबरोबर फौज होती त्यास साहेबानी चकत्या देऊन आपले आपले देसी रवाना केले. ते स्वार काल छ ११ जुनी पागेले यावरून गंगथडी-कडे गेले. कपतान वेर साहेब बाहादूर पारोल्यास मुकाम करून आहेत. त्याणी दवड करून स्वारी गेली, त्याणी चकत्या दाखविल्या तेव्हा जाऊ दिल्हे. मालेगांव आद्याप लढत आहे. सवेर्मी शुभ होय. रवाना छ १२ जून मुकाम पारोले.

*News is reported of Bajirao having surrendered to Malcolm.*

---

*No. 229]* *[15-6-1818*

**श्री**

**हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान**
**खुदायगा नवाब साहेब बहादूर यांचे**
**खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलीमात कुर्नीशात बज्या आऊरदे मारूज मे रसानद आंके. येथील खैरसला अखबार देवडी मुकाम मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर तो छ १५ माहे जून सन १८१८ इसवी मुताबीक छ १० माहे साबान सन १२३३ रोज सोमवारपावेतो यथास्थित असो विशेष मार.

१ गोपालपुरावर साहेबाची तुरबूत चोरानी खोदली होती ते चोर लस्करात धरून आणले आहेत म्हणौन व तुरबुतीस नवे काम लावले आहे म्हणौन येकाने सांगितले.

१ छ ६ तारखीचे खत पो ते छ ११ तारखीस पावले. मार लिहिला की रसीद व याद पाठविली ती पावली. सातारियाहून ऐवज मागऊन घेणे. त्यास हालीचे जासुदासहि बरतर्फी देऊन पंधरा दिवस होऊन गेले. त्याचीहि हुंडी आद्याप आली नाहीच. मागील पो तर रागे भरून लिा तेव्हा उपाये नाही. हजरत जरनेलसाहेब यास अखबार लिहीत जावे म्हणौन हुकूम आला त्याप्रो अखबार लेहून जतस पो. तेथे कारकून आसला तर त्याच वाटेणे रवाना करीत जाऊं. नाही तर पंढरीचे ठाण्यावर अखबार देत जाऊ. पंढरीस जाण्यास मान नदी मधी आहे तेव्हा नदीवाले

+ जुनला. १ थडग, कबर.

पोटास मागंतत तव्हा जबरदस्ती करून नदी पार होत आसावे तर बोभाट पडून जासुदासहि येखादा दगा होईल. तर येविसी काये हुकूम तो यावा. सातारियासहि लिा आहे.

१ निपाणीहून येक ग्रहस्त येथे आला तो सांगत होता देसाई तर कोठे कोणे गावीच आहेत ; परंतु कारभारी व त्याचे स्त्रीसच बोलणे होऊन ठरले की निपाणीचा किल्ला व बारा गाव घेऊन आसावे. खरीज वर्षास लाख रुा खर्चास घेत जावे. वरकड तालुक्यात आपले ठाणे बसऊन हजरत जरनेल मंडरोल साहेब धारवाडास गेले.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब हस्तगत जाले म्हणौन कोन्ही चोरून लपून बोलतात, मग खरेखोटे ईश्वर जाणे. उजागर कोन्ही बोलत नाहीत.

१ रा गणपतराव दादा पटवर्धण सांगलीस जात होते. त्यास येथील ठाण्या-तील रा गणेशपंत फडणीस या उभयताचा कारभारसंमधी कजिया लागला आहे. उरूबुरू बोलणे रा चिंतामणराव आपा याचे होत आसतत. हे काही बोलत नाहीत. यामुळे त्याचे राहाणे जालेसे दिसते.

१ छ ११ तारखेची अखबार त्याना केली ती येऊन पोहोचलीच आसेल. तूर्त नवल विशेष काही नाही.

१ तालुके मंगलवेढे येथील दोन गावचे कतव आले. तर त्यात आमचे गावचे कोन्ही गेले नाहीत म्हणौनच लिा आले. त्यात मौजे नंदूर येथे चौकसी करीत पुढे जासूद हालसंगी तालुक्यात गेला. नंदूरकर याणी पत्र येथे फडणिसास लिा. त्याणी कारकूण आम्हाकडे पाठविला. रा आपा-साहेबाचे नावे पत्र आले म्हणजे आपण चौकसी करावी तर येविसी काये हुकूम तो यावा. मौजे भालेवाडी व मौजे डोनज

मार साहबाचे खिजमतीत लिा आहे. बंदगीस रोशन होय हे अर्जदास्त.

¶[*News about Appa Desai of Nipani, Patwardhan and the rumoured submission of Bajirao is reported by Balwantrao Bapuji.*

---

*No. 230*] [*19-6-1818*

तरीख २७ माहे जुलई

इसवी मुताबिक छ २१ माहे साबान

**श्री**

आखबार सुभे खानदेश सरहद मथावार तापीतीर बऱ्हाणपूर येथील वृत. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब जरनेर मालकनसाहेब बाहादूर याजकडे गेले

आणि वरकड सरदार विंचूरकर यास रजा दिल्ही ते दोन तीनसे सरंजामासुधा म्हसव्यावर येऊन मुकाम करून छ १७ जुनी आले व पुरंदरेहि मागाहून नसिराबादे-कडे आले. सरंजाम हजारदावेतो समागमे आहेत. साहेबाची दस्कत त्याजसमागमे आहेत. मीर फजलआलीखा याचे चिरंजीव शंभर स्वारानिसी पारोळे येथे आले आहेत व कपतान केर साहेब बाहादूर पुरण्याचे स्वार दीड हजारानिसी देवगांव पो बहाल येथे मुकाम करून आहेत व कपतान हेर साहेबहि सरंजामसुधा पारोळे मुकामीच आहेत. येथून पेशजी चकत्या सरकारात पाठविल्या ती जोडी मार्गात भिल्लानी दोलीगाव पो बाहाल येथे लुटून घेतले. कर्णल मकडोन साहेब बाहादूर यांणी होळकर याच्या लक्ष्या दाहा मागविल्या होत्या त्याहि लुटल्या गेल्या व कागदपत्रहि गेले. जरनेल दफटीन साहेब बाहादूर देवळस गांव जालन्याच्या मार्गी गेले. वरकड कपतान ज्यान ब्रिग्ग साहेब बाहादूर फौज सरंजाम सुधा मालेगावीच आहेत. पुढे आमळनेरगावर शह आहे. तिसरा महिना माहावरास होता आला आद्याप मिळाला नाही व पेशजी मी लिहिले आहे त्याचा हुकूम काय तोहि आज्ञा यावी तैसे करीन * * स्वामीच्या चरणावर लक्ष ठेऊन आहे. सेवेसी श्रुत होय. रवाना छ १९ माहे जून मुकाम पारोळे.

¶ *The movements of some of Bajirao's Sardars subsequent to the latter's submission to Malcolm are given by this news-writer. The letter also refers to the raiding activities of the Bhils.*

---

*No. 231]* *[23-6-1818*

तारीख २९ माहे जून सन
१८१८ ईसवी मुताबीक छ २२
साबान

**श्री**

आखबार सुभा खानदेश सरहद मथावार तापीतीर बऱ्हाणपूर येथील वृत श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब जरनेर मालकम साहेबासमागमे नरमदापार गेले. विंचूरकर घाटाकडे दक्षण देशास गेले. त्याचे मागे रा आबा पुरंदरेहि छ २० माहे जुनी येथे मुकामास आले तेहि दक्षणेकडेच गेले व आबा वानवळे यास समाधान नाही म्हणौन पारोळे येथे राहिले आहे. आराम जालियावर तेहि देसी जातील. कपतान ब्रीतसाहेब बाहादूर नसिराबादेकडे आहेत. कपतान बेर-साहेब बाहादूर औरंगाबादेकडे गेले व जरनेर दफटन साहेब बाहादूर फरदापुराकडे

गेले. मीर कालूखा बाहादूर पारोले येथे होते ते कपतान ज्यान ब्रिगसाहेब बाहादूर याणी मालेगावी बोलाऊन घेतले. भिलानी या प्रांती दुंदी केली आहे. सरकारच्या पारोले याचे टप्याचे दोन हलकारे मौजे ढोली पो बाहाल येथे लुटून घेतले. त्यास मीर फजल आलीखा बाहादूर यास सरकारची चकनी आली तर भिलाचा शोध करून धरून आणून वस्तभाव घेतली जाईल. आमचे सांगितल्यावर ते भिलास धरून आणून हालकर याची वस्तभाव आणवीत नाहीत यास्तव सेवेसी लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय. रवाना छ २३ माहे जून मुकाम पारोले.

¶*The movements of Bajirao after his surrender and the encampments and halts of some Maratha and English generals are given in this news-letter.*

---

*No. 232*] [*25-6-1818*

श्री

HONOURED SIR,

. साहेबाचे शेवेसी रावजी बालाजी मुा कसबे रावेर नजीक बराणपूर दोन्ही कर जोडून सलाम आर्ज विनती विज्ञापना ताा छ २९ माहे जूनपावेतो साहेबाचे महेरबानगी करून सुखरूप आसो विशेष. गतवरसी साहेबानी खेडीघाटचे डाकेचा बंदोबस्ताकरिता पाठविले त्या दिवसापासून ह्याच मुलखात बंदोबस्त करून आहे. काही येक दिवस जाले, हजरत ब्रिगसाहेब याजबरोबर उजेनी-पावेतो गेलो होतो. नंतरी येऊन बराणपुरी राहिलो होतो. तेथे डाकेची चाकरी वगैरा बहुत चांगली केली. हजरत ब्रिगसाहेब यानी महेरबान होऊन छ २ जूनचे दिवसी रावेर माहाल येथील आवल मागितली आहे. तेथे ठाणे घालून बंदोबस्त करून आहे व डाकेचेहि कामकाज बराणपूरचे करीत आसतो. रावेर बराणपुरापासून साहा कोस आहे. रावेराहूनच डाक बराणपुरास जाती व इकडून पुन्यास रवाना होती. साहेबाचा पूर्वत ममता आहे तेसीच शेवकावर आसावी. सर्वासी+ साहेबाचे पदरचा आहे. साहेबाची स्वारी इकडेस येणार हे ऐकूण फार आनद जाला. साहिबाचे चेरण कधी पाहीण ऐसे जाले आहे. खेडीघाटाहून बराणपुरास पेसजी राहावयाचे कारण की साहेब लोकाची लस्कर आली त्याज-वेळपासून ते आज ताा इंग्रजी कामकाज डाक रवाना करावयाचे पडू लागले याजकरिता राहिलो होतो. खेडीस काही काम फार नाही. तेथेहि कारकूण

+ सर्वांशीं.

आमचा चुलत बंधु ठेविला आहे. मी साहेबाचे शेवेसी मागेहि फार पत्रे पाठविली. साहेबांनी मेहरबान होऊन पत्राचे उत्तर पाठवावे. बहुत काय लिा हे विज्ञापना.

Honoured Sir,

Your most obedient, humble and faithful servant,

Raver,
near Boorhanpoor,
25th June 1818.

Ravji Balaji,
Poona Post Of......

¶*Raoji Balaji reports from Raver how faithfully he has been serving in the duty assigned to him, of despatching post and providing supplies, etc.*

---

*No. 233]* *[28-6-1818*

श्री

आयवार सुभे खानदेश सरहद मथावार तापीतीर बऱ्हाणपूर येथील वृत. श्रीमंताकडून नाना पुरंदर व आणा हमंदरे ऐसे उभयेता आले ते पुढें देसी आज येथून गेले. भिलाचा उपद्रव येथे बहुत आहे याचा बंदोबस्त व्हावा. राजश्री भया राजेबाहादुर याजकडील आमळनेरकर आरब आली यांणी तरा उपोषण राजेबाहादुर यास करऊन जबरदस्तीने पासष्ट हजार रुपयांची चिठी लेहून घेतली. आन आडीचसे आरब नवे याचा तैनातजाबता जबरदस्तीने लेहून घेतला आहे. कपतान केरसाहेब बाहादूर आज छ २७ माहे जुनी धरणगांवास गेले. समागमे च्यार कंपिनी व दोन तोफा, पांचसे स्वार मोगलाई ऐसा सरंजाम होता. नपेन पाज [?] आरब श्रीमंताकडून च्यारसे आले ते येथे मुकामास आहेत. त्याजपैकी दोनसे परभारा आमळनेरास गेले व दोसे येथे आले. बोरपडे याचा खिजमतगार पळाला त्याचा शोध आरबी पाा भुळे येथवर लागला. आलीकडे लागला नाही. शोध लागल्यास लेहून पाठवीन. मार्जाल कमावीसदार याजकडे मामलती सांगतात. ते रयेतीस नाना प्रकारें इजा देतात. ढंगले मोल्हरचे किल्यात आहेत ऐसी बातमी येकिल्यात आली आहे. सेवेसी श्रुत होये. रवाना छ २८ माहे जून मुकाम पारोले.

¶*This is a news-letter reporting dissolution of Bajirao's army. The Arab troubles are also referred to.*

No. 234] [28-6-1818

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान खुदायगा
नवाबसाहेब बलबहादुर यांचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बाज्या आऊर दे मारूज मे रसानद आके येथील मेहरबानगी अखबार देवटी मुा मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर ता छ २८ माहे जून सन १८१८ इसवी मुताबीक छ २३ माहे साबान सन १२३३ रोज रविवारपो यथास्थित असे विशेष. इकडील सार :—

१ हजरत कर्णेल बेलसाहेब याचा निरोप आला. रा चिंतामणराव आपा याजपासी जमेत काय आहे व जरबर्मी सोलापूरचे लढाईबदल किती आहेत चौकसी करून लेहून पो त्यावरून चौकसी केली.

१ रा चिंतामणराव आपा याजकडील जमेत :—

१ घोडस्वार व्हाहानमोठ पनास साठ आहेत.

१ स्वारीबरोबरचे परदेसी लोक पनास साठ.

१ खेरीज सिपाइ मऱ्हाठ, मुसलमाण, शागीर्दपेशाचे मणुशे पनास च्यार्लीस आहेत.

१ उंट दाहा पंधरा व हातीं येक लंगडा आहे. बाकीचे च्यार हातीं व दाहाबारा उंट व पनास पाऊणशे स्वार चिरंजीव त्यांचे सांगलीस गेले तेव्हा बरोबर गेले. उंट शेसवाशे बारडोल तालुक्यात चारनीस गेले आहेत.

१ रा आबा जमखंडीकर किलेदार यांचे मारफातीचे स्वा घोडे तीनच्यार आहेत व काटक लोक किल्याचे रखवालीस सरासरी शंभरीक आहेत. सिवाये काटक बिननवकर पनासीक आहेत. पहिले नवकर होते व आता शेतवाडी करून आहेत. खेरीज वेसीवरील व चावडीवर व देवढीवर मऱ्हाठे, मुसलमान सरासरी च्यार्लीसपनास आहेत.

१ खेरीज किल्यात ब्राम्हण मंडली यांचे घोडे आहेत.

१ रामराव काले यांचे घरचे घोडे च्यारपाच.

१ बाळाजीपंत म्हैसकर याचे तीनच्यार घोडे.

१ कृष्णराव पटवर्धण याचे आठदाहा घोडे.

१ गणेशपंत फडणीस याचे तीनच्यार घोडे.

१ गो। गणपतराव दादा पटवर्धण याचे घोडेस्वार तीसचाळीस आहेत. सिवाये सिपाई लोक व शागीर्दपेशाचे मणुशे पंचवीसेक आहेत आणि आज सांगलीस जाणार म्हणोन बोलतात.

---

१ जखमी लोक तोफखान्याकडील हाली येथे आहेत:

१ नाईकवाडी याचे दरम्यात आा ८ जखमी आरब आा ६ जमादार याचे नाव प्यारमीा आहे.

१ गेबीसाहेबाचे दरम्यात आा ८ जखमी. त्यात येक मऱ्हाटा बाकीचे मुसलमाण.

१ कोरेगाव वगैरेकडील दरम्यात जखमी आा ३.

१ भाड्यान घर घेऊन राहिले तेथे जखमी आा३.

१ धनगर याचे घरी आा २ स्त्रीपुरुशे, उभयेतास जखमा. ते येथून लस्करात पेंद्रोस साहेबाकडे गेले होते. त्याणी यास गो। १९ दिल्हे म्हणोन सांगत होते.

---

१ हाली येथे बुधाजी सावत आहे त्याचा भाऊ श्रीमंताचे लस्करात आहे. त्याजकडील वर्तमाण सांगावयास येथे मौजे गारडी येथील पवार लस्करात आहेत त्याचा गडी लस्करातून बारावे दिवसी येथे आला. त्यास येऊन माहाभार दिवस जाले. त्याचे भावाचा निरोप सांगोन गेला. लस्करची बातमी सांगितली म्हणोन बोलत होता. लढाई जाली ही खरी. उभयेपक्षी मणुशे पडले. श्रीमंतापासी तीन कंपू आहेत. ग्वरीज राजेरजवाडे, जाट, सीक वगैरे मिळोन जमेत साठसतर हजार आहे म्हणोन सांगोन गेला.

१ आकळूजकर जंगम येथे परवाचे दिवसी आला तो सांगत होता. वाठारकर निंबाळकर याचे दोघे जासूद आमचे मठात उतरले होते ते सांगत होते, श्रीमंतांचे लस्कर आशेरास सोडोन सत्रा दिवस जाहाले. लढाई जाली खरी. पलटण माघ सरून दाहाबारा कोसावर जाऊन उतरले होते. त्यावर नायेकाणी त्या जासुदास बोलाऊन नेले होते. त्याजला काये सांगितले हे कळले नाही म्हणोन बोलत होता.

१ बाजारी वदता: आपल्याकडील पलटणानी वारी धरून श्रीमंतांचे फौजस आटकाव केला तव्हा त्याणी जरनेल साहेबासी बोलणे करून, तूर्त बरसातीचे दिवस, उभयेपक्षी दगाफटका होऊ नये म्हणोन पुरंदर बलीस दिल्हे आहेत. धान्ये माहाग आहे म्हणोन बोलतात.

१ छ २९ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशेल.

१ मोगलाई तालुक्यात आपल्याकडील चटकरी ताकीद करितात, वसूल कमावीसदारास देऊ नये म्हणोन लोक बोलतात.

१ माहे मे महिन्याची रसीद पाठविली होती. आपला हुकूम आला, सातारियाहून ऐवज मागऊन घेणे. त्यावरून त्यासहि लि।।, तो रोजमुरा पावला नाही. हाली माहे जून महिन्याची रसीद सातारियास रवाना केली आहे.

१ तालुके बेरडी व का।। करजगी येथील कतबे सातारियास रवाना जाले. आमचे गावचे कोन्ही गेले नाहीत; गेले तर सरकारचे गुणेगार, ऐसेच लि।। येतेत.

| | |
|---|---|
| १ का।। करजगी | १ तालुके बेरडी |
| १ मौजे निवाणी | १ मौजे भोम |
| — — | १ मौजे रड |
| | — — |

१ येथून पाच कोसावर काल येथील कुंभार दावकरी याणी मारला.

१ काल येथे आवजी सिंदे याचा चिरंजीव धोंडी श्रीमंतांचे लस्कराहून आला. त्यास लस्कर सोडोन आज आठरा दिवस जाले. तो सांगतो, हजरत मलकम साहेब याजकडील लहूसाहेब येकटेच येऊन श्रीमंताची भेट होऊन बोलणे होताच श्रीमंत आपले लस्कराजवल येऊन उतरले. ऐसे होताच त्रिंबकजी डेंगला तर गैबच जाहाला. कोणीकडे गेला त्याचा शोध नाहीं दाहा बारा हजार फौज विंचुरकर, पुरंधरे, पंत प्रतिनिधि, आपटे याचा चिरंजीव वगैरे जमेत दरोबस्त देशांत विंचुरापो बरोबर आलो. पुरंधरे विंचुरकर विंचुरास राहिले. बरकड आपल्या लग्याणी गेले. श्रीमंताबरोबर हजार दीड हजार जमेत गेली. बहुत आपल्या ठिकाणी कष्टी जाहले. ईंदुरास छावणीस गेले म्हणोन सांगतो. याप्रो खिचित जाले.

मा।र साहेबाचे खिजमतीत लि।। बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶ *Balvantrao Bapuji the news-writer reports to Elphinstone various sorts of rumours about the fighting between the Peshwa and the English.*

---

१ गैब=अदृश्य, गुप्त.

7200

No. 235] [2-7-1818

श्री

HONOURED SIR,

साहेबाचे शेवसी भगवंतरावजी बालाजी मुा ठाणे रावेर नजीक बऱ्हाणपूर सलाम आर्ज विनंती विज्ञापना. ता छ २ जुलईपावेतो साहेबाचे मेहरबानगी सुखरूप आसो विशेष. साहेब इकडेस येतात हे एकूण फार आनंद जाला. आता साहेबाचे चरण द्रिष्टीस पडतील. पसर्जी साहेबास मी पत्र पाठविले ते पावलेच असेल. हली लिहिनो जे, नागपुराकडून भोसले याचा कारकूण राजश्री दाजीबा गोविंद येथे येऊन बाजीराव साहेब याजकडील काही आराब व पन्नास स्वार बेरोजगारी होते, त्याजपैकी पन्नास स्वारास व च्यारसे आराब याजला चाकरीस ठेऊन कालच कूच करून भोमले याजकडेस गेला. आणखी च्यारसे आराब व मोल्द (?) आहेत याजलाहि घेऊन जाणार आहे, परतु खर्चास नाही सबब तवडेच घेऊन गेला. साहेबास कलावे. वरकड मजकूर सर्व बरा आहे. हामेशा सेवकावर ममता ठेवीत जावी हे विज्ञापना.

¶*This is a news-letter of Bhagwantrao Balaji reporting that some Arab soldiers disbanded by the Peshwa have been again taken into service by the Nagpur Raja.*

---

No. 236] [4-7-1818

श्री

आखबार सुभे खानदेश सरहद मथावार तापीतीर बऱ्हाणपूर येथील वृत. कपतान हाजीसाहेब बहादूर व मीर फज्लआलीखा बाहादूर मालेगांवीहून धरणगावी छावणीबदल आले. समागमे शंभर स्वार व येक हाती आहे. त्रिबकजी डेंगला वण पाचे गांवीं धरून चांदवडांत आणून बेड्या भरून पाहऱ्या कबिल्यासुधा ठेविले आहेत. कपतान ज्यान विरग साहेब बहादूर मालेगांवीहून कूच करून सोनगिराकडे छावणीस येणार ते दोन मजला त्यासुमारे आले आहेत. आमलनेरकर आरब बदमस्ती करीत आहे. धन्यास मानीत नाही. धरणे राजेबहादूर याजवर करून आज तीन दिवस जाले, मोठे निकर्डाच धरणे केले आहे. सेवसी श्रुत होय रवाना छ ४ जुलाई मुकाम पारोले.

¶*News is sent from Parole of Trimbakji Dengla having been arrested at Wun and kept at Chandwad with his family; Capt. Briggs is coming to Songir for camping says the report.*

No. 237] [11-7-1818

श्री

हजरत खुदावंदन्यामत सरदार अलीशान खुदायगा
नवाबसाहेब बलबाहादुर यांचे खिजमतीत

आजदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बाज्या भाऊर दे मारूज मे रसानद आर्के येथील खैरसला. अखबार देवढी मुकाम मंगलवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ ११ माहे जुलाई सन १८१८ इसवी मुताबीक छे ६ माह रमजान सन १२३२ रोज शनवारपो येथास्थित असो विशेष.

१ नगरहून येथे काल ग्रहस्त आला तो सांगत होता:

१ रास्ते, दमडेरे पुण्यास येऊन दाखल झाले. आपण नगरास आलो, पुढे जाणार म्हणोन सांगत होता.

१ श्रीमंताकडील माार तेथे बोलत होते ते सांगितले. विचुरकर, पुरंधरे रामचंद्र व्येंकटेश, रास्तदीण, आपटे ही मंडळी जवळ आहे. फौज बारा-पंधरा हजार आहे. सिंदाकडील, जाटाकडील राजरजवाडे याकडील वकील जवळ आहेत. सिकास आठ आणे देऊ म्हणोन बोलणे आहे. त्यावर हजरत जनराल मलकम साहेब याचे बोलणे लागले. तुमचा आमचा तह व्हावा. त्यावरून बाजीराव साहेब याचे बोलणे पडले. तुमचा आमचा आता तह होतो दिसत नाही. तूर्त कारन नाही. तव्हा सिंदे याचे वकील बोलाऊन आणून त्याचे विद्यमाणे तहाचे बोलणे जाहाले. च्यार महिणे बरसातीचे तुम्ही आम्हासी व आम्हासी खटला, दगाफटका उभय-पक्षी न करावा. दसरे, तुम्हासी च्यार आणे देऊ केले त्याचा मुलुख तोडून घेऊन तुम्ही आपले ठिकाणी असावे. त्यावर आपल्याकडील बोलणे पडले, बहुत चांगले. परंतु जेथे तुमचे बारा आणे तेथे आमचे च्यार आणे ऐसे व्हावे हे बोलणे पडले. त्यावरून कलकत्यास पत्र पाा आहेत. तेथून हुकूम जावसाल ठरून येईल त्याप्राा करावे म्हणोन तह होऊन इंदुरावर किंवा महेश्वरावर श्रीमंतांची छावणी जाली. हजरत जनराल मलकमसाहेब लस्करसुधा येक मजलीवर छावणी करून आहेत. सिंदे याणी सांगोन पाा श्रीमंतास की, इंग्रजाचा व आपला स्नेह, त्यापक्षी त्याचा आपला तह व्हावा हे चांगले. सिकासी आपण बोलणे करिता हे ठीक नाही. त्यावरून हा तह ऐसा ठरला. दुसरे आणखी सांगितले, यामधे कैलासवासी श्रीमंत दादासाहेबांचे वख्तास त्याणी आपणास लेहून

+ मुळांत असें आहे.

दिल्हे होते तो दस्तऐवज मावारी घेतला होता तो व दुसरा दस्तऐवज आपले त्याजपासी आहे की, राज्यासी दावा ठेवणार नाही, तो व तिसरा दस्तऐवज टिपूचे गर्ज आपण घेतले ते समई करार होता, जे टिपू चौथाई खंडणी देत होता ते आम्ही देऊ, ऐसे तिन्ही दस्तऐवज श्रीमंतापासी आहेत. भोसले, गाईकवाडसुधा तहाचे बोलणे होताच त्रिंबकजी निघोन गेला हेहि सांगत होता.

[ नंतर १ कलम गाळले. ]

१ पुण्यास प्रथम लढाई व दुसरी लढाई जाली ते समई, कोन्हास लुटीचा माल सापडला व घोडे जणावरे वगैरे आसबाब लुटून घेऊन आलेले ग्रहस्त येथ व बाहीर खेड्यानी आहेत म्हणोन बातमीदार येऊन सांगतात. परंतु त्यास विचारणा करण्याविसी हुकूम नाही म्हणोन बातमीदारास सांगितले. हुकूम आल्यास चौकसी करून लेहून पाठऊ.

१ सातारियाहून जाहिरनामा आला त्यात मा॥र: बाजीरावसाहेब याणी डेंगला कैद करून जनराल मलकमसाहेब याचे हावाली करावा हे वर्तमाण त्यास समजल्यावरून पळून गेला. तो कोठे जाऊन बंड करील याकरिता कमाविसदार याणी नजीक सरदार आसतील त्यास कळवावे, डेंगला याजकडे कोन्ही नवकर राहू नये व सरकार कुंपणाचे दस्तकावेगिज कोन्ही हात्यार घेऊन फिरो नये व ज्या तालुक्यात राहील तेथील जमीदाराणी बातमी सरकारास कळवावी, न कळविल्यास वतणे, इनामे जप्त होतील, हात्यार घेऊन फिरेल ते सरकारचे गुणेगार, याप्रो। आला. त्यास जाहिरनाम्याच्या नकला करून आसपासचे तालुक्याचे कमावीसदाराकडे पाठऊन त्याचे उतर आणून ठेविते.

१ छ ९ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशेल.

१ आठीच महिणे होत आले, आद्याप खर्चास दरमाहाबदल मिलत नाही. जासूद बाहेर फिरतात त्यास खर्चास तर पो। बरतर्फ जासूद करविले त्यांचाहि दरमाहा पो। नाही. बरोबर सातारियास न्याहावे हे ठीक नाही, त्याजला राग येईल. येथ ज्याचे रु॥ घेऊन दिल्हे ते मागतात. पर झिला; येथे कैसे करावे? पैशाखेरीज तर चालत नाही.

मा॥र साहेबाचे खिजमतीत लि॥ आहे. बंदगीस रोशेन होये हे अर्जदास्त.

¶*Balwantrao Bapuji sends news to Elphinstone from Mangalvedha of the movements and negotiations of Bajirao with Malcolm, Daulatrao Sindia and others. Trimbakji Dengle's sudden disappearance from the Peshwa's army and the efforts made by the British authorities to secure him are also alluded to.*

7203

No. 238] [17-7-1818

तेरीख २३ माहे जुलई सन
१८१८ इसवी मुा छ १८ रमजान

श्री

हजरत खुदावंद न्यामत सरदार अलीशान
खुदायगा नवाब साहेब बलबाहादुर
याचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बज्या आऊरद माल्हुज मे रसानद आके. येथील सला अखबार दवढी मुा मंगळवेढ नजीक श्रीपंढरपूर ताा छ १७ माहे जुलई सन १८१८ इसवी मुताबीक छ १२ माहे रमजान सन १२३३ रोज शुक्रवारी पाा येथास्थित असे विशेष-इकडील माा

१ त्रिंबकजी डेंगळा किले आमदानगर येथे गेले बुधवारी धरून आणून किल्यास दाखल केला, आज दाहा दिवस जाले. भिलार्णी हावाला केला म्हणोन सांगतात.

१ राा रामचंद्रबावा गोसाई पैठणकर तराव तारिखीस क्षेत्रास आले आहेत. बरोबर दस्तक आपले आहेत.

१ राा दाजीबा देशमुख कडेकर येकादर्सास क्षेत्रास आले आहेत. बरोबर दस्तक आहे. त्याची गढी आपले सरकारात आली होती. त्याची त्याजकडे दिल्ही म्हणोन सांगत होते.

१ राा नानासाहेब माणकेश्वर तराव तरखीस क्षेत्रास आले. बरोबर पंचवीस तीस शागीर्द पेशा वगैरे सरजाम आहे.

१ हजरत बंडसाहेब आमदानगराहून पुढे आवरंगाबादेस गेले. आज आठ दिवस जाले. म्हणोन येथे बोलतात.

१ श्रीमंत बाजीराव साहेब उजेणीस आहेत. बरोबर पाच हजार फौज सिंदे याजकडील आहे. खर्चास सिंदेच देतात. कलकत्यास पत्र वकील गेले आहेत. तेथ ठरऊन येईल त्याप्रो करावे म्हणोन सांगत होता.

१ श्रीमंत इनाईकराव साहेब सागरकर बुंधेले याचे काही कारभार प्रकरणात होते, त्यावरून सागरचे ठाणे आपल्याकडे दिल्हे म्हणोन पाच हजार स्वाराची नेमणूक करून घेऊन आपल्याकडे नवकर होऊन आहेत म्हणोन सांगत होता.

१ नागपुराकडोन येक ग्रहस्त आला तो सांगत होता. भोसले ज्या गावीहून काहाडून नेले तेव्हा आम्ही नजीक होतो त्यामुळे आम्हास आडथला जाहाला होता. आम्ही लोढापर्यंत होतो. त्यास कलकत्याकडे घेऊन जात होते. त्याचा मुकाम बाजार तल्यावर होता. आमचा त्याचा दीड कोसाचा तफावत होता. पाहारकरी फितऊन ठविले होते. बदली येण्याचे सुमारास राज्यास कुडती टोपी घालून बंदुख संगीणसुधा हाती देऊन पाहारेकरी यात उभे करून होते. त्याचे बिछाण्यावर लोड टाकून वर पाघरून घालून मणुश निजले असे दाखऊन आगोधरच हा बेत करून ठवला होता तो बदलीहि आली. त्यास रपट दिल्ही, साहेब निजले आहेत ऐसी इतला करून निघोन गेले म्हणौन सांगत होता.

१ आपण आवरंगाबादेस जाण्याचे कारण येक ग्रहस्त सांगत होता. रा लाला गोविंदबक्ष याचा व आपल्याकडील तेथ साहेब आहेत त्याचा बेबणाव जाहाला म्हणोन गेले. कारन पासष्ट लक्ष रुाचा मुलूक घ्यावा ऐसा खर्च्याचे साल्चा करार व मोगलाई पलटणे साहा व च्यार हजार फौज आपले तैनातीस घ्यावी. त्याचा राजभुरा त्याणी द्यावा ऐसा करार. त्या राजभुऱ्यास हरकत पडती म्हणोन च्यालीस लक्षे रुाचा तालुका तोडून आपल्याकडे करून घ्यावा म्हणोन बोलणे पडले. याकरिता बेबणाव म्हणौन सांगत होता.

१ छ १४ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहचलीच आशल.

१ पंढरीस मणुशे मरण्याची पटकी आली आहे त्यामुळे नित्ये च्यालीस पणास मणुशे मरतात.

मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶*Balwantrao Bapuji reports news from various quarters, particularly about Bajirao's movements, the capture of Dengle, the escape of Appasaheb of Nagpur from custody and other topics.*

---

*No. 239*] [*19-7-1818*

तेरिख २४ माहे जुलई

सन १८१८ छ १९ रमजान.

श्री

HONOURED SIR,

साहेबाचे शेवेसी शेवक रावजी बाळाजी मुकाम गावंर नजी(क) शहर बराणपूर दोनी कर जोडोन सलाम आदाब आजे विनंती विज्ञापना. ताा छ १९ जुलई

पावेतो साहेबाचे मेहेरबानगीकडून सुखरूप असो विशेष. साहेबाचे शेवेसी च्यार पाच पत्रे पाठविली ती पावलीच असतील. परंतु त्याचे येकाचेहि उतर आले नाही. तरी साहेबी हमेशा पत्र पाठऊन सेवकाचा सांभाल करीत जावा. आम्ही इकडेस आलो त्या समई हजरत ज्याफरीसाहेब याजला आर्ज केला होता की, येवडा दरमाहा आम्हास पुरत नाही. त्याचे उतर साहेबानी दिल्हे की खेडीवाटचे डाकेचा बंदोबस्त करून यावे म्हणजे बडेसाहेबाजवळ आर्ज करून दरमाहा वाढऊ. त्यापुढे साहेबानी आम्हास बोलाविले नाही. इकडेसच ठेविले. काही दिवसानंतर पुढे दंगाहि जाला व हली हजरत ज्याफरीसाहेब पुण्याहून हैदरावादेस निघोन गेले. आता सर्वथा आमचे खावंद साहेबच आहेत. बराणपुरास साहेबलोक आले गेले त्यांची चाकरी चांगली केली व काही दिवस हजरत कपतान ज्यान ब्रिगसाहेब याचेजवळहि होतो. डाकेचा दरमाहा पुरत नाही सबब ब्रिगसाहेब यांणी मेहरबानगी करून रावेरचा आमल मांगितला आहे. दरमाहा रु॥ ७० केले आहेत. डाकेची चाकरी मीच करितो. डाकेचे चाकरीस कोण्या गोष्टीची खलेल आमचेपासून पडत नाही. जनराल मालकंसाहेबाकडोन कागदपत्र व कट [?] येतात ते आम्ही साहेबाकडे रवाना करतो व साहेबाकडोन मालकं साहेबाचे नांव पत्रे येतात तीहि रवाना करितो. मी साहेबाचे पदरचा याजकरिता जनराल डपर्टनसाहेब व मालकंसाहेब आम्हास फार चाहतात. बराणपुरास आले होते त्या समई सर्व कामकाज डाकेचे आमचेच हाते घेत होते. इकडील मजकूर काही नवल विशेष नाही. कितेक बंडे होती त्याचा बंदोबस्त ब्रिगसाहेब यांणी केला आहे. बहुत काये लिा हे विनंती.

Honoured Sir,
Your most obedient humble servant,
Rowjee Ballajee,
Post Office Writer.

Boorhanpoor,
19th July 1818.

¶*Raoji Balaji Post Office-writer, who seems to write the last few words in English himself sends news from Burhanpur.*

7206

No. 240] [18-8-1818

तेरीख २० माहे आगस्ट
इसवी मुा छ १६ सवाल

**श्री**

**हजरत खुदावंद न्यामत सरदार आलीशान**
**खुदायगान नवाब साहेबलबाहादूर**
**याचे खिजमतीत**

आर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बाद बंदगी आदाव तसलीमात कुरनिशात बज्या आऊरंद मारूज म रसानद आर्के येथील खैरमला अखबार देवळी मुा मंगळवेढ नजीक श्रीपंढरपूर ता छ १८ माहे आगस्ट सन १८१८ इसवी मुताबीक छ १५ सवाल सन १२३३ रोज मंगळवार पो येथास्थित आसा विशेष. इकडील मार

१ रा बापू गोखले याची स्त्री काही येक दिवस तुळजापुरी होती. नंतर श्रावण शुध्द येकादसीस श्रीक्षेत्र नरसिव्हपूर येथे येऊन राहिले होते. बरोबर पाच स्वार व पडतळाचे पाच तटू व येक म्याना, शागीर्दपेशाचे पाच च्यार माणस व आपलेकडील दोन चपरासी एस बरोबर होते. क्षेत्रात त्यांणी हातात बांगड्या घातल्या, कपाळी कुंकू होते, गल्यात गळसुरी व मंगळसूत्र होते. त्याचे माणस सांगत होते की आपण खर्चास रुा पनास हजार दिल्हे म्हणोन. क्षेत्रीचे ब्राह्मणानी बाईस विच्यारिले, खाशाविसी बाहेर वदंता उठली हे काय? त्यावरून त्यानी सांगितले, गोष्ट बातैल[1] आहे. द्वादसीचे दिवशी कूच करून पुन्याकडे गेले. कलम

१ रा आबा पुरंधर व नाना पुरंधर जेजोरीस आले म्हणोन खबर आहे. कलम

[या पुढें २ कलमें गाळलीं.]

१ गोखले याचे वाड्यात गज्या व तुळया होत्या त्या गोपाळपुरावर लस्करात वेऊन गेले. कलम

१ छ १४ तारखेची आखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आसेल, शेरीरास आद्याप आराम पडत नाई. आवशेधपान्यास तीस च्यालीस रुा खराब केले, परंतु ईश्वर आराम करील तो दिवस खरा. सरकार नवकरीवर लक्ष आसले तर लवकरच आराम पडल. कलम

मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे, बंदगीस रोशन होये आर्जदास्त.

*¶Balwantrao Bapuji the news-writer reports to Elphinstone that the wife of Bapu Gokhale does not believe in the death of her husband and goes about with the marks of a married woman.*

---

१ खोटें.

7207

No. 241] [13-9-1818

# अर्जी बजनाब फैजमाब हजरत बडे साहेब बाहादूर याचे खिजमतीस

आर्जदास्त फिदवी नारोपंडत आदाबंदगी मारूज मदारद हकीकत ता ११ रोज माहे जिलकाद पावेतो साहेबाचे कृपेकरून मय गयम आसो विशेष. इकडील वर्तमान तरी मुंबईहून परभू आणि मी पुण्यास आलो. (साहे) बाची भेट संगमावर डेऱ्यात जाहाली. परभूस उदईक बोलाविले होते. ते दिवशी येकादशी होती. लढाईचा बेत जाहाला. लढाईच्या पूर्वी येऊन बातमीचा कागद संगमावर साहेबास प्रविष्ट केला. ते दिवशीची लढाई समाप्त जाहाली. दुसरे दिवशी खडकीच्या पलावर बातमीचा कागद घेऊन जासूद मी बराबरच आलो. त्या वेळेस साहेबी मजला डेऱ्यात बोलाऊन नेले असता ग्राटसाहेब यांनी उत्तर केले साहेब हा दरजी आहे. तेव्हा त्याचा गोष्ट ध्यानात न आणता मजला बक्षीस देत होते. मी काही घेतले नाही. बादर बाळाजीपंत नातूस बोलाऊन चौकशी करविली आणि म्हणो लागले जे याचप्रमाणे श्रीमंताकडील व गोखल्या-कडील बातमी डेऱ्यात जाऊन बातमी खचीत आणावी म्हणजे बडेसाहेब बक्षीस देतील आणि कुंपीणी चाकरी केली असता जन्माचे आन्न होईल असे बोलून माझेबराबर जासूद होता त्यास साहेबानी इनाम दाहा रुपये दिले. त्यानंतर बातमीच्या कामावर ठेविलेच होते. हे वर्तमान गोखल्यास कळून मजला कैद करून ठेविले होते. पुढे साहेबास यश प्राप्त जाहाल्यावर मुक्त जाहालो हे साहेबाच्या ध्यानात आसलेच. आलीकडे पंढरपुरी घरी राहिलो होतो. हे वर्तमान गोखल्याकडील काकोबा परभूला कळून मी बातमी पोहचवीत आसतो ऐसे (म)नात आणून मजला कैद करून आठसे रुपये दंड घेतला. श्रीमंता(वर) साहेबाची स्वारी लांब गेली जाणोन कोल्हापुरावर जनरल तामस मंड्रोल साहेबापासी बातमीच पत्र स्वाध्यान केली त्यावरून संतोष जाहाले आणि राजश्री श्रीनिवासराव मामलेदार यास पत्र दिले की हे पंढरपुरी राहातील, यास कोण्या गोष्टीचा उपसर्ग लागू न देणे. याप्रमाणे पत्र घेऊन पंढरपुरास आलो. त्याजवरून साहेबाची कृपा मजवर आहे हे जाणोन कोतवालीचे काम मजकडे मागितले. नंतर आलीकडे ग्राटसाहेब याजकडे आमल पंढरपूरचा जाहाला तेव्हा रोज वर्दी ज्याप्रमाणे वर्तमान (येईल) त्याप्रमाणे लिहीतच गेलो. परंतु येकहि वर्दीच उत्तर आले ना(ही) * * * ठा चौ रोजात राजश्री श्रीनिवासराव मामलेदार याची तह * *

\+ ना—

करून राजश्री चिंतो रघुनाथ गाडगील आमलाच्या कामावर पाठविले आहेत. साहेबास कळावे. मी येथून तीस पर्स्तीस कलमबंदीच्या यादी करून ग्राटसाहेब यास पाठविल्या त्याच्या नकला करून साहेबास अलाहिदा यादी करून पाठविल्या आहेत सेवेसी येऊन पोहचतील. माझा उदयकाळ जाहाला म्हणोन साहेबाची स्वारी मावारी परतली. मजला साहेबाच्या पायासिवाय आधार दुसरा नाही. मी सर्वांचा त्याग करून साहेबास शरण आलो, त्यापक्षी माझा अभिमान साहेबास असावा. मजला आद्यंत स्मार त्यावयास कारण नव्हते, परंतु साहेबांचे पदरी मजसारिखे नारावा हजारो आपले पदरी, तेव्हा माझे स्मरण आहे किंवा नाही म्हणोन साहेबास काही तरी स्मरण पोहचून स्मरणात यावे म्हणोन लिहिले आहे. तरी साहेबी कृपा करून पत्र ध्यानात आणून उत्तर देणे याविषी आज्ञा व्हावी. उत्तर आले म्हणजे मी जलदीने येऊन हजर होतो. ज्यादा लिहिणेस ताकत नाही हे अर्जी.

*Naro Pandit writes to Elphinstone recalling his services in supplying information during the late war and requesting reward. This is a sample of numerous requests from spies which poured before the British officials after the war.*

---

*No 242*] [*17-9-1818*

अर्जी बजनाब फैजमाब[१] हजरत
आलपेष्टणसाहेब वडे साहेब बाहादूर
याचे खिजमतीस

आजदास्त फिदवी नारोपंत कोतवाल आदाब बंदगी मारूज मे दारद[२] हकीकत ता १९ माहे जिल्काद पावेतो साहेबांचे कृपेकरून खैरखुशी सरगरम असो विशेष इकडील वर्तमान तरी तपसील :---

१ श्रीमंत बाजीरावसाहेब जनरल मलकमसाहेब बाहादूर याचे विद्यमाने पुस्करणं तीर्थास गेले म्हणोन आवाई आहे. कलम

१ राजश्री बाळाजीराव आमलदार याचा येकांत रोज होतो. रास्त्याच्या कारकुनाबरोबर देवास जावे, हर कोठे जात

१ रास्त्याचे बायको सासवडा आवा पुरंधर याजपाशी आहे म्हणोन आवाई आहे. कलम

१ राजश्री तात्या मजमदार हे श्रीमंताचे पदरचे, श्रीमंतानी वीस हजार रुपये इंग्रजाचे अनिष्ट व्हावे म्हणोन दिल्हे, अनुष्ठाने करविली ही बातमी

१ फैज म आब = full of generosity. २ मारूज मे दारद = begs to request (Verma).

आसल्यास त्यावाचून जाऊ नये. काय मसलतीत आहेत हे समजत नाही. विच्यार दिसण्यात नीट दिसत नाही. साहेबास कळावे. कलम

१ तीन वर्षे गुराची चोरी करून लोकाची घर बुडवीत आसत तो चोर आम्ही गुरामुधा धरून हवाली केले आसता पाटील कुलकर्णी व आमलदार मिळून दोन हजार रुपये आंतस्त घेऊन चोरास पारपत्य न करिता सोडून दिल्हे हे चांगले की काय! साहेबास कळावे. कलम

१ चावडीचा व नाकबंदीचा बंदोबस्त व चौकी पाहारा खबरदारीन आहे. कलम

१ मजजवळ सिपाई आा पाच आहेत त्यास आज तीन महिने जाहाले रोजमऱ्यास ठिकाण नाही. पोटास दिल्ह्यावाचून चाकरी कशी होईल! तर रोजमऱ्याचा हुकूम यावा. कलम

१ गावात भाजीपाल्यावर उकाले तेग आहेत तेणेकडून बागवानास व माल्यास बहुत उपद्रव होतो. इतका उपद्रव श्रीमंताचे वेळेस नव्हता. हली रयतेस सुख देणार साहेब समर्थ त्यापेक्षी याचा बंदोबस्त करावयाचा हुकूम यावा. कलम

श्रीनिवासराव आमलदार यास लागली तेव्हा त्यास तगादा केला. नंतर मजमदार याणी आमलदारास तीनसे रुपये आंतस्त दिल्हे. नंतर मारनिले जग्नेल तामस मंडरोज[1] साहेबापासी जाऊन फिरयाद केली की श्रीमंतानी देवळाप्रीत्यर्थ वीस हजार रुपये दिल्हे आसता आमलदार आम्हासी तंटे करून तीनसे रुपये आतस्त घेतले. त्याजवरून यातील अभिप्राय न जाणता जरनेर तामस मंडरोल साहेब यानी रुपये माघारी देण्याविसी हुकूम केला. रुपये आमलदारानी माघारी दिल्हे किंवा न दिल्हे हे समजत नाही. ते ताल्या मजमदार आमलदाराबराबर येकांत करून कामाची वहिवाट करितात. कलम

१ विठलपंठतील सेटपण नसता सेटपण जबरीने आनभऊन पहिल्या सेठ्याचे घरदार लुटून आपले घर भरले. पेठेत रयतेवर बहुत झाली करितो. सरकार हुकुमासच मानीत नाही. ही गोष्ट आमलदारास समजाविली, परंतु मनावर घेत नाहीत. याजकरिता साहेबास विनती लिहिली आहे. तर पहिल्या सेठ्यास स्थापिले आसता सर-

1 General Thomas Munro.

१ तूर्त फंदफितूर च्यालीस कोस-
पर्यंत आसपास कोठें नाहीं.
येविसीची बातमी बरचेवर येत
आसतां. कलम

७

कागत नजरहि मिलतां आणि
रयतहि राजी राहाती. कलम

३

यकूण दाहा कलम सेवेसी लिहून पाठविली आहेत. साहेबी ध्यान करून हुकूम यावा म्हणजे त्याप्रमाणें बंदोबस्त करीन. मी सर्वांचा वाईट होऊन साहेब चाकरीस हजर जालों, त्यापेक्षा माझा अभिमान धरण्यास आसला पाहिजे. ज्यादा लिहिणेंस ताकत नाहीं. हे आर्जी.

¶*This is a report of Naropant Kotwal of Pandharpur to Elphinstone about important events occurring in the city*

---

*No. 243*] [*24-9-1818*

तेरिख २७ माहे ससवर
सन १८१८ इसवी मुताबिक छ २५
जिलकाद

श्री

साहेब मेहेरबा खुदावंत वालामुनाकिब अलीशान हनरबल मौट इष्टवारीट इलफिसनन साहेब बाहदूर सलमुल्हू ताला

८ खिजमतीस बालाजी नारायण नातू सलाम बाद सलाम येथील खैरयत तागाईत छ २२ जिलकादपावेतों साहेबाचें मेहेरबानीनें खैर असे. दरिविला मेहेरबा पाटीजरसाहेब व राबीसंन साहेब यांणीं पांच गावच्या सनदा फिदवीचे नाव तयार करून पाठविल्या त्या पावोन बहुत संतोष जाहाला. शेवकाकडून इतकी खिजमत जाहाली नसतां इनाम बहुत मिळालें. फिदवीची उमेद इतकी नवती. या मेहेरबानीचा बयान काय करावा. सेवकाचा प्रतिपाल साहेब करीतच आहेत, परंतु पुस्त दरपुस्त इनाम खाऊन साहेबाचे हकात दुवा मागत जातील हे आर्जदास्त.

¶*Balaji Narayan Natu communicates his profound sense of gratitude to Elphinstone for the inam of five villages so graciously conferred on him.*

7211

No. 244] [17-10-1818

# त्रिसुद

**Permit the bearer named Narroo Vistnoo Apty to proceed unmolested from Poona to Bajee Row's Camp via Anna Bota, Copergaum, Ankye, Mallygaum, Booranpoor and Ougien, provided he is not accompanied by more than 50 armed Horsemen, 50 Tuttoos of baggage, 5 Camels, 50 armed men and 100 followers. This passport to have effect for three months from this date.*

*Poona, 17th October 1818.*

¶*This is a passport given to Naro Vishnu Apte who was one of Bajirao's trusted officers. The descendants of his family stay at present in Gwalior.*

---

No. 245] [25-10-1818

तारिख २५ माहे

आक्टोबर सन १८१८ इसवी

मुा छ २३ जिल्हेज

श्री

विज्ञापना येथील कुशल ताा आश्विन वाा ११ पावेतो क्षेम असे विशेष. वद्य अष्टमीस मध्यरात्रौ मुख्याचे आंगास आले आणि वारा जाहाला; नंतर सावनालच जागे होऊन जवळ जाऊन आंगास आले होते त्यास विच्यारू लागले की तू कोण आहे? येथे यावयाचे प्रयोजन काय? त्याजवरून ते बोलते होऊन म्हणो लागले की मी गंगाधरशास्त्री आहे; मला निरर्थ मारिले. आता मी मुड घेईन. इतके बोलून आंगातील वारे निघोन गेल्यावर सावध जाली. ही अक्षरे ल्याहावयासी मनास संकोच वाटला. दुसरे कोणी आंगास येऊन त्याचे नाव सांगितले असेल. यातील काय असेल ते असो. परंतु वर्तमानप्राा दुसरे वद्य नवमी शनवारी तिसरे प्रहरी राजश्री बापू केळकर येऊन खलबत करून गेले; व तेच दिवसी प्रथःकाली बारा घटका दिवसास वेाा राा रघुनाथशास्त्री सहस्त्रबुधे श्रीमहायात्रेस निघाले. त्यास खर्चास येक सहस्त्र रुपये हाली सिका ताम्हनात घालून वरती केळीची पाने लाऊन शागिर्दाजवळ देऊन फराळाचे म्हणोन त्याचे घरी पावते केले. त्याजवर वद्य दशमीस राजश्री अणा नगरकर यांचे चिरंजीव भाऊ नगरकर वावधनाहून दोन प्रहरा भोजनास आले ते तिसरे प्रहरी खलबतास बसले होते. तितक्यात

---

* मूळ कागदावर याच अर्थाचा मोडींत लिहिलेला दस्तक आहे.

त्याचे तीर्थरूपाचे पत्र मुदाम माणूस घेऊन आला त्याचा जाब लिहून दिल्हा, आणि माणूस रवाना करून दिल्ह्यावर च्यार घटका दिवस राहाता निघोन आम्तमानी वावधनास गेले. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶This letter notes a very curious incident referring probably to Bajirao's wife Varanasibai having been possessed by the spirit of Gangadhar Shastri and giving utterance to these words, viz., "I am Gangadhar Shastri; I was in vain murdered and I would avenge the murder." The date of the letter and its receipt are the same : so the letter cannot refer to Bajirao who was then in the north.

---

*No. 246*] [*4-11-1818*

तारीख ७ माहे नवेंबर
सन १८१८ इसवी मुा
छ माहे मोहरम.

**श्री**

हजरत खुदावंदन्यामत सरदार अलीशान खुदायगा
नवाबसाहेबलबाहादुर याचे खिजमतीत

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलिमात कुरनिशात वाज्या आऊर दे मारूज मे रसानद आंके येथील खैरसला. अखबार देवडी मुा फलटण ताा छ ४ माहे नवेंबर सन १८१८ इसवी मुताबीक छ ४ माहे मोहरम सन १२३४ रोज बुधवार पो येथास्थित असो विशेष. इकडील मार :

[ पुढील ८ कलमे मजकूर अवांतर म्हणून गाळली. ]

१ रा बाळाजी पाा गुजवटा मौजे झिरपवाडीकर सांगत होता. निपानीहून गर्दी आली तो सांगत होता. निपानकर यांनी किल्याचे बंदोबस्तास च्यार हजार पायेदल आरबमुधा किल्यांत ठेऊन जातीने सरंजाम मुधा किलेच्या पालीस बाहेर येऊन उतरला आहे.

१ दीपाजी डांगे पुणेकर मिरजेस गेला तो जामदास सांगत होता.

१ दौलतराव सिंदे याचे बैकांचे बोलणे पडले, आपण स्वस्त बसला, दक्षनचे राज्ये गमाविले. त्यावर सिंदे याचे बोलणे पडले, श्रीमंतानी आमचे व होलकराचे पारपत्य व्हावे म्हणोन इंग्रजास आणले. त्यापेक्षा त्याचे केशे होते हे पाहू. नंतर पाहून घेऊ. त्यावरून बाई सरंजाम घेऊन दखणत येण्यास च्यार मजली आलाड आली आहे म्हणोन सांगत होता.

१ भोसले याजपासी बंगाल्यातील बैका च्यार नग्न आहेत. त्या सामील होऊन म्हणे पडले, आपण इंग्रजासी लढाई घ्यावी. त्याचा दारूगोळा तुम्हावर विद्याचे सामर्थ्ये न चाले ऐसें करितो, म्हणोन जवळ येऊन राहिल्या आहेत.

१ छ १ तारखीची अखबार रवाना केली ती येऊन पोहोचलीच आशील.

मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे. बंदगीस रोशन हंथे हे अर्जदास्त:

¶*Balawantrao Bapuji the news-writer supplies Elphinstone with information received from various quarters in connection with the activities of the principal Maratha Sardars. He reports how mortified Daulatrao Sindia feels for not helping the Peshwa in his struggle against the English.*

---

*No. 247*] [*2-12-1818*

तारीख ५ माहे दिशंबर
सन १८१८ इसवी मुता-
बीक छ ६ सफर.

**श्री.**

हजरत खुदावंदन्यामत सरदार अलीशान खुदायगा
**नवाबसाहेबलबाहादुर याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तसलिमात कुरनिशात बाज्या आऊर दे मारूज मे रसानद आंके येथील खैरसला. अखबार देवरी मुकाम फलटण तो छ २ माहे दुजंबर सन १८१८ इसवी मुताईक छ ३ माहे सफर म १२३४ रोज बुधवार पो येथास्थित असो विशेष. इकडील मार :

१ रामेश्वराकडोन व श्रीव्यंकटेशाकडोन यात्रा आली त्यात भाडकरी म्हाळू बनगर आला तो सांगत होता. सोजर लोकाचे फलटण दोन कडप्यावर आले म्हणोन तिकडे बोलत होते. तीन बागची खबर आहे. धारन आठ पायली धान्ये आहे.

१ हजरत जनराल इस्मिनसाहेब लस्करसुधा सोलापुरावरून इज्यापुराकडे गेले व काही मंगळवेढ्यावर लस्कर होते तेहि तिकडेच गेले म्हणोन बातमी आली.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब भा वा ९ ते दिवसी कोन्ही येका क्षेत्रास जात होते. भरतपुरानजीक किला होता तेथे मुकामास गेले. तो किला सिंद्याकडोन आपणाकडे होता. सुभेदार पहिलाच होता त्याचे स्वाधीण केला होता. आतून पत्रे सिंदे याणी किलेदारास पाठविले होते, श्रीमंत तेथे

आल्यास मेजवार्णीकरिता किल्यावर घेऊन जाणे तो आम्हीहि काही सरंजाम पाठऊन देतो. त्यावरून मेजवार्णास घेऊन गेले. सरंजामहि जाऊन पोहोंचला. त्याणी श्रीमंतास घेऊन गेले. म्हणोन येथे बोलत होते.

[ पुढील २ कलमें गाळलीं. ]

१ रिजमिटसाहेब बडे लस्कराहून चटकरी आा ६ व नाईक आा १ यो सात, साहेब लोक आा ७ लस्करात पोहोचाऊन पुण्याकडे जाण्यास का मार्गी आले. त्यास बगार्गा आा ३ व तट्ट १ आजागी यास दिल्हे. [ पुढील ६ कलमें गाळलीं. ]

१ छ २९ तारखींची अखबार रवाना केली तो पोहोचलीच आशेल.

१ इज्यापुराकडोन डाकेवर पाकीट मेजर वारनसाहेब याचे नावे छ ३० तेरखेचे आज तिसरे प्रहरी आले. येथील डाकवाल्यानी आमचे हावाली केले. त्याचे म्हणे, आम्हास लस्करची खबर नाही, माघारी लाविती त्यावरून जासुदापासी पाकीट देऊन रातोरात जाऊन पानाचे निंबगावाकडे लस्करची खबर होती तिकडे पावते करावे म्हणोन सांगितले आहे. मार साहेबाचे खिजमतीत लिहिला आहे. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶Balawantrao Bapuji the news-writer communicates to Col. Bail that two detachments of the English forces are encamped at Kadappa, and that Bajirao has occupied the fort of Bharatpur which the Sindia had transferred to the British.

---

*No. 248]* *[11-12-1818*

तेरिख १२ दिसेंबर

सन १८१८ इसवी मुा

छ १६ सफर.

**श्री**

**हजरत खुदावंदन्यामत सरदार अलीशान खुदायगा**

**नवाबसाहेबलबहादुर याचे खिजमतीत**

अर्जदास्त फिदवी बलवंतराव बापूजी बादबंदगी आदाब तस्लिमात कुरनिशात बज्या आऊर दे मारूज मे रसानद आके येथील खैरसला. अखबार देवटी मुकाम फलटण ता छ ११ माहे दुजेंबर सन १८१८ इसवी मुताबीक छ १२ माहे सफर सन १२३४ रोज शुक्रवार पा येथास्थित असो विशेष. इकडील मार :

१ सिंदे याचे लस्करातून हालकार आा २ रा हिंदुराव घाटगे याजकडील म्हणोन सांगतात. कागलास जावयाचे म्हणून बोलतात: त्याजपासी सरकारचे

दस्तक इंग्रजी हरप व पारसी हरप, वरती सिका थोर होता. गाल्हरी सोडोन येक महिना जाहला म्हणोन सांगत होते. त्याणी वातमी सांगितली त्यावरून हजरत कर्णेल कणिंगमसाहेब याजकडे हालकारे पाठऊन दिल्हे.

१ सिंदे याचे लस्करात फितुर जाहाला होता। त्यामुळे बागेतच स्वाशे आहेत म्हणोन सांगत होते.

१ ज्यान बतिस्मी कैदेत आहेत म्हणोन सांगत होते.

१ कारभारी रा। बाबा पाटणकर व रा। हिंदुराव आहेत म्हणोन सांगत होते.

१ कंपू ४ पलटणे पाटणकर याचे दिमतीस आहेत म्हणोन सांगत होते.

१ कलकत्याहून हजरत सिकंदरसाहेब वीस पंचवीस पलटण घेऊन आले होते परंतु माहामारीचे उपद्रवामुळे माघारी गेले म्हणोन सांगत होते.

१ आपला व सिंदे याचा सिकलासच आहे म्हणोन सांगत होते.

१ गोरख्याचे राज्याची लढाई जाहाली होती म्हणोन सांगत होते.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब पोखरनीवर (पुष्कर) होते; बरोबर दोन पलटणे आहेत भरतपुरास काही गेले नाही म्हणोन सांगत होते.

१ भरतपुरकर जाट याची फौज व लाहोरवाले सीक याचा पुत्र सामरीक होऊन, लाहुरवाले सरंजामानसी भरतपुरास लढास येतात. याकरिता आपल्याकडील पलटणे सतरंजे नदीवर आहेत. थोडे सरंजामानसी येथे म्हणोन नट पडला आहे. सांगत होते.

१ होळकर इंदुरावरच पंचवीस तीस हजार फौजनसी आहे म्हणोन सांगत होते.

१ नागपुरवाल्याची लढाई जाहाली म्हणोन फकिर ऐसे सांगत होते.

१ हालकारे याजपासी लखोट्याची थैली व सुले लखोटे ३ होते म्हणोन साहेबाकडे पाठविले.

१ सिरासपर्चे पलटणे भरतपुरावर आहेत म्हणोन सांगत होते.

१ आपल्याकडील पलटणे जागाजाग आहेत म्हणोन सांगत होते.

| | | |
|---|---|---|
| १ | बाजीरावसाहेब याजपासी पलटणे | २ |
| १ | गाल्हरीवर पलटण | १ |
| १ | इंदुरावर पलटणे | ४ |
| १ | सावलावर पलटणे | ४ |
| १ | मालेगानावर पलटणे | ४ |

—

सदरहू मजकुराची अखबारी नजीक साहेब आले त्यास लिहीली आहेत.

[ पुढील १ कलम गाळले. ]

१ कालचा मुकाम जनराल इस्मितसाहेब याचा लस्करसुधा मौजे कन्हेर इसलामपूर येथे आला आहे म्हणोन बातमी आली.

१ आजचा मुकाम मौजे सामवड पो फलटण येथे कर्णाल काणिगमसाहेब याचे लस्करचा जाहाला आहे.

१ मेजर बानरसाहेब याचे लस्करचा मुकाम नरसिव्हपुरावरच आहे म्हणोन बातमी आली.

१ छ ८ तारखेची अखबार रवाना केली ती येऊन पोहाचलीच आसेल.

मार साहेबाचे खिजमतीत लिा आहे. बंदगीस रोशन होये हे अर्जदास्त.

¶[*Balawantrao Bapuji the news-writer supplies Elphinstone news received from various quarters in connection with the activities of the Peshwa, the Sindia, the Holkar and the Jat of Bharatpur.*

---

*No. 249*] [*12-12-1818*

तारीख १२ दिसंबर मार्गसीर्ष

श्री

याद्री अर्ज अनंदराव यशवंत साहेबांचे शेवसी एसीजे. सर ज्यान जनरल मालकंसाहेब बहादुर याचे शेवसी. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांणी तहाचे कामास पाठविले त्यावरून साहेबाचे मर्जीनरूप चाकरी केली. यावर कपितान लौह साहेब बाहादुर यांचे दरम्यानगीने जनरल साहेबानी बोलविले जे, तुमचा बंदोबस्त अगोद्र नंतर बाजीरावसाहेबांचा यासी हुकुम जाल्यावर शेवकाने अर्ज केला जे. माझे इतमाम ख्वाजम्यानिसी कंपनीसरकारातून बरदास्त व्हावी. त्यास उतर जाले की जो तुमचा मनोदय त्याप्रमाणेच होऊन येईल. नंतर शेवकाकडून चाकरी व्हावयाची ती जनरल साहेबांचे मर्जीनरूप जालियावर श्रीमंत बाजीरावसाहेब यांणी जनरलसाहेबापासी मजला ठेऊन मंदुसरचे मुकामीहून पुढे रवाना जालियावर साहेबांचे बराबर माहो छावणीस आलो. त्यानंतर जनरलसाहेबांचा हुकूम जाला जे तुम्ही खुदावंत न्यामत बडेसाहेब बहादूर साहेबाकडे जाऊन पुण्यास असावे. ते समई मी अर्ज केला की पुण्यास जावयाविसीचा हुकूम होतो तरी माझी चाकरी साहेबानजीक जाली त्यापक्षी साहेबाचे मेहरबानगी करून आपणाजवळ ठेवावे. नंतर बोलिले जे, तुमचे बरे होणे असे आहे तर माजा हुकूम मान्य करून तुम्ही बडेसाहेबाकडे जावे आणि तुमचा बंदोबस्त करण्याविसी मी पत्रहि देतो. साहेब तुमची बरदास्त चांगली करतील. त्या हुकुमास मान्य करून इकडे रवाना करितेसमई पुन्हा सांगितले जे तुम्ही कोणेयेकविसी फिकीर करणे गरज नाही. तुम्ही बहुतावर येहसान कराल ऐसा तुमचा बंदोबस्त बडेसाहेब

करून देतील. माझी जबान आजपरियंत दुनियात खाली जाली नाहीं आणि पुढेहि होणार नाही. याप्रो। खातरजमा करून बडेसाहेबांचे नांवे पत्र व घोडा व पोशाख व हजार रुपये वाटखर्चास देऊन इकडे रवाना केले. नंतर येथें येऊन दाखल जालेसमई बडेसाहेबांची भेट घेऊन पत्र दिल्हे, नंतर बडेसाहेब बहुत मेहरबान होऊन हकीकत पुसोन ज्या प्रो। जनरेल साहेबानी मेहरबानगी केली त्या-अन्वये साहेबानीहि खातरजमा केली आणि सांगितले की तुमचा बंदोबस्त पिं ज नें रा त (?) करून देऊ. त्यावर दुसरीया भेटीस खर्चाविसीं अर्ज केला तो हजार रुपये मोघम खर्चास दिल्हे. नंतर दीडा महिन्यांचे अवकाशे आमचे लग्नाची स्थल-योजना होऊन आली, त्यासमई साहेबास अर्ज केला तो दोन हजार रुपये बक्षीस म्हणोन लग्नास दिल्हे. त्यावर राहावयास घरहि दिल्हे. नंतर कर्नाटकप्रांती जलमार्गे साहेबांची स्वारी गलियावर बेलगांवचे मुकामी जाऊन भेटलो तो बागवाडचे मुकामपावेतो स्वारीबराबर होतो. तेथें पुण्यास जावयाविसीचा हुकूम होऊन पाचशे रुपये मोघम खर्चास देऊन इकडे रवाना केले. पुणे मुकामी स्वारी आल्यावर भेट घेऊन अर्ज केला तो हुकूम जाला कीं तुमचा बंदोबस्त लवकरच होऊन येईल. त्यावर आम्ही स्वस्थ राहून साहेब सार्‍यावर मेहेरबान होतात त्याअन्वये आपलाहि बंदोबस्त होईल या इरादानें दरबारी येऊन हाजरी मात्र देत गेलो. पुढे बडेसाहेब मुंबईस जातेसमई सांगोन गेले की साहेब तुमचा बंदोबस्त पिंजनेरात करून देतील. त्यास साहेब मेहेरबान होऊन सेवकांचा बंदोबस्त जनरेलसाहेबाचे व बडेसाहेबाचे मेहेरबानगीनरूप होऊन यावा. साहेबाचे मेहेरबानगीच्या इरादावर आजपरियंत खर्च खाऊन कर्जदाराचे पेचात सांपडलो व दिनचर्याहि लोटणे कठिण. ऐसियास कर्जदाराचे पेचातून काढोन खर्चास देण्याविसी हुकूम व्हावा. हे अर्जदास्त.

¶*Anandrao Yashwant writes to Malcolm requesting him that he should be granted pension for his loyal services in carrying out successfully negotiations about the submission of Bajirao. The writer's surname was Chandavarkar. He was deputed by Bajirao to visit Malcolm and negotiate terms for his submission.* (*See No. 270.*)

---

*No. 250*] [*1818*

**श्री**

यादी बापूजी भिकाजी भाव्ये याचे बोलणेची कलमे :—

१ साहेबाचे चाकरी पेशजी केली, त्याची अर्जी माधवराव याजकडे येऊन, त्यातील मजकूर विदित होऊन, आमची गरिबीवर नजर होऊन, सदरहु फडशाची आज्ञा होऊन कलमाकलमाची अभय दिल्याप्रमाणे बंदोबस्त करून द्यावा. कलम

१ साहेबाचे राज्यात फंदफितूर होता म्हणौन अर्ज करावा तर खलबत खान्यात येऊन बोलावे. त्यास साहेबाचे नजरेस पडोन अर्ज केला तरी समक्ष बोलणे होत नाही; त्यास येविसी मदतखर्च ऐवज लागतो. त्यास कांहींच न बोलता राहिले तर येकवेळ सरकार राज्यात बखेडा होऊन मसलत खर्चाखाली बहुत पडोन, बंदोबस्त करावा लागेल, अथवा शास्त्रीबावा समक्षता जाहाले हे पाहून मनात भय धरून, साबाचे बरे व्हावे म्हणौन चिंतन करीत बसलो; परंतु आमची कामकाजे उलगडोन न दिल्ही. तर साहेबाचे वचन आहे, म्हणून आज बारा महिने स्वस्त आहे. राज्य-कारभार अशाश्वत जाणून बहुतावर दया केली. त्यातून किंचित आमचे उपयोगी येकवेळ साहेब दिलखुसीने राज्याचे कामात राहिल्यास होईल; परंतु बखेडा जाहाला तर आमची बोलणी स्मरणात राहाणार नाही; येविसी आमची गाठ पडोन आज्ञा व्हावी. कलम १.

१ करवीरास श्रीमाहालक्षुमीस दर्शनास आम्ही जाणेचा वगैरे बहुत दिवास नवस केले, त्यामुळे जरूर जाणे आहे; येविसी कुटुंबसुधा आज्ञा घेऊन जातो.

---

३

¶[*Bapuji Bhikaji Bhate who worked as a spy or news-supplier to Elphinstone asks remuneration for his services.*

---

*No. 251*] [*1818*

श्री

यादी कलम

१ त्रिंबकजी डेंगले याजकडे सरकारची बाकी बहुत आहे. त्यास डेंगले यास वसंतगडास नेल्यापासून जोपर्यंत मामलती कायम होत्या तोपर्यंत वसूल आला तो व मामलेदाराकडे हवाले यावयाचे होते ते व यैवजाच्या चिठ्या आल्या होत्या त्या त्या ज्याच्या त्यापासी राहिल्या आहेत. मामलेदार बहुतकरून घरचेच कारभारी वगैरे आहेत, याची चौकसी करून यैवज घ्यावयाचा. कलम १

१ डेंगले यास वसंतगडास नेले त्याचे पूर्वे दिवसी चेवेचालीस हजार येकशे पस्तीस होन घोड्यावर घालून किले नाथवडा येथे निंबाजी जाधव घेऊन गेला. पुढे किल्याची घालमेल जाली त्या समई फलटणास घेऊन जाऊन जानराव नाईक याजपासी दिल्हे, त्या पो। च्यार हजार होन फलटणांत साहुकाराकडे मोडले. कलम

१ डेंगले याणी बंड केले त्या समई विंचूरकर याजकडे डेंगले याची जप्ती सांगितली. त्याणी कारकून निंबाजी जाधव याचे जप्तीस फलटणास पाठविला.

त्या समई निंबाळकरानी तीन हजार रुपये दरबारखर्च विंचूरकराचे कारभाऱ्यासी देऊन आमचे वाटेस जाऊ नये व चौकसी करूं नये याप्रो ठराव केला. आणि तेथे येका महस्ताचे घरी च्यार हजार रुा सापडले ते व अडचा हजाराचे दागिने घेऊन आले आणि कारकुन उठऊन आणिला। निंबाजीचे घर वाई नजीक आहे. तेथून दीड हजाराचे दागिने आणिले. कलम

१ डेंगले यास इंग्रज बाहादर मागू लागले त्या दिवशीं डेंगले आलदीस गेले होते. दुसरे दिवसी घरी आल्यावर घरातील सोने रुपे व रोकड व कापड हरि भगवंत व श्रीपति जामदारखान्यावर होता याणे व रायाजीपंती घरातून बाहेर नेऊन ठेविले. कोणाचे घरी ठेविले ते समजले नाहीं, रात्रो काढिले. कलम

१ गंगाधरशास्त्री यास मारिला सबब डेंगल्यास वसंतगडास नेला त्याचे दुसरे दिवसी हरि भगवंत याणी खंडू सिदा व गंगाजी खाटीक यास किले नाथवडा येथे अटकेस नेऊन ठेविले. कारण शास्त्री याच्या घरी नेहमी बातनीवर होते, हे कोण्हाजवळ बोलतील सबब ठेविले. पुढे किल्याची घालमेल जाली तेव्हा दोघास फलटणास नेले. ते कटकटीस येऊन बोलू लागले की शास्त्री मारिला त्या बातनीस आम्ही होतो म्हणोन तुम्ही अटक करिता. त्यास दाजीबा डफळा याणे मारिला. आम्ही बातनीस मात्र होतो. आम्ही लोकास सांगतो तेव्हा गंगाजी विडवई जामीन घेऊन मोकळे केले. पुढे त्रिंबकजीने बंड केले तेव्हा याजकडे जाऊन त्या समागमे होते. हली गंगाजी रावीण साहेबाकडे चाकरीस आहे. कलम १

१ नाथवड्यास कारकुन मुकुंदराव होता त्याजपासी हरिभगवंताचे पत्र दस्ता-येवजी आहे व त्यास माहीत आहे. कलम १

१ डेंगले यास धरले त्या दिवसी सरकारची सिलक होती ते हरि भगवंत याणी आटोपिली. त्याची चौकसी करून घ्यावयाची.

१ त्रिंबकजीचे मंडळीची जती विंचूरकर याणी केली ते जमीचा येवज सरकारात श्रीमंत येथून निघत तोपर्यंत दिला नाही व श्रीमंतानी मागितला नाही व याणी श्रीमंतास समजाविला नाही. कलम.

१ अमदाबाजची मामलत नारबा ताकटे याजकडे व कर्नाटक हेवती जगथाप याजकडे. त्याजकडे सिलका व थानाले (?) जाल्यावर बसता तसीच आहे. कलम १

सदरहूची चौकसी करून मुद्दे अंगी लाऊन येवज न घ्यावयाचा असिलियास आज्ञा जाल्यास करू.

¶*This paper mentions, among other items, some details of the murder of Gangadhar Shastri, the imprisonment of Trimbakji Dengle and his accomplic s and the confiscation of their property.*

7220

No. 252] [1818 ?

श्री

यादी मणीराम लाला याची कन्या, तिचे नाव राधाबाई. तिसी बाजीराव साहेब यांणी लग्न कटारसी यथाविधि लाविले. त्ये बाईस तीन पुत्र जाले आहेत. बाईचे खर्चास बाजीराव साहेब दरमाहा रुपये १०० शंभर भोजनखर्च खेरीज शागीर्दपेशा वगैरे खर्च जो लागेल तो परभारे सरकारातून देते होते. या प्रमाणे चालत आले. नंतर लढाईचे गडबडीत सिव्हगडाखाली गेली तेथे वित्तविषय लुटला गेला. नंतर मौजे आगलंबे सुधा पुणे येथे येऊन राहिली. हजरत बडे-साहेब बहादुर यासी पुणे मुकामी मुले येऊन भेटली. खर्चाचा बंदोबस्त करून घ्यावा तो साहेबांनी स्वारी करणाटकात गेली. अवसर पडला नाही. पुढे लू साहेब यांचे कानावर मारार कारकुनानी घातला तेव्हा लू साहेब मुकाम मजकुरी बाईकडे आले. भेट होऊन मारार समजोन घेऊन बाईची अर्जी घेऊन गेले, ते हजरत चापलीन साहेब बहादुर यास समजाविली. साहेब याणी तो अर्जी आपले चक्रीत घाढून बडेसाहेब बहादर यांचे नावे चक्री लू साहेब यांचे स्वाधीन केली. ती त्यानी बाईचे कारकुनाचे स्वाधीन करून कारकुनावरोबर बडेसाहेब याजकडे पाठवावी म्हणोन सांगितले. याजवरून ती चक्री बाईनी आम्हावरोबर देऊन आम्हास १५ पाठविले. आम्ही ती चक्री बडेसाहेब यास दिली. नंतर आज्ञा जाली की [illegible] उत्तर चापलीन साहेब तुम्हास देतील. त्याजवरून साहेबाकडेस आलो. साहेबांनी कृपा करून बाईचा व मुलाचा खर्चाचा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे.

*¶ Radhabai a daughter of Maniram Lala informally married to Bajirao II applies to Chaplin for maintenance of herself and her children May this Maniram be a relation of Sumersing Gardi ?*

No. 253] [1818 ?

आखबार सुभे खानदेश सरहाद बागलान गिरनातीर. टकडील कैफियत ममईकडून तीन हाती आयेन्याचे भरून कपतान ज्यान ब्रिगसो बाहादर धुल्यास बंगला बांधितात याजकरितां गेले आहेत. चिमा आपासो जे समई हिंदुस्तानात गेले, त्याजला जमेयत पोहचावयास गेली होती, त्याजपो आडाचसे स्वार माघारी उलटून छ मजकुरी मालेगावी मुकामास आले आहेत. मग पुढे कोणीकडे जातील हे न कळे. कपतान ज्यान ब्रिगसाा बाहादर याचा मुकाम धुल्यावर आहे. करणेल हासकिसनसो बाहादर याचा मुकाम सरंजामसुधा आमलनेर नजीक

आहे. जरनेल दपटीनसाो बाहादर याचा मुकाम मेसरंजामसुधा व आणीकहि फौजा ऐसे वऱ्हानपूरनजीक मुकाम करून आहेत. दक्षनेतून कोन्ही सा। समागमे तीन च्यार हाजार सरंजाम तो १८ रोजी येऊन कासारबारीचा घाट उतरून खानदेश प्रांती कुंजर म्हणोन गाव आहे तेथे मुकामास होते. वऱ्हाणपुराकडे जाणार म्हणोन वदंता एकतो. राज गु॥ पाऱ्होळ्याची चकती आली ती खिजमतीस पाठविली आहे; पावल. ज्यादा काय लिहिने, महरबानगी करावी, हे बंदगी.

¶*News of the movements of the various British Officers stationed in Khandesh is sent by the writer.*

---

*No. 254*] [*June 1818*

१ बाजीराव तीनसेनिसी जनरालच्या जवळ गेले.

१ विंचूरकर परत आले.

१ पुरंधरे नसिगवादेस आले १०००.

१ मीर फाजलआलीचे पुत्र पारोल्यास आले १००.

१ केर साहेब पुणे याचे स्वार १५०० कर.

१ वर साहेब पारोले येथे आहेत.

१ येथूनच चकत्या पा। ने जागृद भिल्लानी लुटले.

१ दफटीण साहेब देवळस गावाकडून जाल्याकडे गेले.

१ रवण साहेब माल्लेगांवास आहे. अमळनेराकडे शहर आहे.

१ राजमरा तीन महिने पावला नाही.

¶*The paper mentions Bajirao's surrender to Malcolm and the disbanding of his generals. It also gives the movements of forces under some English Officers.*

---

*No. 255*] [*3 June 1818*

एजंट रुमाल ३२

**श्री**

दरखापनामा जनरेल सर ज्यान मलकमसाहेब बाहादूर याचे श्रीमंत बाजीरावजीसी आहे जे तपसील कलमबंदी:—

१ श्रीमंत बाजीरावजींनी आपणाकरिता व आपले मुतालिककरिता सरकार पुणेची रियासत व जितके हक पादशाहाचे असतील तितुके सोडणेस कबूल व्हावे. जलदीने मलकमसाहेबाचे लस्करास यावे.

२ दुयम कलम श्रीमंत बाजीराव याणी आपले नोकर चाकर बाइका याचे मुध्धा जितुके येतील तितुक्यासहि माहाफिजतीनें लस्कर देऊन मलकम साहेब याणी पाठवितील व हिंदुस्थानी कासी व प्रयाग व आणखी तीर्थेचे जागा कोठे राहावें म्हणतील तेथे याचे खातरीकरिता गौरनर जनरेल याणी कबूल करवितील तें होईल.

१ तिसरे कलम हे गोष्ट श्रीमंत बाजीराव याणी जलदीन करावे. येक दिवसाचे देर न करावे. काय सा म्हणजे दक्षणचे मुलूकचे आरामी व्हावे. येकावे त्याचे बायका व इलाखेवाले कोणी माघार होतील तर त्यासहि बहुत खुषी व आरामीकडून येऊन पोचणेस मलकमसाहेब याणी रवाना करितील.

१ चौथा कलम सदरी लिहिल्याप्रा श्रीमंत बाजीराव याणी खुषीचे तौरेने व बहुत जलदीचे तौरेने कबूल करितील तर अलबता कुंपिणी सरकारातून मदत माप त्याचे इलाखेवालेसुद्धा बुजरुग जे चालवणेस मोकरार करून देतील. मोबलग हे गौरनर जनरल ठरवितील. तूर्त मलकमसाहेब याणी आठ लाख रुपये सालीयाना उणे होऊ देणार नाही येवढें करवितील.

१ पाचवा कलम श्रीमंत बाजीरावजीनी ख्यत्यार चांगले येकत्यार केले म्हणोन कुंपिणी सरकारात खातरजमा होईल तर कोणी जाहागिरदाराकरिता व पुराणे लोक त्या सांघाते खराब जाहले त्याकरिता व आपले खांदानाचे नावावरी काही गाव वगैरे ब्राह्मणभट वगैरे चालत आहे त्या लोकाकरिता पैगाम लाऊन सांगतील तरी अलबता त्याचे खातरीकरिता गौरनर जनरल याणी मेहेरबानी करितील.

१ कलम साहावा सदरी लिहिल्याप्रा कबूल करणेस हे खत पोचले बादज २४ घटेचा वाइदा दिल्हा आहे, तर तितुकेच मलकमसाहेब याचे लस्करात श्रीमंतानी येऊन हजर व्हावे, या कबुल तरी करावे. दोनहि न होता वाइदा चुकेल तरी लढाई नमूद आहे. मागून सवाल जबाब होणार नाही.

---

६

सदरहू कलमे साहा

इंग्रजी अक्षराची ओळ येक असे

¶*Terms of surrender dictated by Sir John Malcolm to Bajirao Peshwa in 1818 and accepted by the latter are mentioned in this paper probably by Anandrao Yashwant (cf. No. 249).*

No. 256]　　　　[1818

श्री

यादी मजकूर बोलावयाचा

१ श्रीमंत सौभाग्यवती बाईसाहेब याची प्रकृत विगडल्यामुळे बराणपूरास राहणे जाले, हा मजकूर कलवावा म्हणोन ब्रम्हावर्तास हुजरे पाठविले. तेथून प्रकृत नीट नसिल्यास इकडे येणे प्रशस्त नाही असी आज्ञा आली. त्याजवरून येथे राहून आवपधी उपाय बहुत केले, परंतु ही हवा मानत नाही. त्यास वाईस अथवा पुण्यास राहून प्रकृत नीट जाहाल्यानंतर जाव असे मनात. त्यात आपले विच्यारे तेथील आज्ञेसिवाय निघोन गेले असता तेथे आमचे खर्चाविचाचा बंदोबस्त तिकडून जाल्यास ठीकच आहे. न जाल्यास आपण करून द्यावा.

१ पेशजी खर्चास दिल्हे त्यास देर्माहून इकडे येता सिबंदी खर्च व भाडे वगैरे खर्च जाला. पुढे जाण्याचा बेत जाल्यास खर्चाची तरतूद करून द्यावी.

कलम

२

¶[*The entry refers to the illness and consequent movements of the wife of Bajirao II. She wishes to return either to Wai or Poona from Burhanpur where she got ill on her journey to join her husband at Bithur.*

No. 257]　　　　[1 April 1819

तारीख १ अंप्रेल चैत्रमास

श्री

यादी विठलराव गोपाल तांबे यांचा मजकूर. हुजरातीत रामचंद्र गणेश यांचे स्वारीत दोन तिनसे लोकानिसी सरकार चाकरी केली. तेव्हा चवरी अबदागीर व तीन हजार रुपये तैनात जाहली. नंतर बदामीचे स्वारीस च्यारशे लोक होते. उपरांतिक हिंदुस्थानात अलीबहादुर याचे स्वारीबरोबर तीनसे लोकानिसी अर्जुनसिंगाचे लढाईत सर्वापेक्षा कामकाज जाहाले. तेव्हा अलीबहादुर याणी पुण्यास सरकारात नाना फडणिसास वर्तमान लिहून सरकारची आज्ञा आणऊन पागा व पथकाची वस्त्रे दिली. नानाचे हातचे पत्रच आहे. नंतर तेजसिंगाची लढाई वीस हजार फौज गोहडेवर जाऊन हला केला. दोन हजार मनुष्य ठार व जखमी जाहाले आणि हला माघारा फिरला. तेव्हा गोविंदराव बारावकर याचा हती रांगड्यानी नेला.' याचकरिता बारावकर व आम्ही लोकसुधा राहून हती आणला

तेव्हा पाच हजार रुा तैनात व पालखीची वस्त्रें आलीबाहादुर याणी दिली. त्यास लोक चांगले बाळगले याजमुळे चाळीस हजार रुा सावकाराचे देणे जाहाले. बारा हजार रुपयाचे गांव पारगेस व जानीस तिकडे होते. घरीहून जाऊन दाहा वर्षे जाहाली.' याजकरितां अलीबाहादूर यांचा निरोप घेऊन श्रीमंत रा बाजीराव साहेबास व नाना फडणिसास पत्रें घेऊन देसी आलो. पत्रें देऊन पांच वर्षे हुजूर चाकरी केली. खर्चास पावत गेले व वराता दिल्या. काही एवज पावला. होलकराचे लढाईचे पूर्वी बोलणी जाहाली. पारगेचे खर्चे मनश्वी तीस रुा रावती शेरा घेऊन चंदी बारगीर वगैरे खर्च संभाळावा. तेव्हां आम्ही उत्तर केले, पाचशे रुपयावर बारगीर ठेवावा लागतो तेव्हा कामकाज लढाईत होते. हलके मनुष्य गरज नाही. असे जाबसाल होऊन अबरू मिळविली नी जाईल असे समजून आठ धरून माहुली क्षेत्री घरी राहिलो. ग्राट साहेब सातारियात होते त्याची भेट घेऊन मजकूर सांगितला. श्रीमंतासी आठ धरून पंधरा वर्षे घरी राहून खराब जाहालो. शेदोनशे लोकानिसी हती देऊन श्रीमंतास समजेल असे बोलगावे. या बोलण्यास जेष्ट मासी दोन वर्षे होतील. ग्राटसाहेबानी आमचा मजकूर बडेसाहेब पुण्यास आल्यावर त्यास लिहिला आणि भाद्रपद मासी ग्राटसाहेबाबरोबर पुण्यास येऊन बडेसाहेबाची भेट जाहाली. बोलणी जाहाली. बडेसाहेब मुंबईस गेले तेव्हा सांगितले, मागे येथे साहेब आहेत हे तुमचा बंदोबस्त करून देतील. त्यास पंचवीस मनुष्य कुटुंबाचे, त्याचा निर्वाह जाहाला पाहिजे, व नित्य सावकाराचे तगादे. वैशाखमासी दोन कार्ये घरी होणार याचा निर्वाह सरकारातून जाहाला पाहिजे.

¶*Vithalrao Gopal Tambe recounts his past loyal services to the Peshwas and says how he remained at home in disgust and then approached Capt. Grant with a request for pension. He prays that his application be entertained and he be given some help for his maintenance.*

---

*No. 258]* *[1820 ?*

जनराल डिपार्टमेंट नामजूर

**श्री**

**श्री सरकार गोवरनेल साहेब बाहादूर**

**साहेबाचे शेवेसी**

आर्जी विनंती शेवेसी बापोजी बिन यशवंतराव लाड मौजे वाठार बुाा प्रांा सिरवळ कारणे साहेबाचे शेवेसी आर्जी लेहून दिल्ही येसीजे. कैलासवासी येशवंतराव लाड किले आसेर येथील किल्यावरून उतरते समई साहे(बा)नी त्यास वचन दिल्हे

होते की तुम्ही आलिज्याबाहादर दवलतराव सिंदे याचे लस्करात जाणें. जाते वेलस त्यास आज्ञा केली की तुमचा बंदोबस्त आलिज्याहाबहादर करून देतील. त्यानी करून न दिल्यास आम्ही करून देऊ म्हणून वचन होते. तेथे गालेर मुकामी आलिज्याबादर यानी बदोबस्त करून दिल्हा नाही. आम्ही घरास वाठार मुा आलो. नंतर यशवतरावबाबा वरीसभर होते. नतर त्याचा काल जाला. त्याची आस्ता साहेबापासी वहुत होता की माझा बदोबस्त साहेब करून देतील. त्यानंतर भेट होऊन बंदोबस्त जाला नाही. आता या प्रसगी राजश्री नानाजी निगडे देशमुख येऊन विनंती करतील ती साहेबांनी ध्यानात आणून मुले लेकरे मौजे मारी आहेत यास दरसाल खर्चाचा बंदोबस्त करून देणियाविसी आज्ञा व्हावी. आम्हास आधार सर्व प्रकारे पृथिवीपति आपण आहेत. कलेल त्याप्रा बंदोबस्त करून द्यावा. कलावे हे आर्जदास्त

पत्र लिा

हुकूम की नवीन पेन्शन देऊ सकत नाही.

¶*Bapoji Yashwantrao Lad applies to the Governor (Elphinstone) for a pension as promised to his father when he handed over the fort of Asher in April 1819. Yashwantrao died a year after. The Governor replies that no new pension could be allowed. Yashwantrao Lad a Maratha of Wathar was the trusted officer of Daulatrao Sindia in charge of Ashirgarh.*

---

*No. 259]* *[3-12-1820*

तारीख ११ माहे दिसंबर
मार्गसीर्ष मुा तिकोटे

**श्री**

अर्जदास्त रंगो बापूजी आमील पो नंदुरबार सन १२३० फसली एसीज. साहेबी हुकूम केला की सन २७ चे साली पो नासिक येथे तुमचा मामला होता ते समई मौजे लाखनगांव पो नासिक हा गांव वीस वर्षे चालत नसता तुम्ही सोडिला, त्यास आधार काये ? कशावरून सोडिला हे सांगणे म्हणोन हुकूम केला. ऐशास तेथील हकीकत नरी सन २७ चे साली महतपुरची लढाई जाहालियावर कपतान ज्यान ब्रिगसाहेब बाहादुर याचे पत्र उजनचे मुकामीहून भैरालभाऊ यास व मजला बोलावण्याविसी आले. त्याजवरून मी पुणियाहून निघून पुणतांब्याचे मुकामी येऊन साहेबबहादुर याजपासी हाजर जालो. नंतर लस्करचे कूच होऊन औरंगाबादेस गेले. मी बराबरच होतो. तेथून बाजीरावसाहेब याचा मुलूक सर करण्याचे ठरले. तेव्हा वैजापूरचे मुकामीहून माझी रवानगी फक्त येक जाहीरनामा मात्र पुणियाचा आला तो देऊन केली आणि गंगथडी वगैरे ठाणी बसवावयासी हुकूम जाला. ते समई सिबंदी कोणी मिळेना व कारकूनहि कोणी न मिळेत.

सर्व पेशव्याचे फौजेचा अंदेश घेऊन जमीदार व मोकदम व रयेत कोणी अनकूळ न होई. तेव्हा हरयेक मनुषाची खातरजमा करून मनुषे मेळऊन पो। नासिक व पो। कुंभारी व पो। पाटोदे व सिनर व पो। वण व पो। दिंडोरी व घाटाखालील पेठ हरसूल राज्याचे येथील ठाणी कायेम करून नंतर किले घेण्याची सुरवात केली. तेव्हा किला हतगड व रामशेज व देहर व बहुला व वाघेरा ऐसे घेतले. नंतर किले कावनई व गडगडा व त्रिंगळवाडी हे तीन किले पेशव्याकडील आमलात आमचे व्याह्याकडे होते. ते किले हस्तगत होईनात. तेव्हा कलेल त्या रीतीने त्याची खातरजिमा करून भेटीस म्हणोन बोलाऊन आणून धरून घेऊन साहेब-बहादुर याचे जवळ हजर केले आणि तिन्ही किल्यावर ठाणी कायेम केली. या प्रो। कितेक किले व माहाल लढून व कितेक फूस लाऊन घेतले. मधेमधे पेशव्याकडील फौजेची व रूपराम चौधरी याचे पलटणाची गांठ पडून तेथे छापा वगैरे घालून साहेबाचे प्रतापे पराभवाते पावविले व लूट तोफा वगैरे सरंजाम सापडला तो सरकार दाखल केला. हे सर्व इप्रेल महिना व मे महिन्याचे दाहा पंधरा दिवस परियेत माहाल घेणे जाले. ऐशास दरगोज स्वारी करून किले व ठाणी साहेबाचे प्रतापेकरून घेऊन कायेम केली. तशात मामलयाचे काम दरयाफ्ती[१] करून पाहाण्यास व किले घ्यावयास फुरसत येक क्षणाची नाही व मनुष्ये व कारकून कोणी येक ते समई मिळेनात व रयेत लोकहि कोणी जमीदार पाटील वगैरे हजर न होता अंदेशा पेशव्याचे फौजेचा धरून कोणी चाकरहि राहीनात असा समये. त्यात कोन्हासी काहो दिलदिलासा देऊन इनाम बक्षीस कलेल त्या रीतीने मनुष पाहून कबूलहि केली होती. तशात कोणत्या दस्तऐव-जानरु गाव दिल्हा म्हणोन विच्यारले, त्यास सरकारचा जाहीरनामा होता कीं कोणाचे वतनास व इनामास व वर्षासनास व देवस्थानाचे खर्चास व खैरातीस व कोणाचे ज्ञातिधर्मास खलेल न होता मुरलीत चालेल म्हणोन जाहीरनामा होता, त्या आधाराने सर्वाचे मनोधारण करून सरकारकाम चालवावे याजवर नजर देऊन काम चालवीत होतो. कोणी पेशव्याचे फौजेस सामील न व्हावे असा जाहीरनामा, त्यावरून कोणी कोणी मामलयाचे कामात माझा अमूक गांव मजकडे चालत आहे तो माझा मजकडे चालवावा म्हणोन कोणी येत होते. परंतु ते समई त्याची दरयाप्ती करावयासी फुरसत नाही. आपणास तर सर्वत्राचे मनोधारन रक्षून सरकारकाम करून घ्यावयाचे व बंड कोठे न होता ठाणी कायेम करावयाची याजवर द्रिष्ट देऊन वा जाहीरनामाहि पाहून व सरकारहुकूम की तुम्हास कलेल त्या रीतीने ठाणी हस्तगत करणे. त्या हुकुमावर जे कोणी गावचे चालत्या स्वारीत

१ ममजणूक, चौकशी.

येत गेले त्यास गावकरी यास हतचिठी देत गेलो की हा गाव याजकडे चालू देणे, असेहि कितेक गावास चिठ्या दिल्या. त्यास लाखनगावकर जाहागीरदारहि आले असतील. त्याणी मजकूर समजाविला असेल. ते समई याजकडे गांव आहे म्हणोन त्याचे सांगितल्यावरून गावचे मोकदमास हतचिठी दिल्ही याप्रा जाहले असेल. परंतु सनद कोणास लिहून दिली नाही व साग वमूल त्याजकडे पडला असेहि जाले नाही. जर ते समई अगर पुढे आठच्यार दिवसी जमीदार आथवा गावकरी येऊन सांगते कीं हा गांव याजकडे वीस वर्षे चालत नव्हता ऐसे याणी समजाविले असते तर बंद केला असता. ते समई त्याणी सांगितले नाही. पुढे दर्यामी करावी तरी माझी बदली जाली. त्यास माझा उपाय काये ? पुढे च्यार महिन्यानीं नगराकडे माहाल लागला, तेव्हा आग्वर साली दर्यामी व्हावी तीहि न जाली. झा पासून दीड मास पर्यंत वहिवाट होती. नंतर माहाल दुसरीकडे सांगून छोटे साहेबाचे तेनात महिनाभर होतो. नंतर मजला खानदेशात बोलाऊन नंदुरबाराकडे पाठविले. पुढे आगष्ट महिन्यात सरकारचा जाहीरनामा आला की वर्षासन व धर्मादाव व देवस्थाने व इनाम व धर्मार्थ गाव ज्याचे त्याजकडे चवकशी करून चालू देणे. ऐसे पेशजी मी कामावर होतो ते समई जाहीरनामा आला असता तरी मी चवकसी केली असती. त्या वेलेस जो मामलेदार होता त्यानी चौकसी करावयाची होती आणि चालवावयाचा नव्हता. त्यासहि दोन वर्षे जाली. आता मजला विच्यारिल्यास मजकडे दोष काये आहे ? साल तिगस्ता सन १८१८ नवंबर महिन्यात असेच येक नळगांव पो नासिक प्रकर्णी पुणियाहून लिहिले आले, त्याजवरून साहेबानी मजला लिहिले होते त्याचेहि उतर वास्तविक होते, ते मी लिहून पाठविले. त्याजवरून साहेब बहादुर याणी पुणियास लिहून पाठविले होते तेहि आपण पाहावे. आमची हकीकत वास्तविक जाली आहे ती साहेबास लिहिली आहे. याउपर हल्ली कोणी साहेबाजवल गैरवाका समजावीत असल्यास त्याची छयान करणार धणी समर्थ आहेत. मी जिवापेक्षा आधिक श्रम करून सरकारचाकरी बजाविली आहे. ईश्वर जाणत आहे व ग्वावंदसाहेबास माहीत आहे. तारीख ३ माहे डिजंबर सन १८२० इसवी हे अर्जदास्त.

¶*Rango Bapuji explains why he allowed the alienation of village Lakhangoan in the district of Nasik. He says he had to work at a time of great stress and turmoil and had hardly time to carry on detailed inquiries. He incidentally refers to the petty skirmishes that he had with the Peshwa's forces in the execution of his job. The early career of the writer who afterwards went to England and spent several years there in pleading the cause of Pratapsing of Satara, will be very welcome to students of history.*

7228

No. 260] [1820

श्री

अर्जी गणपतराव पाटील डेंगळे व कुसाजी पाटील डेंगळे मुा इहिदे असरीन मयातिन व अल्फ. आम्हास आलीशान गौरनर बंडसाहेब यांणी मेहरबानगी करून सार्ष्टाहून पांच आसाम्या मातुश्रीसुद्धा मौजे लिंबगाव येथे पोहचून दिल्हे. आमची मंडळी झाडून कौल दिल्हे नंतर आजपाा सर्वत्र येकया जागी साहेबाचे नेक नजरेकरीन सुखरूप असो. दरम्यान साहेबानी बरखुर्दाराची[1] परवेर्षी[2] जाली पाहिजे यास्तव अर्जी एकीन पुणेनील घरची मोकळीकहि केली. तणेकरीन तमाम मुलकात जाहीर जाले की डेंगळे यांचे ठाई मेहरबानगी आहे असे जाले. त्याजवरीन आजपाा मंडळीसुध्दा गुजराण जाली. कुंपणी सरकारातून झाडून अलम याची परवरीची बंदोबस्ती जाली, आम्हास मात्र नाही याजकरिता कदमास[3] जाहीर करण्याबाा पुणे मुकामी येवून हजीर जालो. खावंदाचे नेकनजर बरखुर्दाराची परवरी होत आहे. मौजे लिंबगांव ताा कोऱ्हाळे हा गांव होळकर याजकडून आम्हास प्रापंच खर्चास आहे. त्याच्या सनदा आहेत. तो गाव जत कुंपणी सरकारात आहे. त्याची दरयाफ्त करून मोकळीक व्हावी आणि आमची खर्चाची बेजमी जाली पाहिजे. आम्ही सरकारचे फक्त[4] खैरदीचे आहोत. मेहरबानगी करून बंदोबस्त करीन दिल्हेखेरीज खाविंदाचे कदम सोडीत नाही. साहेबाखेरीज आमची परवरी करणार दुसरे कोण आहेत ? खाविंदाची कृपा जाली पाहिजे.

*¶Ganpatrao and Kusaji Dengle, son and brother respectively of Trimbakji express their gratefulness to the Governor for the kindness shown to them and request him that the village Limbgaon granted in inam to them by the Holkar but which was confiscated by the Company should kindly be released.*

---

No. 261] [4-12-1821

पाा ४ माहे दसबर
सन १८२१ इसवी.
मुकाम नगर

श्री

**साहेब मेहेरबान अजम उइलियम**
**चापलीन साहेब बहादूर कमिशनर**
**सलाम हू ताला**

ॐ आर्जी सेवे विठल नरसी पानवलकर सलाम बादज आंकी येथील खुसी खैरयत जाणौन आसाहेबाचे खुसी लिहून दिल अराम करीत असावे दिगर. कुपणी

१ फळ खाणारा; उपभोग घेणारा. २ पोषण, निभावणी, परामर्ष. ३ पायाजवळ. ४ केवळ, निखालस.

सरकारचा अंमल जाल्यावर चाकरी करावी आणि आपल्या निर्वाहाचा काहींयेक बदोबस्त करून घ्यावा म्हणौन सातारियाहून मेहरबान राबिसन साहेबाकडे आलो. कस्त मेहेनत करून चाकरी केली. कुंपणी सरकारात किती येवज आला याची माहीतगारी साहेबास जालीच असेल. पेशवे सरकारचे मंडळींसी सर्वासी आदावत पडली. कोण्हासी गूत राहिले नाही. साडे तीन वर्षे खरेपणाने चालिलो. साहेब लोकाजवळ खरेपणाने चाकरी केली असता साहेब मेहरबान होऊन बंदोबस्त करून देतात ह्या लौकिकावर येक रुा कोण्हापासून न घेता ज्या ज्या समई हुकूम होत गेला ते कबूल केले आणि चाकरी बज्याविली ते :—

१ सरकारात येवज आला त्याचे बक्षीस दिल्हे त्याची व्यवस्था जनोबा आगासे कुवारी किला घेतल्यावर कैदेत ठविले होते, सरकारचा येक रुा मजपासी नाही म्हणौन क्रिया करून सुटले. नंतर मजकडे चौकसी सांगितली. मोर जोसी व बापू कडेकर याणी तोंडजबानी जवाहीर आगासाकडे काही आहे म्हणौन सांगितले. आगासे कबूल न होत तेव्हा फुरसिसाखाली हैराण जाले व उगेच बातनीदार उभे करून जवाहीर लागू करून सरकारात आणिले. त्याचा अजमास करून दीड लक्षाचे पंधरा हजार रुा मजला दिल्हे. त्यापौ त्याच समई जे जे उपयोगी पडले ते साहेबासी रुजू करून साडेतीन हजार रुा त्यास दिल्हे. बाकी साडे अकरा हजार राहिले. पौ जोसी व कडेकर यास सात हजार रुा दिल्हे. साडे च्यार हजार रुा राहिले ते मी घेतले. येविसी कडेकर व जोसी फिर्याद जाले. माझा दस्तायेवज नसता साहेबानी पंचाईत अदालतीत दिल्ही त्यास पंच कोण्ही न मिलत. आज पंधरा महिने जाले याप्रो मजकूर आहे. हली गोडबोले याजबदल साहेबानी पंधरा हजार दिल्हे त्यापौ तिसरा हिसा मी घेऊन बाकी बातनीदारास दिल्हे. याची माहीतगारी मकलाड साहेबास आहे. याप्रो बक्षिसाचे येवजाची व्यवस्ता. हली मी श्रीमाहायात्रेस जावयाकरिता मौजे भावडे येथे मुकाम आहे. आपल्या हुकुमासिवाय काही बोलत नाही. कलम

१ किता कलमे

१ पेशवे सरकारची खासी दफ्तर व तहनामे वगैरे कागद जेथे ठविले होते ते ठिकाण लाऊन आणून दिल्ही. त्यासमई बक्षीस देऊ म्हणौन करार असता येक पैसा दिल्हा नाही.

१ पुणे सुभा व जुनर सुभ्याचे जुने दर दामाचे व मोजणीचे शंभर वर्षांचे कागद जेथे जेथे होते त्याचे ठिकाण लाऊन आणिले. त्यासमई बक्षीस

देऊ म्हणौन मेहरबान राबिसन साहेब याचा कगर असता दिल्हे नाही. कागद मिळाल्यामुळे जमाबंदी किती जाली याची माहितगारी राबिसन साहेबास आहे.

१ साल्गुदस्ता डाकेतील पत्रे धरावी म्हणौन हुकूम जाल्यावरून पत्रे धरून मकलाड साहेबापासी दिल्ही. त्याबदल डाकवाल्यास रुा दोनशे हुकुमावरून दिल्हे ते रुा आले नाहीं. कलम

---

३

१ वर्क्षास काय पावले, त्यातून परभारे काय गेले व जोसी कडकर फिर्याद करितात याची माहितगारी मेहरबान राबिसन साहेबास असता बोलत नाही. म्हणतात की आमचा सिरस्ता बोलावयाचा नाही.

सदरहू मजकूर लिहिला आहे हा खरा आहे किंवा खोटा हे मेहरबान राबिसन साहेबास लिहिले असता सागतील. खोटा जाल्यास साहेबाकडे माझे बोलणे काही येक नाही. पुणे मुकामी विनंती करावी तरी साहेबाची स्वारी गेली त्या समई मी राबीसन साहेबाबरोबर होतो. चाकरीची मेहनत मनात आणून मेहरबान होऊन माझा काही बंदोबस्त करून देविला पाहिजे. प्रतीक्षा करीत बसलो आहे. यात्रेचे दस्तक देविले पाहिजे म्हणजे यात्रेस जातों. बहुत काय लिहिणे सेवकावर मेहरबानी असावी हे विज्ञापना.

¶*Vithal Narsi Panwalkar submits this written petition to Commissioner Chaplin for rewarding his difficult services which he rendered to Col. Robinson. The letter explains the nature of the services.*

---

*No. 262]* *[4-11-1822*

श्री

यादी खासगत राजश्री त्रिंबकजी पाटील डेंगले याचे घरचे मंडळीची नावनिसी- सुा सलास अशरीन मयातेन व अल्फ छ १९ सफर

खासगत त्रिंबकजी पाा डेंगळे

१ पुत्र गणपतराव डेंगले उमर वर्षे अजमासे ९ नऊ

८ स्त्रिया सौवती

१ रखमाबाई उमर वर्षे अजमासे ३५

१ रमाबाई उमर वर्षे अजमासे ३३

१ पार्वतीबाई ,, ,, ३१
१ राधाबाई ,, ,, २९
१ चंद्राबाई मुलाची मातोश्री
उमर वर्षे अजमासे ३२
१ बाळाबाई उमर वर्षे अजमासे ३०
१ येमुनाबाई ,, ,, २७
१ मैनाबाई ,, ,, २८
—
८

३ कन्या सौभाग्यवती
१ माळूबाई उमर वर्षे अजमासे २८ मातोश्री वारली
१ गंगाबाई उमर ,, ,, १८ ,, ,,
१ भागाबाई ,, ,, ,, ११ ,, रमाबाई आहेत
—
१२

कनिष्ठ बंधु कुसाजी पा डंगले

१ खासगत कुसाजी पा डंगले उमर वर्षे ५०
२ स्त्रिया सौभाग्यवती
१ आण्याबाई उमर वर्षे ३५
१ सावित्रीबाई उमर वर्षे ३०
—
२

३ पुत्र
१ मल्हारराव पाटील डंगले उमर वर्षे २५
१ स्त्री सौ लक्ष्मीबाई उमर वर्षे २०
१ कन्या येसूबाई
—
३

१ कन्या सौ काशीबाई उमर वर्षे १२
—
७
—
१९

सदरहूप्रो उभयता बंधूचा परिवार येकत्र आहेत. वेगळे नाहीत. हाली नांदणूक मौजे निंबगाव जाळी तर्फ हवेली प्रगणे संगमनेर येथे वतन पाटिलकीचे तक्षीम चौथी आहे. डेंगळे याचे घरे अजमासे १९. आहेत. पाटिलकीचे वतनाची उत्पन्न इनाम बिघे तीस सर्वत्र डेंगळे मिळून आहे, तो वडीलपणा ज्याचा आहे त्याजकडे चालत आहे. याखेरीज काडीपेंढी वगैरे नगद येक कवडीसुध्दा काही येक नाही. वडीलपणा काही आमचा नाही. पाटील नावाचे मात्र आहेत. अमदानी कवडीची नाही. वतनी सेत बिघे अजमासे ६० साठ आहेत त्याचा सारा सरकारात देत असतो. याखेरीज कुणबाव्याचे सेत जेवा होता त्याचा हिसा सरकारात देत असतो. याप्रा निंबगाव जाळी येथील वहिवाट आहे.

१ मौजे निंबगाव तर्फ कोन्हाळे प्रगणे संगमनेर येथील पाटिलकी निमे त्या गावचे पाटिलकीचे उत्पन्न इनाम बिघे ६० आम्हाकडे आहे. याखेरीज काडीपेंढी व नगदी कवडी येकमुद्रा काही येक नाही. गाव आम्हास श्रीमंत सवाई मल्हारराव होळकर साहेब यांणी कुटुंबाचे बेगमीस जागीर करून दिल्हा आहे. त्याच्या सनदा आम्हाजवळ आहेत. गाव लढाई आखर पावेतो चालत होता. हाली सरकारात नगर तालुक्यात जमीस आहे. याप्रा आमची वहिवाट आहे. गाव अजमासे रुा सात आठशे सरकार पोन्यास वसुलास आहे.

१ खेरीज कुणबिनी तीस व लेकवळे वीस याप्रमाणे पोट खर्च आहे. कुटुंब मोठे. याचे पोषणाचा परियाय खाविंदाचे लक्ष्यानच आहे.

---

२

¶*The paper enumerates the members in the family of Trimbakji Dengle and all his belongings, in the year 1822 when he was undergoing confinement at Chunargad. He died there on 16-10-1829.*

---

*No. 263*] [*8-11-1822*

पौ ताा ८ नवेंबर सन
इसवी १८२२
तर्जुमा शुद ताा १० दिसेंबर

**श्री**

यादी नीलकंठराव माहादेव पुरंधरे मुाा सलास अशरीन मयातैन व अलफ एसीजे. साहेबास पाहिले याजवरून पादशाहा अलमगीर पाहिले ऐसे चितात वाटले. आपणापेक्षा अलमगीर काही जास्त नसतील.

आमचे वडलानी दिल्लीस जाऊन पादशाहा पाहिले. आम्हास सरकार गौरनरीतून बहुत अबरू दिल्ही. याची शरम सरकारासच असली पाहिजे. पूर्वी रामराव याजपासी हुकूम असाच जाला आहे की तुमचे खावंदाचे खानदानावर नजर आहे, याकरिता .खानदानाची शरम फार वाटती. आपले शहनपाईस लाजीम व आमचे खानदानास उचित ऐसाच बयान सरकारची खुषी पाहून करावा हा आमचा स्वधर्म. वर्कड आपले पोटास पुरत नाही अगर अराम जाजती असावा, येविर्साचा जिकर हर्गीज करावयाची नाही व सरकारास महनतहि द्यावयाची नाही. सांप्रत आपल्यास सरकारकामामुळे फुरसत कमी याकरिता चितात येते, की येकदा जंजिरे मुंबईस हजरात हजर व्हावे लागल. बंदर मजकुरी येण्यास हुकूम असावा. मर्जीस नसल्यास साहेब महरवान उलियम चापलनसाहेब कमिशनर बाहादूर याजपासी जाहीर कर्ण्यात येईल. त्याजवरून साहेब अलीशान इतला करतील. मिति शके १७४४ चित्रभानु नाम संवत्छर माहे आश्विन वद्य ९

¶*Nilkanthrao Mahadeo Purandhare extols the power and prestige of the Governor and asks for an interview. The contrast of the former greatness of his family and its present misery is indeed pathetic.*

---

*No. 264*] [*1822 ?*

श्री

ब्रह्मावर्तात बाजीराव सो लग्न करणार त्यास कन्या गणपतराव याची योजिली आहे. ते कोण कोठे राहाणार शोध घ्यावा म्हणोन साहेब याचे हुकूम जाहले होते. त्याचे शोध घेताना गणपतराव भागवत यानी दफ्तरदार सुभा खानदेश हाली नासिकात आहेत, याचे कन्या देणेचे निपकरण जाहले आहे, म्हणोन हरिभाऊ देशमुख यास पत्र आले आहे. म्हणोन साहेबास विनंती करावी हे विनंती.

¶*Bajirao proposed to marry more wives at Brahmavarta and settled on the daughter of one Ganpatrao. An inquiry is made about the antecedents of this Ganpatrao Bhagwat. "He was formerly a Daftardar in Khandesh and is at present residing at Nasik," says the letter. Haribhau Deshmukh, mentioned in the letter, was looking after Bajirao's affairs at Poona and was the father of Gopalrao Deshmukh.*

No. 265] [22-3-1823

श्री

अर्जी कुसाजी बिन मल्हारजी पा॥ डेंगळे मौजे निंबगाव जाळी पां॥ संगमनेर सुरू सलास अशरीन मयातीन व अलफ. कारणें अर्जी लिहून दिली ऐसीजे हुजरून आज्ञा जाली की तुम्ही आपले घर जिंदगीची याद लिहून देणे. त्याजवरून आम्ही आपला हवाल लिहून देतो की, ती॥ रा॥ त्रिंबकजी पाटील तात्या याजला सरकार कुंपणी बाहादूर यांणी कैद करून साष्टीस नेले ते समई आम्ही निंबगावी होतो. तेव्हा मजला तात्याचा हुकूम आला की निमगावचे जिंदगीचा बंदोबस्त करून पुणियास यावे आणि तेथील घरजिंदगीचा बंदोबस्त ठवावा. तो इतकियात कारभारी मंडळींचेहि बोलावणे पुणियाहून आम्हास आले. तेव्हा आम्ही निमगाव येथील घरजिंदगीचा बंदोबस्त ठेऊन पुणियास आलो आणि येथे दोड वर्षे राहून पेशवे सरकारातून माहाल मुलुख होते त्याच्या सोडचिठ्या देऊन सरकारात स्वाधीन केले आणि घरजिंदगी सांभाळून होतो. इतकियात तात्या साष्टीचे ठाण्याहून निघाले. सबब पेशवे सरकार यांणी आम्हास कैद करून राजदेहरचे किल्यास अटकेस ठेविले व ती॥ सौ. बाया व चिरंजीव गणपतराव यास कैद करून साष्टीस पाठविले व हरदू ठिकाणचे घराची जप्ती करून जिंदगी सरकारात नेली. नंतर पेशवे सरकारची व कुंपणी सरकारची लढाई जाली त्या संधीत आम्हास सोडले. नंतर आम्ही व तात्या लस्करात येके जागा जाहालो आणि पेशवे सरकारचे समागमे उभयता अशीरीचे मुक्काम पावेतो होतो. तेव्हा पेशवे सरकारची व खुदावंद मलकम साहेब बहादूर यांची भेट जाली. नंतर तेथून उभयता बंधू सरंजामसुद्धा मालेगांवचे झाडीत आलो आणि सरंजामास निरोप देऊन तात्या आडीरगावास राहिले आणि आम्हास सांगितले कीं तुम्ही पोहेगावास जाऊन राहावे. त्यावर तात्या धरले गेले आणि आम्ही लपूनच होतो. यावर खुदावंद पाटेंजर साहेब यांचा कौल माळजी पाटील यांणी आम्हास पाठविला, त्याजवरून खुदावंद पाटेंजर साहेब यांची भेट घेतली. साहेब मेहेरबान होऊन घरवाडा बेलदार जमीन होती ती मोकळी करून आमचे स्वाधीन केली. मागाहून ती॥ सौ॥ बाया व चि॥ गणपतराव याजला साष्टीचे ठाण्यातून मोकळी केली ती घरास आणिली. सर्वत्र येक जागा होऊन निमगावी घरी राहिलो. नंतर आसाहेबाचे कदमापासी चिरंजीव बापू येऊन पुण्यातील वाड्याविसी अर्ज केला. त्याजवर साहेबानी मेहरबान होऊन घरे व वाडा सोडून दिल्हा. त्यावर खुदावंद न्यामत गौरनर अलपिष्टनसाहेब बहादुर यांची स्वारी मुमईहून पुणे मुकामी आली, त्या वेळेस खुदावंद जनराल इसमिट साहेब यांचे विद्यमाने खुदावंद न्यामत

गौरनर साहेब याची भेट चिरंजीव गणपतराव बापू याणी घेतली. पोटा-पाण्याचा अर्ज केला. तेव्हा दौलतीचा पर्याय विचारिला, त्याचा जाब दिल्हा की दौलत जप्तीत गेली. आंम्ही हलाखीत आहो. खाविंदानी मेहेर करून पोटास दिल्हे पाहिजे. त्याजवर विठलपंत मामा यास अठरा हजार रुा काय बाब दिल्हे ? त्यास जंबुसरचे बाकीबद्दल मामाची घरजिंदगी जप्त करून वडिलानी आणिली होती त्या बाब अठरा हजार रुा दिल्हे. ते कोणाचे विद्यमाने दिल्हे. त्यास कारभारी मंडली पुणे मुकामी होती त्यांणी ठराव करून देविले. त्याची दर्याप्ती हली खुदावंद राबिनसन साहेब याणी कारभारीमंडलीस आणून करितां हरि भगवंत यास परज करून रुा घेतले. इतकियात गौरनरसाहेब याची स्वारी निघाली. समागमे चिरंजीव बापू गेले. मागाहून सयाजी मुले व महादाजी गोविंद स्वारीत जेजुरीचे मुकामी आले. बयाजी नाईक याचे विद्यमाने सौ बायाचे नाव अर्जी दिल्ही की आमची जिंदगी कुसाजीपंत याजकडे आहे ती देवावी, हे चिरंजीव बापूस समजले. त्याजवरून खुदावंद वाटकीण साहेब यांची भेट घेऊन आर्जी दिल्ही की, आर्जी देण्यास मातोश्री बायाचे अनुमत असल्यास आम्ही आपले आपसांत समजूत घालून मातोश्री बायाची व आम्ही आपली पावती आणून हजर करू. या प्रो आर्जी देऊन निमगावी आले. तो दुसरे दिवसी नारबा ताकटे व आपाजी नाईक व सयाजी मुले व माहादाजीपंत हे आले आणि आम्हास व सौ बायास सांगितले की तात्यास सोडवावयाची अर्जी दिल्ही आहे तर तुम्ही बायास घेऊन पुण्यास चलावे. तेव्हा बापूने उतर केले की तात्या सोडवावयाची अर्जी दिल्ही नाही. जिंदगीची अर्जी दिल्ही आहे. त्याजवरून मंडलीने बापूस लबाड केले व बायाहि म्हणो लागल्या की तुम्हास घरधनी सोडवा-वयाची आगत्य नाहीं. आम्ही पुण्यास जातो असे म्हणो लागल्या. तेव्हा सयाजी मुले याजला आम्ही विचारिले की खुदावंद न्यामत गौरनरसाहेब पुण्यास नाहीत व खुदावंद न्यामत वलियन चापलीन साहेब बाहादुरहि पुण्यात नाहीत तेव्हा आम्हास व सौ बायास कोणापासी नेता ? त्याजवर त्याणी सांगितले की बयाजी नाईक याणी गौरनरसाहेब याजपासी तात्या सोडवावयाचे बोलणे केले आहे आणि तुम्हास आणावयास पाठविले आहे असे बोलू लागले. त्याजवरून लाचयार होऊन सौ बायास घेऊन पुण्यास आलो. येथे आल्यानंतर कारभारी मंडळी बायास गैरवाका समजावितात की आधी जिंदगी घ्यावी. नंतर तात्या सोडवावयाचा जाबसाल सरकारात बोलू, असे बयाजी नाईक व कारभारी याणी बाया(स) समजाऊन जिंदगी मागतात. त्यावर रा दाजीसाहेब घोरपडे आमिरुल उमराव व बयाजी नाईक याणी आम्हास सांगितले, की आम्ही घरगुती सांगतो

त्याप्रो तुम्हास मान्य आहे असें असल्यास तुमची समजूत करूं. त्याजवरून आम्ही उत्तर केलें की सौ बाया ह्या बायका व चिरंजीव गणपतराव लहान अज्ञान व तीा तात्या सरकार कैदेत असे संकट आहे. तशांत कारभारी मंडळींनी सौ बायांचे बुधीस गैरवाका आणिला, त्यास आम्ही वाटणीची वगैरे वाकडी गोष्ट सांगितल्यास लोकेशानीत दोश. त्यास तुम्ही सांगाल त्या प्रो करूल. त्याजवरून त्यांणी सांगितलें की तुम्ही पत्र लिहून द्यावें की जिंदगी कारभारी हरि भगवंत व हरिबा खंडेराव यांचे स्वाधीन करून, उभयता कारभारी याणी तुमचे व बायांचे इतल्याने कारभार करून प्रपंच चालवावा याप्रो सांगितलें. सबब उभयता तिन्हाईत यांचे नांवे पत्र लिहून दिल्हे असता सौ बायानी घरास चलावें तें न करितां सरकारात जिंदगी देत नाही म्हणोन समजावितात व तीा तात्याची पत्रें दोन आली त्यांत मार की, घरचा बंदोबस्त ठेऊन मुलामाणसाचा सांभाळ करून आब जतन करून खुशाल राहावें. आमची काळजी करूं नये व कोणी लबाडी करूं लागल्यास त्याचें न आइकता मुलामाणसाचा सांभाळ करून असावें. याप्रमाणें वडिलांची पत्रें येतात, तव्हा वडिलाची तो आज्ञा याप्रो आहे आणि येथें तो कारभारी मंडळीयास काही येक लाभ होत नाही म्हणोन, सौ बायास गैरवाका समजाऊन बखेडा वाढवितात, त्यावरून तीा तात्यास पत्र सरकारचे इतल्यानें पाठविलें आहे. वडिलाचा जाब येईल त्या प्रो वर्तणूक करूं. या उपर खुदावंद न्यायमत तात्याचे पत्राचा जाब येईपर्यंत मर्जी नसल्यास येका महिन्याची मुदत द्यावी, म्हणजे निमगावी जाऊन जिंदगीची याद करून हुजूर आणून हजर करूं. जसे ख्यावंदाचे मर्जी असेल त्यास हजर आहो. याजवर कारभारी परस्पर बोलतात की आम्ही प्रथम पासून वेगळे आहोत. त्यास आमचे तीा मल्हारजी पाटील याणी प्रथम बाइको केली त्यास काही दिवस जाले. मुलें जाली, परंतु जगली नाही. सबब दुसरे कुटुंब केलें. त्या मातोश्रीस तात्या जाले. नंतर प्रथम बाइकोचे पोटी आम्ही जालो. उभयता बंधूची लग्नें केली. मोठे जालो. उपरांतिक आमचे तीर्थरूप मृत्य पावले. त्यांचें हातचे सावकारी कर्ज देणें होतें तेहि नित्यशा तगादा करूं लागले. देण्यास ऐपत नाही. सबब तीा तात्या नागपुरास रोजगाराकरितां गेले आणि आम्ही घरी मुलें माणसें सांभाळून संसार करून राहिलो व काही सावकाराचे कर्ज आदा केले. नंतर तात्या दोन वर्षांनी नागपुराहून घरी आले. त्याणी काही आणिले असेल म्हणोन सावकारानी उपद्रव फार केला. त्यास द्यावयास आधार नाही. सबब मुलामनुशासुधा उभयता बंधु परागंदा होऊन पाडेसर येथें जाऊन राहिलो. तेथे शेतपोत केलें. परंतु पुरवठ्यास येईना. तितक्यात आमचे कुटुंब गरोदर सबब

वडझरीस माहेरास नेले होते. यावर दोनच्यार महिन्यानी आणावयास, पाठविले तेथे आम्हास आमचे मेहुणे म्हणो लागले की तेथे तुम्हास पुरवठ्यास येत नाही तर येथे 'तुम्हार (?) शेत करावे. आम्ही उभारणी करू. तुम्ही आपले बंधूचा सला घ्यावा म्हणोन आम्ही तात्यास सला विचारिला की वडझरीकर असे म्हणतात त्याजवरून त्याणी आज्ञा केली की बरे आहे. तुम्ही तेथेच राहावे. आम्ही मागाहून खटले मोडून निघतो. त्यावरून आम्ही वडझरीस राहिलो. मागाहून तात्यानी खटले मोडून मुले माणसे घेऊन निमगांवी आले. नंतर आम्हासही मुलामाणसासुधा नेले आणि सर्वत्रास निमगावी येके ठिकाणी ठेऊन तात्या पुण्यास आले आणि पेशवे सरकारापासी चाकरीस राहिले. नंतर तात्याची प्रथम बाइको माहितगार होती ती मृत्य पावली. हली सौ बाया आहेत यांची लग्ने दौलतीत केली. याजला मागील माहिती नाही व कारभारीहि दौलतीपासूनच आहेत. याजलाहि पूर्वीची माहितगारी काय आहे? * ही आरजी लिा दिली सही. मिति अधिक चइत्र शुा ११ शके १७४५ दस्तुर खुा बापूजी पाटील डेंगले [पत्रावरील शेरा] दस्तायैवजावरून त्रिंबकजीची जिंदगी आहे येसे मालूम होत आहे. आताच याद द्यावी. न दिल्ही तरी जेसे सरकारचे नजरेस येईल त्याप्रां करावे लागल. दोनी तीनी रोजात मालची पटी न दिल्ह तरी पाहारे ठेवणेस हुकूम होईल. पां छ २२ मार्च सन १८२३ इसवी.

¶*Kusaji Malharji Dengle, brother of Trimbakji Dengle, submits an application in which he gives the past history of his family describing at the same time the activities of his brother Trimbakji and the dissensions created by his wives. He prays that he be allowed some time to prepare an inventory of his property. The applicant is informed that an inventory of the property should be prepared at once, otherwise it will be confiscated.*

---

*No. 266*] [*5-4-1823*

श्री

यादी अर्ज साहेबांचे सेवेसी अनंदराव यशवंत वकील रूमाजे. आमचे वतन परगणे दिंडोरी येथील देशपांडेपणाचे आहे. त्याविसी आमचे भाऊबंद वतनावर आहेत ते खटले सांगतात. पेशजी पेशवे सरकारचे अमलात रा सदासिवपंत-भाऊ याचे विद्यमाने पंचाईत होऊन हे देशपांडे खरे व वतनावर भाऊबंद आहेत, त्याणी यांचा विभाग यांस द्यावा ऐसे ठहरून आमचे वाद्यांस ताकीदहि जाली की यांचे वतनाचा विभाग यांस द्यावा. इतकियांत दंगा होऊन साहेबांचा अमल जाला. नंतर मोहो छावणीवर सर ज्यान जनरेल मलकंसाहेब बहादूर यांस

येविसीचा अर्ज केला त्यास साहेबानीं मेहर्बा होऊन गौरनर बडेसाहेब बहादूर साहेबास आमचे वतनाचा बंदोबस्त करून देण्याविसी बहुत प्रकारे लिहिले. त्याजवरून बडेसाहेबानींहि या कामाविसी आश्वासन दिल्हे आहे. त्यास हाली साहेबानी मेहेरबां होऊन नगरचे साहेबास येविसी पत्र दिल्हे पाहिजे. हे अर्जदास्त.

अर्जावरील शेरा असा आहे.

देशपांडेपणाचे वतनाचे विभागाविसी तुम्ही जाऊन पाटिंजरसाहेब कलकटर याकडे फिर्याद करा व याजची चौकसी होईल. तारीख ९ माहे येप्रल सन १८२३ इसवी.

¶Anandrao Yeshwant Chandawarkar applies for the settlement of his Vatan of Deshpandeship of Pargana Dindori. The applicant is directed to apply to Pottinger the Collector, for the disposal of the case, see No 249.

---

*No. 267]* *[11-8-1823*

**श्री**

साहेब मेहरबान मिपरबान कदरदान फौज बकष फौज रमाजाब्रीटसाहेब बाहादूर

आर्जी फितव महमदखान जमादार मुा आबां आशर मखातेन व अल्फ. कारण लेहून दिल्हा आर्जी आसी जे. आम्ही बडेसाहेबाजवळ संगमावर होतो. तेथ बाजीराव याचे हुजरे होते ते फोडून आम्ही साहेबापासी घेऊन आलो. कारण आपली पलटण फितूर येक परभू करीत होते ते हुजऱ्याने साहेबाजवळ लेहून दिल्हा. तेव्हा जे दिवसी पुणे घेतले ते दिवसी साहेबानी त्या परभूस फासी दिल्हा. आपले बेटावरील लूट जाहाली तो येवज दोन च्यार ठिकाणी गेला होता तोहि आम्ही साहेबास दाखऊन दिल्हा व साहेबानी आम्हास विचारिले की आमचे किताबाचा ठिकाण लावणे. तेव्हा तोहि ठिकाण लाऊन दिल्हा व आणून दिल्हा. तेव्हा साहेब बाजीराव याचे मागे लागले. आम्हास बरोबर नेले आणि सांगितले की बाजीराव याचे लस्करचा मुकाम कोठे व सरदार कोण कोठे उतरतील त्याची बातमी आम्हास कळू देत जावी. तेव्हा आम्ही रोज बाजीराव याचे लस्करात जाऊन लस्करची बातमी साहेबास कळवीत होतो. आम्ही आपले प्राणावर काही अस्ता ठेविली नव्हती. साहेबाच्या चाकरी(ची) आस्ता होती. नगरच्या ठाण्यात पाटेंदरसाहेब होता त्यानी बडेसाहेब यास सांगितले की महमदखान आम्हापासी आसू द्या. तेव्हा साहेब म्हणाले की महमदखान तुम्हापासी ठेवावयाचा नाही. आमचा उपयोगीचा आहे आणि साहेबानी आम्हा दोन च्यार हाजार रुपये इनाम

दिल्हा व दरमाहा रुपये साठ होते ते सर्व लोकास माहीत आहेत. तेव्हा लस्कर फिरत फिरत साताऱ्यास आले. तेव्हा ग्राटसाहेब व राजश्री बाळाजीपंत नातू हे साहेबास म्हणो लागले की महमदखान आम्हाजवळ आसू द्यावा. मग आम्हास यथ ठेविले आणि सांगितले की दोनसहे लोक याची हाजरी घ्या. नंतर आम्ही दोनसहे लोक आणून ग्राटसाहेब याजपासी चाकरीस राहिलो. ज्याप्रा। साहेबानी चाकरी सांगितली त्याप्रा। केली. दोन तीन ठाणेदारानी लोकाजवळ लाच घेतली तोहि साहेबास येऊन कलविला. तेव्हा साहेबानी त्यास चौदा पेस्तापार केले. सबब आम्ही सारे कारकून मडळीस दुशमान जाहालो. आणिखीहि कारकुनानी व जमादार यानी लाच घेतल्या तोहि साहेबास कलविले. तेव्हा सारे मंडळी फारच दुशमान जाहाली. तेव्हा आम्हावर बंदीवानची चाकरी आली. तेव्हा बंदिवान खाणावयास नेले होते तेव्हा दोन प्रहरा आमचे रोज्याच्या दिवस म्हणून आम्ही निमाज पढावयासी गेलो होतो. पाठीमागे गावचा वाणी याने चेतुसिंग बंदीवान यासी खारका दिल्ह्या, तेव्हा आम्हास म्हणाले की सरकारात यदी काही दिल्ही नाही म्हणोन कुबाड करून माहाराजास कलऊन आम्हास येका जमादार येक वर्षभर परजा(त) टाकिले व ज्या वाण्याने खारका दिल्हा त्या वाणियास दोन च्यार दिवस परजात ठेऊन सोडून दिल्हा. आम्हास ठेप होऊन पधरा दिवस जाहाले, तेव्हा म्हणो लागले की तुम्ही साहेबाजवळ फिर्याद जाणार नाही आसा जामीन देणे. तेव्हा जिवाच्या आस्तेने आम्ही जामीन दिल्हा आणि मग आम्हास सोडून दिल्हे. याची चौकसी साहेबानी करावी. हे आर्जी लेहून दिल्हे सही. मिति श्रावण ९ शक १७४९.

¶*Muhammadkhan Jamadar recounts his past services saying how useful he was to the several officers in giving information from the Peshwa's camps on various occasions, and how he was promoted for the same. He begs an inquiry being made into the harsh treatment given to him by his enemies for allowing some date-fruit being given to Chatursing who was a prisoner under him.*

---

*No. 268]* *[15-8-1825*

तारीख छ २९ सन

१८२९ माहे आगष्ट.

**श्री.**

चिरंजीव राजश्री गणपतराव नारायण श्रीवर्धनकर यासी यशोदाबाई पेशवे पंतप्रधान आसीर्वाद, उपरी. येथील कुशल ता। श्रावण शु॥ १ पावेतो मुकाम बराणपूर येथे सुखरूप असो विशेष. तुम्हाकडून पत्र येत नाही तेणेकरून काळजी फार लागली आहे की मु(पु)णे मुकामी पावला म्हणोन येथे लोकांची पत्रे आली आणि तुमचे पत्र येकहि आले नाही. त्यास वाटेने काही दगा होतो अथवा

तुम्ही रवाना करीत नाही हे काहीच समजत नाही. त्यास पत्राचे उतर कचा मजकूर लि॥ पाठवाव. इकडील मजकूर दररोज पत्रे लि॥ रवाना केली आहेत त्यात मजकूर साकल्य लि॥ आहे. हाली आम्हांस जैसिंग याजकडून वारंवार तार्कीद होते की, आपण शहराबाहेर जावे. याप्रा। होते. त्यास आम्ही त्यास सांगितले आहे, की आमचे येथून मुंबईस गेले आहेत त्याचे उतर येई तोपावेतो जाणार नाही. परंतु त्याचे येकच म्हणणे आहे. त्यास हाली तुम्हास लि॥ आहे. तरी कसे करावे याचा विचार पका ध्यानास आणून पत्र कोणे ठिकाणी निघावे याप्रा। पत्र अथवा इंग्रजाकडून काही पत्र यावयाजोगे तुमच्या भेटी वगैरे होऊन जाले असल्यास तसेच उतर पत्र पावताच यावे. पत्रावर नाव वा। रा। चिंतामणभट शास्त्री यांचे घालून पता वा। रा। दादा जोसी याजकडे द्यावे. याप्रा। लि॥ पाठवावे म्हणजे पत्र तरी पावते होईल. येथून येकादाहा दिवसी मुजरद जासूदजोडी रवाणा करावयाचा बेत केला आहे. नारायण जासूद येऊन पावला. कलावे. इकडील फाके दररोज चालले आहेत हे तुम्हास सर्व माहितगारी आहे. पत्री लि॥ कलवावे ऐसे नाही. सूचनार्थ लि॥ आहे. तरी सर्वत्रानी एक विचार करून सवाईचे चरणावर लक्ष ठेऊन कार्यसिधता होऊन पत्र लौकर यावे. अनमान करू नये. कलावे. बहुत काये लिहिणे, लोभ करावा, हे आसीर्वाद.

वा। धोंडो सिकाजी यास आसीर्वाद. पत्र लौकर पाठवीत जावे. तुम्हाकडील पत्र येत नाही तेणेकरून काळजी फार लागली आहे. कलावे हे आसीर्वाद.

हा। आपत्य परशराम आपाजी जोसी सिरसाां नमस्कार विज्ञापना. इकडील मजकूर लि॥ तरी सविस्तर भार तिकडील लि॥ पा॥. लोभ करावा हे विज्ञापना.

¶*Yashodabai Peshwa writing to Ganapatrao Narayan asks arrangement being made for letters being despatched and replies received. The writer appears to be the pretender of Yashodabai wife of Madhavrao Narayan Peshwa.*

---

*No. 269*] [*23-12-1825*

**श्री**

तारीख छ २३ माहे दिसंबर
सन १८२५ इसवी.

यादी गणपतराव पाटील डेंगले
मौजे निंबगाव जाली सन १२३५ सुरु सीत अशेरीन मया तैन व अलफ

गौरनरसाहेब याजपासी पेणसलाविसी अर्ज केला. त्याणी हुकूम दिल्हा की कमिशनरसाहेबाकडे जावे. त्याजवरून मुंबई मुकामी आसाहेबांची भेट घेतली.

7241

खाविंदी हुकूम केला कीं शंभर रुा दरमाहा पेणसल मुकरार जाले आहे. त्याची सनद विनायत करण्यास हुकूम व्हावा.

१ मौजे निंबगाव ताा कोन्हाळे हा गांव होलकर सुभेदार याजकडून जाहागीर होता त्याविसी गौरनरसाहेब यास अर्ज केला. त्याचा जवाब जाला की आलीषान कमिशनरसाहेब बहादूर याजकडे जावे म्हणजे चौकसी करतील. गावाविसी कागदपत्र आम्हापासी आहेत त्याचे चौकसीविसी हुकूम करणार खाविंद आहेत.

मिा मार्गसीर्ष शुाा १०.

¶*Ganpatrao Patil Dengle asks for his pension being sanctioned and the inam village granted to him being released by the Governor.*

---

*No. 270*] [*1825-26*

श्री

कुंपणी सरकारास

अर्ज अंनदराव येशवंत वकील मुख खमस अशरीन मयातेन व अल्फ. कारणे अर्ज ऐसाजे. सेवकानें कुंपणी सरकारची चाकरी श्रीमंत माहाराज राजश्री बाबासाहेबाचे व सर ज्यान जनेरल मलकंसाहेब बहादूर यांचा तहाचा नेम सेवकाचे विद्यमान ठरला. आम्ही चाकरी केली ते महरबान लों साहेब यास माहीत आहे. पुढे मंदुसर मुकामाहून ब्रम्हावर्ताकडे श्रीमंताचा जावयाचा नेम ठरला. समागमे लों साहेब गेले. माघोन जनेरल मलकमसाहेब महू छावणीस येते समई सेवकास समागमे घेऊन अले. नंतर अम्ही अर्ज केला जे श्रीमंताकडे जावयास आज्ञा व्हावी. त्यास हुकूम जाहाला जे तुम्ही श्रीमंताकडेस जाऊ नये. पुणे मुकामी जनेरल गौरनर बडेसाहेब बहादूर याजपासी जावे. तुमचे इराद्यानरुप वंशपरंपरा दरमाहा वगैरेचा बंदोबस्त करून देतील. ऐसा हुकूम जाहाला. त्याप्राा आम्ही पुण्यास येऊन पावलो. नंतर गौरनर साहेब याणी हुकूम केला जे श्रीमंताकडील इलाखा[1] बिलकूल न ठवावे ऐसे बोलिले. पुढे सेवकास दरमाहा दोनशे रुपये पनसिन ताहाहायात ऐसी सनद करून दिल्ही. त्या वेलेस आम्ही काही अर्ज करावा तर सेवकानें चाकरी केली त्याची माहिती महरबान लोसाहेबाखेरीज कोणास नाही त्यापेक्षां लोसाहेब ज्या वेलस येतील त्या वेलेस आर्ज करू ऐसीया इराद्याने आजपाा श्रीमंताकडील सिलसिला न ठवता उगाच राहिलो. हाली लोसाहेब येथे आले आहेत. सेवकानें चाकरी केली ते कुंपणी सरकारा माहीत करितील. त्याजवरून साहेब मेहेरबान होऊन आमचे काम करोन द्यावयाची कलमे बितपसील.

---

[1] इलाखा संबंध.

१ कुंपणी सरकारातून दरमाहा दोनशे रुा ची पेनसिनची सनद ताहाहयात करून दिल्ही ते आम्ही व आमचे पुत्रास चालावी ऐसी सनद करून द्यावी कलम १

(शेरा) ऐसे कोणासहि जाहले नाही याजकरिता आपणासहि होणार नाही.

१ कुंपणी सरकारातून राहावयास घर विश्रामबागेच्या वाड्यामागेरी कोठीचा वाडा सरकारचा आहे तो आम्हास राहावयास दिल्हा आहे तो वाडा बक्षीस इनामपत्र करून दिल्हा पाहिजे कलम १

(शेरा) बक्षीस मिळणार नाही.

१ सरकारातून दर्सनच्या इदाबद्दल पोशाक सर्वत्रास पोहचतो त्याअन्वये सेवकासहि पोहचत असावा. कलम १

(शेरा) नवरसीर हुकूम होणार नाही.

---

३

सदरहू येकून कलम मुमारी ३ तीन सेवकास करून द्यावी. सेवकाची मुले लेकरे पुस्तदरपुस्त वोशपरंपरा कुंपणी सरकारास दुवा देतील. कुंपणी सरकारा-सिवाये दुसरा अधार नाही. सेवक बहुत लाच्यार कर्जदार जाहाला आहे ऐसियास साहेब मेहरबान होऊन सदरहू तीन कलमे अर्ज केल्याअन्वये करून द्यावयास हुकूम केला पाहिजे. सेवसी हे अर्जदास्त.

¶*Anandrao Yashwant in return for the loyal services rendered by him to the Company applies for the life pension granted to him to be continued to his son later on and asks for other considerations. His application is rejected.*

---

*No. 271*] [*3-3-1826*

अदालत नंबर १७

नकल

तारीख छ ३ माहे मार्च
सन १८२६ इसवी

**श्री**

**खुदावंद न्यामत अलीशान मेस्तर ज्यान**
**ब क स व भां (?) बहादूर आा कालेकटर**
**सुभे खादेश**

अर्जदास्त फिदवी गणपतराव नागेश मामलेदार ताो जामनेर आदाबंदगी तागाईत ताा १८ माहे फेब्रवारी परियेंत साहेबाचे नेक नजेरेकरून सरकार

नौकरीवर हजर असो. दिगर मा।र छत्रसिंग राजे सातारकर म्हणोन बोदवडास आले त्यास राजे हे नांव मोठे आणि दस्तक सरकारचें नाही! सबब मा।रनिल्हे अटकाऊन हुजूर अर्जी पा। त्याचा हुकूम नंबर २ चा इनात आला कीं तूर्त त्यास पेटिया देत जाऊन असा देणे. मागाहून हुकूम येईल तसे करणें. त्यास सरकार हुकुमाप्रा। मा।निल्हेस पेटिया देऊन आजपर्येत बोदवडास ठविले आहे. आजपरियेंत मा।रनिल्हेस अठतालीस दिवस जाले. दररोज पेटिया व चंदी मिलोन येक रुपया लागतो. येकूण आठतालीस रुपये खर्च होऊन चुकला परंतु त्याचे बोलणे की मी सर्व सोडून श्रीमहायात्रेस जातो. मजबरोबर च्यार माणसे आहेत ती पेटिया चाकर आहेत. आजवर राहिली आता राहात नाहीत. उठून गेली म्हणजे प्र(वा)सात माझा परिणाम लागणार नाही. यास्तव मजला हुजूर भुल्यास पा। द्यावें अगर जाऊं द्यावे असे दररोज बोलून कटकटी करितात. अतित्याई करून, येकयेक दिवस अन्न घेत नाही. यास्तव मा।र खावंदास कलावा म्हणोन अर्ज लिहिला आहे. हुकूम येईल त्या प्रा। करीन. खावंदास जाहीर होय हे अर्जदास्त.

*¶Ganpatrao Nagesh, Mamlatdar of Jamner, reports to the Collector of Khandesh the arrival of Chatursing Bhonsle of Satara at Bodwad and asks for instructi ns whether he should be allowed to proceed on his pilgrimage. This Chatursingh was a Pretender. The real one died on 15th April 1818.*

---

*No. 272]* *[25-11-1829*

नकल

**श्री**

यादी चिंतोपंत आकवरनीस राजापूर याणी लि।। आहे.

१ कारकून चिंतो विश्वनाथ उमर वर्षे ३४ उपनाम लवाटे मूळ राहाणे पुण्यास, बाजीरावसाहेबानी साताऱ्याचे बंदोबस्तास स्वार १००० व पायदल १००० व तोफा २ याप्रा। ठविले होते. त्यांत हजरनिसीचा दरोगा मजकडे होता. शके १७३९ माघ मासी कंपनी सरकारची पलटणे वगैरे सरंजाम सातारा घ्यावयास आली, त्या वेलेस ते स्वार व पायदल पलून गेले. मी सातारियात राहिलो. पुढे कंपनी सरकारात सातारा किला सही होऊन काही दिवसानी ग्रांटसाहेब बहादूर आले, तेव्हा मी त्यास जाऊन भेटलो. त्याणी सांगितले कीं तुम्ही सातारियात राहावे. माहाराज छत्रपतिकडील व नोकर लोक बालाजीपंत नातूसुधा काय वर्तणूक करितात ही आम्हांस दररोज कलवीत जावे, असे सांगून खर्चास दरमाहा पंनास रुपये देऊन गेले. याप्रा। च्यार वर्षे केली. पुढे संस्थान माहाराजास

देऊन ग्रांटसाहेब विलायतेस जाऊ लागला तेव्हा मजवल चिठी दिल्ही ती ब्रिक साहेब यास मी दिल्ही. त्यांणी सागितले कीं आतां पनास रुपये दरमाहा मिळणार नाहीत, व सातारियात कामहि नाही. तूर्त पंचवीस रुपये दरमाहा प्रो घेऊन आंबोजी घाटगे याचे राजापुरास जावे. पुढे दरमाहा वाढऊन दिल्हा जाईल. याप्रो सांगितले, त्याजवरून राजापुरास येऊन सात वर्षे जाली; येक दोन महिने कम आहेत. येकूण अकरा वर्षे कंपनी सरकारात चाकरी केली. प्रस्तुत सरकारची मर्जी असेल तिकडे मित्य आहे. तत्रापि पुण्यात जर्ज अदालतवाले आगर कालेकटर येकूण सरासरी पुण्यात राहाण्याचा मनोरथ आहे. सरकार पाठविनील तिकडे जाईन.

¶*Chinto Vishwanath, a servant in the Company's Government, states that he was at one time appointed to report the activities of the Chhatrapati, his servants and Balajipant Natu, and requests employment in Poona.*

---

*No. 273*] [*17-6-1831*

नंबर ४६

चकती परभार पुणे हजर
यास पाा तारीख ३० जुलई
सन १८३१ इसवी

**श्री**

पाा ताा ७ माहे जुलई सन १८३१ इसवी चकती १२ जुलई सन १८३१

कुंपणी सरकारासी

अर्जी बाा नारो मार्तंड बुंदले. फौजदार मुरु इहिदे मलासीन मयातैन व अल्फ अर्जी लिहिली ऐसीजे. पूर्वी श्रीमंत माहाराज राजश्री बाजीरावसाहेब याजपासी नोकरीस राहून हुजूर पागा व पीलखाना व उष्टरखान्याचे काम फिदवीकडे काही दिवस पाहात होतो. नंतर आमची तेथे परीक्षा न जाहाली, सबब राजीनामा देऊन ममईस गेलो. नंतर गौरनरसाहेब व नटिंगण जनरल साहेब व बुंदण साहेब याची भेट घेऊन साहेब यानी मेहेरबानी करून बालकृष्ण परभू याजपासोन बारा मोहरा सुरती देऊन पुण्यास बडे आलपिष्टणसाहेब याजकडे पाठविले. बडे आलपिष्टणसाहेब याणी बातमीचे काम सांगोन ठेविले. नंतर लढाईचे समयास बडे साहेब यासी लढाईची बातमी नवती तेव्हा ती बातमी आम्ही साहेबास कळविली. तो इतक्यात संगमावरता हला झाला ते समई बडे साहेब यास आम्ही जातीने खडकीस नेऊन पोचविले. त्याजवर आम्ही पुन्हा खडकीस जाऊन साहेबास भेटलो आणि बातमीचे मजकूर सांगत गेलो. या समयांत ग्राटसाहेब

व राबिनसनसाहेब व पाटजर सो व ब्रिकसो व करनेर बरसो व पोटसाहेब बसले असता आलपिष्टणसाहेब यास ग्राटसो याणी समजाविले की हा शकस दरजी आहे. याचे नाव सखाराम राहाणार संगमनेरचा म्हणोन सांगितले. तेव्हा मी दरजी किंवा ब्राह्मण आहे यांची चौकसी ते समई आम्हास ब्रह्मकर्माचा मूलमंत्र पुसोन चौकसी केली. त्याचीही खात्री जाहाली. नंतर आम्ही ब्राह्मण खरे म्हणोन बडे साहेबास नातू याणी सांगितले. मग बडे साहेब यानी ग्राट साहेब यास निर्षध करून आम्हास हजार पाचसे रु॥ बक्षीस देत होते आम्ही न घेतले आणि बोलिलो की या समयास बक्षीस घेत नाही. तुम्ही पुणे सर केल्यावर जे घेणे ते घेऊ म्हणोन पुन्हा बडे साहेब यांची सर्फराजी करून घेऊन पुण्यास बातमीचे कामावर आलो. इतक्यात आम्हास भवानी पंठत बापू गोखले याणी धरून आमचे घरदार लुटून आम्हास कैद केले. नंतर तिसरे रोजी कुंपणीसरकारचा आमल पुण्यास आला. त्या धांदलीत गोखले याचे कैदेतून पलोन पंढरपुरास गेलो. तेथे पुन्हा आम्हास गोखले याजकडील काकोबाने धरून कैद केले व तेथील आमची सर्व जिदगी लुटून घेतली व दंड घेऊन तेथोन काकोबाहि निघोन गेला. मग सोलापूर मुकामी जनरल तांमास मडगल साहेब आले तेथे आम्ही जाऊन त्यांची भेट घेतली आणि त्यास हा पेशजीचा मजकूर समजाविल्यानंतर त्याणी आम्हावर सर्फराज होऊन आमचे हातानें कामकाजे घेतली व आम्हास बक्षीस देऊन साहेब याणी पंढरपुरास कोतवालीचे कामावर पाठविले. पुढे ग्राटसाहेब साताऱ्याचे कामावर आले तेव्हा पंढरपूर सातारे इलाख्यात आले ते समई आणखी आम्हास हा दरजी आहे असे म्हणोन आम्हास पुन्हा कैद केले आणि आमची जिदगी नेली. हा मजकूर आम्ही परभारे बडे साहेब यास कळविला. मग ग्राट साहेबास बडेसाहेब याणी लिहून पुन्हा आमचे काम आम्हास देऊन व आमची जिदगी नेली होती ती देऊन आम्हास पंढरपुरास रवाना केले. त्याजवर मागील आकसामुळे उरगोंच तुफान बडव्याचे घर जप्त केले असे करोन आम्हास बडतर्फ करून साताऱ्यास आणिले. तेथे चौकसी करितां तेहि खोटे जाले. मग पुन्हा आम्ही हे वर्तमान बडेसाहेब यास कळविले तेव्हा ज्यान मडोल साहेब यांस बडे साहेबानी हुकूम पाठविला. मग त्याणी पंढरपुराहून आम्हास बलाऊन नेऊन सोलापूरचे कलकटर सो याणी तेथील फौजदारीचे काम सांगितले. त्याजवरहि आणखी अशाच आम्हावर सोद्या लुच्याच्या तुफानी गोष्टी ऐकून दोन च्यार वेळा तहगीर बहाली होत गेली. आम्ही वरचेवर मजकूर बडेसाहेबास जाहीर करीत गेलो. बडेसाहेब चौकसी करून आमचे काम आम्हास देतच गेले. आलीकडे सोलापुरास कामावर साहा

साहेब असता आम्हाकडे फौजदारीचे काम होते. त्यास कामगार लोकानी आम्हावर दुषमानी ठेऊन शाहासाहेब यास समजाविले की फौजदार नारोपंत यांणी सिलकेपैकी शेपनास रुा मोबदला केला वगैरे उगयाच तुफानी गोष्टी समजाऊन आम्हास कामावरून आमानत केले आहे. त्यास आजमासे आठदाहा महिने जाहाले. आम्ही तो त्या दुःखाने निघोन इतके दिवस पंढरपुरास जाऊन बसलो होतो. परंतु आम्हास शाहासाहेब याचे बरावर्ण येऊन आमचे काम आम्हास द्यावे ते आद्यापि देत नाही. याजमुळे देवाजवळून उठोन हा मजकूर पेशजीपासोन कुंपणीसरकारची नोकरी बडेसाहेब याजवळ करोन त्याचा जीव वाचविला व सरकारची लाखो रुपयाची किफायत केली व कुंपणीसरकारची नोकरी बहुत संकटात केली व नोकरी केली याजमुळे इजा बहुत भोगिली व हाली आम्हास उगीच काही कारण नसता कामगार लोकाची दुषमानी आम्हावर त्याच्या तुफानी गोष्टी एकून अमानत केले आहे वगैरे सर्व मजकूर इस्तकबील पासोन अर्जी लिहून गोरणरसाहेब बाहादूर यास खबर द्यावी याजकरिता जाहीर केले आहे. तरी खुदावंद मला हकनाक अमानी करून माझा पगार बंद केला आहे त्यास आपण दिनदुनियेचे मालक आहात. मी अर्ज केला आहे याची चौकशी होऊन फिदवी-वर सर्फराजी करोन आमचे कामावर आम्हास बाहाल करोन अमानत केल्यापासोन पगार सरकारातून येणे तो देविला पाहिजे. माझी जागा सोलापूरची खाली नसल्यास मला जागा नोकरीची दुसरी द्यावी. आम्ही कुंपणीसरकारात मोठ्या आडचणीचे प्र(सं)गास काम करोन बहुत इजा भोगली आहे, याचीहि चौकसी करावी. आपले राज्य इश्वराने केले म्हणोन आमची मोकळीक गोखले याचे कैदेतून जाली. नाही तर आमची गत कैसी होती? साहेबबहादुर यांणी याचा विचार दिलात पाहावा. आपल्या उपयोगी संकटवेळेस पडलो त्याप्रो आम्हास आबरू मोठी मिळावी ते न होता साहेब लोक मनात न आणिता हलक्या मनुष्याच्या गोष्टी एकून आजपर्यंत आम्हास इजा देतच गेले आहेत. खुदावंत येविसी तपास पाहून मला नोकरीची जागा माझे आबरूप्रो मला मिळाली पाहिजे. तारीख १७ माहे जून सन १८२१ इसवी हो अर्जी लिहून दिली सही.

रुजू नारो मार्तंड बुधले फौजदार

¶*Naro Martand recounts his whole life's story, how he entered into the Company's service for supplying secret information of the Peshwa, how he saved the life of Elphinstone when the Poona Residency was attacked, how tales were carried by his enemies to the English officers who thereupon dismissed him from service on several occasions and how he at every time appealed to the Governor and got himself reinstated. Herein also he applies for a similar reinstatement.*

7247

No. 274] [24-12-1831

तर्जमा जाला असे

यादी दौलतराव घोरपडे आमिरुल उमराव मुख्य समान सलासीन मया तेन व अलफ. खुदावंत न्यामत आलीशान आलफिष्टणसाहेब बाहादुर यांणी आम्हास पुणे मुकामीहून आवरंगाबादेस मेस्तर सीदेनसाहेब[1] बाहादुर रेजीडंट शहर मजकूर याचे खिजमतीत रवाना केले. नंतर त्या साहेबांनी राजे गोविंदबक्ष बाधूर यांचे सरकारांत पंधरा घोड्याचा बंदोबस्त करून दिल्हा. सात वर्षे त्याचे तैनातीत चांगली नोकरी केली. ज्या वेलेस मेजर देवीसाहेब बहादुर यांजकडे पांच हजार स्वार स्वाधीन जाले त्या वेलेस देवीसाहेब[2] यांणी आम्हास जमादारी दिल्हा. नंतर त्यांणी आपले ताबेदारीत ठेविले. पुढे देवीसाहेब सारी जमात आपली घेऊन आम्हास घेऊन लक्ष्मण नाईक यांची हाटी वसमत नांदेड इकडे माजली होती त्याचे पारपत्याकरिता नेले, ते समई आम्ही बहुत मेहनत केली. नंतर हाटीवाले लक्ष्मण नाइक भिल यांची फार खराबी जाली. हाटी सोडून पलून गेला. नंतर पेंढारी येऊन उपद्रव करू लागले, तेव्हा तीच फौज घेऊन साहेबासुद्धा आम्ही पेंढारी याजवर जाऊन त्यासी लढाई करून त्याचा मोड केला. नंतर ते पळून गेले. त्याजवर त्रिंबकजी डेंगले सरकारासी बदलून बंड करून फौज धरून उपद्रव करू लागला होता, त्यांची फौज गोताल्याचे घाटाखाली गणेशपूर येथे जमली होती. कनचे (?) घाटापासून वीस कोस ती जागा होती, त्याजवर जाण्या-करितां देवीसाहेब यांणी आपली फौज तयार करून आम्हास घेऊन छापा घालावयास गेले. फौज जाऊन त्या फौजेचे नजीक पोहचली तेव्हा साहेबांनी फरा बांधून सर्वत्रास जाहीर केली की या प्रसंगी जो कोणी मर्दुमी करील त्याजवर बहुत सरफराजी होईल. तेव्हा आम्ही बरखुरदार पिराजीराव व बापूराव व महंमद हबीबुल्ला दफेदार व शेख मानुला जमादार व येशवंतराव दफेदार व बलवंतराव व हाजी आबदुला मेजर व सेख फतेमहंमद व सरफराजखां जमादार व हैदरखां व दायमखा व आणखी स्वार येकूण पस्तीस स्वार घेऊन डेंगले याचे फौजेवर उठावणी केली. तेथे फार लढाई जाली. बहुत आसामी त्याजकडील मारले व काही घायाल जाले. त्यांचा मोड केला. लढाईचे समई माझी तरवार मोडली. नंतर आम्ही लढाई सरसी करून आम्ही व पिराजीराव व बंदेअली मुनसी देवीसाहेबाचे, महमद हबीबुल्ला दफेदार व सेख मानुला जमादार व हाजी महमद अबदुल्ला असे बारा आसामी येके जाग्यावर उभे राहिलो.

1 Sydenham 2 Davis.

7248

डेंगल्याचा भाऊ च्यार हजार फौज घेऊन आम्हावर घोडे चालविले. खुद हात्यार चालले. आमचे डोकीवर येकानें तरवार मारली, त्याणे पगडी तुटून डोसकीस जखम जाली. त्या अदमीस आम्ही ठार मारिले व महंमद हाबीबुला दफेदार याणी फार मर्दुमी केली. त्याचे खालचा घोडा ठार जाहाला व त्याजलाहि जखमा जाहाल्या. सर्वत्रांनी मर्दुमी करून त्या लोकाचा मोड करून ते पळाले. देवीसाहेब व रनीसाहेब[१] येके ठिकाणी घायाळ पडले होते. त्या वेलेस आमचे मनात आले की साहेबास व आपले लोक घायाळ पडले आहेत त्यास संभाळून आपले लस्करात न्यावे. तों डेंगल्याचा पुतण्या चार हजार फौज घेऊन पुन्हा अंगावर आला आणि आमच्या सभोवता घेरा घातला. ते समई पंचवीस तीस आसामी स्वार आम्हापासी येऊन पोहचले. तेव्हा त्याची आमची लढाई खूप जाहाली. त्याची माणसे फार मारली गेली व घायाळहि बहुत जाले. तेव्हा डेंगल्याकडील लोक राहिले होते ते पळून गेले. आमची फत्ते जाली. नंतर साहेब लोक व आम्हाकडील काही लोक जखमा लागून पडले होते ते आम्ही सारे सांभाळून आणून गोताल्याचे घाटाखाली डेरा देऊन उतरलो, आणि तेथे मुकाम केला. देवीसाहेब त्या रात्रीस पिराजीराव यास घेऊन आवरंगाबादेस गेले. काही दिवसानी आम्हासहि साहेबानी अवरंगाबादेस बोलाऊन नेले. पिराजीराव व सेख मानुला जमादार व बापूराव हे, तिघे आसामी रेणीसाहेब बहादुर यांचे बरोबर होते. डेंगल्याचे स्वारानी त्यांजवर हल्ला केला. लढाई मोठी जाहाली. गनीम यांचा इरादा की साहेबास ठार मारावे. परंतु पिराजीराव याणी बहुत बाहादरी केली, आपण जखमी जाहाला. सेख मानुला जमादार याणी फार मर्दुमी केली. तेव्हा पिराजीराव जमादार याणी साहेबास संभाळून लस्करात आले. यास्तव साहेबानी पिराजीराव याजवर मेहेरबान होऊन येक घोडा व येक तरवार बक्षीस दिल्ही. पुढे सारी फौज अवरंगाबादेवर जमा झाली. देवीसाहेब याणी त्या फौजेस बहुत आवरू दिल्ही आणि आम्हास राजे गोविंद बक्ष याजपासून खिलत देविली. देवीसाहेब व सिदनाम साहेब रेजिडंट अवरंगाबादेचे याणी आम्हास हुकूम दिल्हा की तुमचे बाहादारीचे बाबे हुजूर बंदीगानअली व रसलसाहेब रेजिडंट हैदराबाद यास लेहून पाठविले आहे. ईश्वर-सत्तेने रसलसाहेब यांचे मारफतीने तुम्हास सरफराजीची खिलत होईल. कलम

१ रेणीसाहेब बहादूर याणी आपले समागमे आवरंगाबादेहून पुण्यास आणिले. येथे आल्यावर आलपिष्टान साहेब बहादूर याची भेट घेतली. नंतर साहेब याणी आमचे बाबे अलपिष्टनसाहेब याजपासी लढाईचे व जागजागी मर्दुमी केल्याचा

1 Renny.

+ हें निजामलीचें नांव. तो ता. ६-८-१८०३ रोजीं मरण पावला होता.

7249

हवाला झाडून समजाविला व सिपारस फार केली. तेव्हा अलपिष्टाण साहेब याणी बहुत मेहेरबानगी केली आणि सरकारात स्वार लोकांची भरती करावयाची होती ते समई आलपिष्टाणसाहेब याणी आम्हास रिसालदारी दिल्ही व सेख मानुला यास जमादारी दिल्ही व महमद हबीबुला यास दफेदारी दिल्ही व सरफराजखां व येशवंतराव यास दफेदारी दिल्ही व पिराजीराव यास देवीसाहेब बहादूर याणी आपले फौजेत जमादारी दिल्ही व बापूराव यास दफेदारी दिल्ही. ते हैदराबादेहून पुणे मुकामी बंदीगान अली याणी सरफराजीची खिलत राजे चंदुलाल यांचे खत मेहेरबानगीचे व येक जोड पिस्तुलाचा रसलसाहेब यांचे तर्फेचा याप्रमाणे आम्हास मिळाले. पुढे पेशवे सरकारचा व कुंपणी सरकारचा काही विघाड सुरू जाहला, ते समई अलपिष्टाणसाहेब व ग्राटसाहेब याणी आम्हास हुकूम दिल्हा की पेशवे सरकारची बातमी आम्हास हरयेक समजावीत जावी. त्या हुकमाप्रमाणे जी बातमी समजेल ती साहेबापासी समजावीत होतो. आलपिष्टाणसाहेब याणी कर्णेल-साहेब स्वाराचा कमांनीन[?] होता त्याचा हुकूम दिल्हा की रांजणगावपरियंत पेंढारी-याचे मोकवल्यास जावे. ते कमानीन साहेब आपली जमत घेऊन मसीदीचे रांजणगावास पेंढारियाचे बंदोबस्तास गेले. आम्ही खबर आलपिष्टाणसाहेब यास दिल्ही की पेशवे याजकडील फौज आपल्यावर येकादसीचे दिवसी येणार आणि आपल्यावर दगा करणार आहेत. आलपिष्टाणसाहेब बोलले की कर्णेल-साहेब यास आम्ही गणपतीचे रांजणगावास जाण्याचा हुकूम दिल्हा आणि ते मसीदीचे रांजणगावास कां गेले? असे बोलून आम्हास हुकूम दिल्हा कीं तुम्ही खुद मसीदीचे रांजणगावास जाऊन फौज सुधा कर्णेलसाहेब यास जलद घेऊन पुण्यास येणे. आम्ही हुकूम देताच निघालो ते कोंडापुरास गेलो. तेथे कर्णेलसाहेब व मर्कलोट[+] साहेब व किमक साहेब भेटले. त्याजला आलपिष्टाणसाहेब याणी चकनी दिल्ही होती ती दिल्ही. त्याणी वाचून पाहताच फौजेसुध्या कूच करून माघारे फिरले. फौज वाघोलीपर्यंत येऊन पोहचली. तेथे तोफेचे आवाज एकू येऊ लागले. कुंपणी सरकारची व पेशवे याचे फौजेसी लढाई लागली हे समजताच आम्ही रातोरात फौजसुधा पाहाटेस खडकीस येऊन फौजेत पोहचलो. नंतर अलपिष्टाणसाहेब याची भेट जाहाली व आणखीहि साहेब लोक याच्या भेटी जाहाल्या. तीन रोज लस्करात आनापाण्याची फार तंगचाई होती. सबब आल-पिष्टाणसाहेब याणी हुकूम दिल्हा की तुम्ही कोणाकडेहि जाऊन आनाज अगर जनावरे जे मिळतील ते घेऊन येणे. हुकमाप्रमाणे आम्ही जाऊन लमाणांचा तांडा व मोकळी गुरे लस्करात आणिली. साहेबानी पाहून बहुत खुसी होऊन

---

| Commanding.    + Macleod and Camac.

7250

बहुत मेहेरबानगी केली. खूप होऊन बोलले कीं तुमचे स्वारास दरमाहा साठ रुपये पगार मिळेल आणि बरतर्फी कधीहि होणार नाही. कलम

१ पेशवे याणी आमचे बापास व आम्हास बोलणें लाविले कीं कुंपणी सरकारचे फौजेत फितूर करून आम्हाकडे आणावे, या निमित्ये पैका पडेल तो आम्ही देऊ आणि च्यार लक्षाची जाहागीर व च्याळीस हजार फौज याप्रो। तुम्हास करून देतो. या कामाकरितां पस्तीस हजार रुपये पाठविले आणि जितका रुपया या कामास लागेल तितका तुम्हास देतो आणि आम्हाकरितां वीस हजार रुपये पाठविले आणि बोलले की तुम्हास जहागीर निखालस व सारे फौजेचे सरदार करून देतो. आमचे सरकारात खैरख्वा तुम्ही करावी आणि इंग्रजी सरकारचे फौजेत फितूर करून आम्हास मिळवावी. याप्रो। सारा हवाल आम्ही आलपिष्टणसाहेब यास जाहीर केला. त्यावा। हुकूम दिल्हा कीं तुमचे वडिलाकडे रुपये पाठविले आहेत हे घ्यावे व आम्हीहि पाठविले असता घ्यावे; परंतु आमचे सरकारांत खैरख्वाने असावे, तुम्हास वीस हजार रुपये दिल्हे आहेत हे घेऊ नका, तुम्हावर कुंपणी सरकारची सरफराजी होईल आणि मर्तबाहि मोठा होईल व बदतीहि तुमची मोठी रोजचे रोज होईल. साहेबाचा हुकूम ऐकून येक पैसा आम्ही घेतला नाही. कुंपणी सरकारत आजपर्यंत खैरख्वा करीत आहो. कलम

१ पेशवे सरकार पुणे सोडून बाहेर निघाले तेव्हा आलपिष्टणसाहेब याणी आम्हास हुकूम दिल्हा कीं तुम्ही शहरची नाकेबंदी करून बंदोबस्त राखणे. त्या हुकुमाप्रमाणें शहरचा बंदोबस्त केला. पेशवे सरकारचे पाठीमागे कुंपणी सरकारची फौज लागली. आम्हीहि समागमे होतो. वीरवाल्ह्यास त्या फौजेची व आपले फौजेची लढाई जाली त्या समई आम्ही बहुत बाहादरी केली. आमचा आसबाब तमाम लुटला गेला. कर्णेल कनिंगम साहेब पेशवे यांचे फौजेत घेऱ्यांत सापडले होते, त्या समई आम्ही व मेजर मकलोड साहेब सवारासुध्धा कर्णेलसाहेबांची मदत केली. लढाई करून साहेबास आपले लस्करांत आणिले. दुसरे रोजी नीरेचे पुलाजवळ लढाई जाली ते समईहि आम्ही फार मेहनत केली. कलम

१ पेशवे सरकार याणी रसद गला वगैरे मदत सिंहगडास पाठविली होती, ते समई किल्ला इंग्रजी फौजेसी लढत होता. आलपिष्टणसाहेब याणी मेजर मकलोड साहेब यास व मजला हुकूम दिल्हा की तुम्ही आपला रिसाला घेऊन जाऊन रसद चालली आहे ती लुटून फडशा करून टाकणे. त्या हुकुमाप्रमाणे आम्ही जाऊन लढाई करून रसद झाडून लुटून फडशा करून टाकिली व किलाही लढाई करून घेतला. कलम

१ पुरंदर किला लढूं लागला तेव्हा पलटण व आम्हाकडील स्वारानी घेरा घातला. तीन दिवस लढाई जाली. नंतर किलेदार मिलाला आणि किला सर जाहला. ते समई लढाईंत आमचे येका स्वाराचा घोडा मयत जाहला. कलम

१ पुरंधराहून पंढरपुरास फौज जात होती त्या वख्तीं कर्णेल इस्मीटि साहेब व आलपिष्टणसाहेब व ग्राट साहेब व पाटंजर साहेब व आमचे वडील येशवंतराव व मुनसी महंमद हानीफ व शंभर स्वार तुरपांचे व आणखीहि साहेबलोक होते त्यास श्रीमंताचे फौजेस घेरा घातला ते समई आम्हास खबर लागली, तेव्हा आम्ही व आमचे रिसाल्याचे स्वार व मेजर मकलोटसाहेब याप्रमाणे श्रीमंताचे फौजेवर जाऊन लढाई करून साहेब व तुरुप सारे लस्करांत आलों. नंतर लस्करचे कूच तेथून होऊन नांदली काष्टीवर आलों. तेथे श्रीमंताचे फौजेची लढाई जाली, ते समई आम्हीं बहुत बाहादरी केली. नंतर फौजेसुध्धा पुण्यास आलो. नंतर पलटण येक व स्टानिष्टणसाहेब[1] याचा रिसाला घोडनदीहून पुण्यास येत होता त्याजला कोरेगावापासी श्रीमंताचे फौजेने घेरले. लढाई सुरू जाहली. पलटणचे स्वार व लोक फार मारले गेले. ही खबर पुण्यास आली. कर्णेल कनिगंम साहेब व आम्ही व सारे स्वाराचे रिसाले व येक पलटणची कंपणी व आरटिलेरी ऐसे मिलोन स्टानिष्टणसाहेबाचे कुमकेस जात होतो, तो श्रीमंताचे स्वाराची व आमचे फौजेची वाघोली मुकामी लढाई होत होत पुण्यास आलों. ते समई कल्याणसिंग जमादार बाण लागून जखमी जाला व येक घोडा आमचे रिसाल्याचा मारला गेला. कलम

१ सातान्याचे राजे यांणी पुरंदरचे नजीक येक गाव होता तेथे मुकाम केला होता. ते समई मजला हुकूम जाहाला की तुम्ही राजेसाहेब याचे समागमे आसावे. फिरून दुसऱ्याने हुकूम जाहाला की किले वासोटा याजवर हांटरसाहेब व दुसरा साहेब व राजेसाहेब याचा खटला कैदेत आहेत त्यास कर्णेल पलटणचा ते व तुम्ही मिलोन लढाई करून त्यास आणावे. हुकूमाप्रमाणे आम्ही जाऊन लढाई करून कैदी होते त्यास आणून कर्णेल पलटणचा यांचे सपूर्द करून आम्ही लस्करांत आलो. नरसिंगराव पोल जमादार वासोट्याचे किल्यापासी पन्नास हती श्रीमंताचे धरून आलपिष्टाणसाहेब याचे सिपूर्द केले. पुढे आलपिष्टाण साहेब पुण्यास आले आणि आम्हास हुकूम दिल्हा, की किला जुनर व हाटसर व चावन याजवर तुम्ही जावे. हुकुमाप्रमाणे आम्हीं जाऊन किला हाटसरचा घेतला. आन्याबा राहतेकर याणी पांचहजार जमेतसुध्धा चावंडचे किल्यापासी मुकाम केला होता, तेव्हा मेजर मकलोट साहेब व आम्ही शंभर स्वार घेऊन त्याजवर गेलो. तेथे लढाई करून आन्या-

1 Staunton.

बास धरून आणिलं आणि त्याचे लस्करात लुटी करून आलपिष्टाणसाहेब याचे सिपूर्द केली. किल्ला हा (वा ?)मोटाहि लढाई करून घेतला. कलम

१ राजे धर्माजी प्रतापराव बंड जाहाला होता. बिडाचे नर्जीक होता. आमचे लस्करापासून पर्स्तीस कोस होता, त्याजवर दौड केली. मौजे डोंगरकिणीवर जाऊन तेथं स्वारांचा छाट करून शंभर स्वार व मकलोटसाहेब सुध्या आम्ही जाऊन त्याजवर छापा घातला. त्याची फौज पळून गेली व तोहि पळाला. कलम

१ गारदवडेवर मुकाम होता तेव्हा, कर्णेल कानिंगम साहेब व किमकसाहेब[1] यांणी मजला शंभर स्वार बरोबर घेऊन पशवे याची फौज पंनास हजार होती. यासी मोकबला केला कीं नंतर जर्णेल इस्मिटसाहेब व आलपिष्टाणसाहेब याणी तोफ फौजसुध्या घेऊन पोचली. लढाई केली. श्रीमंताची फौज पळाली. त्या रोजी बहुत माल व घोडी वगैरे लुटून सरकारात दाखल केले. नंतर पुण्यास आलो. कलम

१ जैतांचा[१] कार्जी रासीनात बंड जाहाला होता, त्याजवर आम्ही दौड करून त्याजला धरून सरकारात हजर केला. कलम

१ निंबाल्कर कृष्णाजीराव बंड होता त्याजवरहि आम्ही दौड करून त्याचे पारपत्य करून बहुत खराबा करून तो पळून गेला. कलम

१ बारसीपासून च्यार कोसावर देसाई बंड करून होता, च्यापलीनसाहेब यांचे हुकुमाप्रमाणे त्याजवर दौड करून लढाई करून त्याजला बरबाद केला, तो जाती-निसी पळून गेला. कलम

१ कितूरची राणी सरकारसी बदलली होती ते समई त्याजवर फौज गेली होती. इसपिलेरसाहेब[2] व आम्ही शंभर स्वार सुध्या होतो. त्या लढाईत फार मेहनत केली. कलम

१ कोलहापूर राजे बदले होते तेव्हा इसपिलेरसाहेब व माल्फिनसाहेब[3] व आम्ही आपले रिसालेसुधा त्या कमानात गेलो होतो. कलम

१ कोलापुराकडून कोणी घोरपडा बंड करीत होता तेव्हा इसपिलेर साहेब याजला हुकूम सरकारचा जाहला कीं बंडाचे पारपत्य करणे. ते समई आम्ही आपले स्वारसुधा त्याजवर जाऊन फार मेहनत केली. बंडाची फौज पळाली. घोरपडे यास धरून सरकारात स्वाधीन केला. कलम

1 Camac. १ जितीचा. 2 Pritzler. 3 Malfin.

१ उमाजी रामोसी सरकारासी बदलला होता त्या मोकबल्यात आम्ही फार मेहनत केली आमची खैरखाई इसपिंलरसांहब यास माहीत आहे. कलम

१ बंदर ममई येथे दरवड्याचा व चोराचा फार उपद्रव होता ते समई मालफिनसाहेब याजवर सरकारचा हुकूम सादर जाला त्यांणी आम्हास ममईस बंदोबस्ताकरितां पन्नास स्वार समागमे देऊन पाठविले. खावंदाचे आमबलसे (?) थोडे दिवसात दरवड्याचा व चोराचा बंदोबस्त केला हा हवाला आमचे मेहनतीचा सरकारास वाकब आहे. कलम

१ आम्ही नबाब निज्याम अलीखां बहादूर यांचे फौजित राजे गोविंदबक्ष व मेजर देवीसाहेब बाहादूर याच्या हाताखालीं सात वर्षे नोकरी केली व कुंपणीसरकारांत पुणे इलाख्यात स्वारांत येकत्रीस वर्षे गुजरत आली नोकरी करीत आहो. आमचे रिसाल्यात सरकारकामावर चांगली मेहनत केली, जखमी जाहाले व घायाल जाले व काही मयत जाले व सरकारातून रिसाल्यात काही कमी स्वार करण्याकरिता हुकूम आला ते लोक बरतर्फ जाले. त्याची व मयत जाले त्याचे कुटुंबाची आजपर्यंत मी परवरीं करीत आहे. जे लोक जखमी जाले व मयत जाले त्यांचे लडके बाले आपले बेहबुदीकरितां उमेदवारीने मजपासी दिवस काढितात. आम्ही दाहा वर्षापासून कर्णेल कलुप व आलपिष्टाणसाहेब यांचे खिजमतीत आजपर्यंत चालत आहो. सरकारास रोशन आहे कलम

येणेप्रमाणे कलम लिहिली आहेत त्याजवरून खावंदास रोशन होईल. ता छ २४ माहे डिजेंबर सन १८३१ इसवी

सही दौलतराव घोरपडे आमिरुल
उमराव सही खुद.

¶*Daulatrao Ghorpade of Sandur, son of Yashwantrao, submits a detailed account of the loyal and arduous services which he rendered to the British Government in the late war. The writer mentions particularly how faithfully and promptly he obeyed Elphinstone and did many heroic deeds in his behalf. The paper is important as it throws fresh and personal light on many incidents connected with the last days of the Peshwa and the desertions that took place in his army. The paper is original.*

7254

*No. 275*] [*14-5-1836*

एजंट रूमाल नंबर ३२
नंबर ४२१

श्री

यादी हरि गोविंद देशमुख सुा सीत सलासीन मयातैन व अलफ. श्रीमंत माहाराज पंत प्रधान यांचे श्री देवघरचे श्रीदेव श्रीक्षेत्र वाई येथे आहेत ते ब्रम्हावर्तास न्यावयाकरितां कारकून पाठविले आहेत. त्याजवर सरंजाम वितपसील :—

१ मेणा भोई समेत
२ डोल्या भोई समेत
५ स्वार असामी
२ उंट नफर
१ कुंपणी सरकारचा पटेवाला
२० सिपाई हत्यारबंद वगैरे
६ तट्टू ओझ्याचे

---

येणेप्रमाणे श्रीदेवाची स्वारी पुण्याहून ब्रम्हावर्तास जात आहे. त्यास मार्गी कोणी मुजाईम न होता ज्या गांवीं वस्तीस राहातील तेथे चौकी पाहारा करून आपलाली हदपार करून देत जाणे म्हणोन रहदारीचे दस्तक देण्याविसी हुकूम जाहला पाहिजे. मिति वैशाख वा। १४ मंदवार शके १७५८ दुर्मुख नाम संवत्सरे

सही हरि गोविंद देशमुख दस्तुर खुद

हुकूम की कलेक्टरसाहेब यांजकडे याद पाठऊन दस्तक आणऊन देवावे. ता। १४ माहे मे सन १८३६ इसवी.

(*Signed*) (*Illegible*)
*Agent.*

¶*Hari Govind Deshmukh asks for a passport for the family idols of the Peshwa to be taken from Wai to Brahmavarta accompanied by a small party. The writer was Bajirao's agent in Poona, see No. 264 above.*

7255

*No. 276*] [*28-10-1811*

पौा छ ७ जिलकाद

मुा इसने अशर

मया तैन व अलफ

श्री

वडिलाचे शेवेसी आपत्यें समान कृष्णाजी नाईक गायकवाड साष्टांग दंडवत विज्ञापना तागाईत छ १० माहे सवाल मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें बालकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. जैपूरवाले राजे माधवसिंग याचा वडील पुत्र प्रीर्थीसिंग गादीवर होता तो निवर्तला. ते समई त्याची स्त्री गरोदर होती. तेव्हां प्रीर्थीसिंगाचा बंधु प्रतापसिंग यास गादीवर बसविलें. गादीवर बसतांच त्याणी वडील बंधुची स्त्री गरोदर होती तिजकडे चवकया पाठविल्या. नंतर तीस पुत्र जाहाला हें वर्तमान प्रतापसिंगास कळलेस इज्ञ होईल जाणोन, युक्तीणें आईनें पुत्रास मातुलाचे घरीं पोहोचविलें. तेथें नांव राजश्री मानसिंग ठेविलें. सात आठ वर्षाचे होऊन ते प्रांतीं राजश्री माहादजी सिंदे फौजसुद्धां गेले ते समयीं (सिंदे) याजकडे मानसिंग येऊन पोहोचले, तेव्हा स्वारी समागमे मशारनिले होते. ते समयीं जैपूरप्रांतीं गेल्यावर सिंदे याणी * * * मान धरूण ठाणींही कितेक कायेम केलीं होतीं. ती पटाईत भाऊबंदपैकी राजश्री राव राजा याचे * * * * * तेच शेवटीं फौजा माघारीं आल्या. तेव्हां मानसिंगाचे खर्चाचा बंदोबस्त करून देऊन ग्वालेरीस ठेविले. पुढें जैपूरची मालकी त्याज-कडेसच होण्याचे अगत्य होतेंच. माहादजी सिंदे देशीं आले, ते समयीं सांगितलें कीं आम्ही देशीहून आल्यावर बंदोबस्त करूण देऊं. देशीं आल्यावर ते इकडे-सच मृत्य पावले, त्यापेक्षां कोणतेंहि घडण्यांत न आलें. तिकडे प्रतापसिंग गादीवर होते ते निवर्तले. आण त्याचा लेक राजश्री जगतसिंग प्रस्तुत गादीवर आहेत. हा मजकूर येथें पेशजीपासूण विदित आहेच व हाली मानसिंग ग्वालेरीस आहेत. त्यांचें बोलणें येथें आले तेव्हां विच्यार पाहातां आज वीस पंचवीस वर्षें जाहालीं. आपले आश्रयां (स) येऊण आहेत; आण सिंदे यांणीं आश्वासन दिल्हें ते कैलासवासी जाहाले. राजश्री आलिज्याबाहादूर यांजकडून कांहीं विच्यार कर-ण्यांत आलाच नाहीं. हलीं मशारनिलेकडून बोलणें आपल्याकडे आले. तेव्हां मशारनिलेचे भेट घेऊन विच्यार पुसला कीं तुम्हास अनुकूल कोण कोण आहेत. त्याणी सांगितलें कीं राव राजे माचेडीवाले हलीं दाहा पंधरा हजार सरंजामानशीं ते आपले संस्थाणीं आहेत. ते व राजश्री कृष्णगडवाले राजे व मारवाडवाले राजे मानसिंग व पटाईत भाऊबंद सर्व अनुकूल आहेत. त्याचें बोलणें कीं तुम्ही

निघोण आम्हाकडे यावें. आम्ही संस्थाणावर कायेम करून देऊं. याप्रमाणें (बो)लत असतां मशारनिलेचें माणस जें कर्णे तें श्रीमंत साहेबांचे हातूण व्हावें, ऐसें मशारनिलेचें मानस आहे, येविशी (आलिज्या)बाहादर यांस सरकारचें पत्र यावें. * * * * (बंदो)बस्त करून द्यावा. खुशाल बोहोरा प्रस्तुत जैपुरास कारभार करितो, तेहि अनुकूल आहेत. त्यास फौज पल्टणें समागमे * * * कायम करावें. आंतील रहश पाहातां सर्वाचें लक्ष मानसिंगाकडे आहे. बहुतेक आपण आपल्याकडेसच हें काम करूण घ्यावें, म्हणजे इकडे फौजहि परस्परें पोसल. जैपूरचे राज्य आपलें हातीं राहील, तर हें आपल्याकडून फौजेचा विचार न आल्यास याप्रमाणें राजश्री आलीज्याबाहादर व राजश्री बाळोजीबावा यांस पत्रें द्यावीं कीं माणसिंग यास संस्थाणीं कायेम करावें. संस्थाणीं कायेम जालें असतां सरकारचा नजराणा पंधरा लक्ष रुपये देतील, व तुम्हास येक लक्ष रुपये अंतस्त देतील. याप्रमाणें त्याचा व आमचा बोलण्यांत करार जाला आहे. येविसी राजे याणीहि ग्वालिता पारसी पत्राचा श्रीमंतसाहेब स्वामीस दिल्हें आहे व आपलेंहि नावें रांगडी पत्र दिल्हें आहे. त्यांचे पत्राचें उत्तर ग्वातरजमेचें यावें. आपण विचार पाहूण पत्राचीं उत्तरें पाठविलीं पाहिजेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री बाळोजीबावाचे विचारास हे ममलत आली आहे. पूर्वी यासी व आंबोजी इंगळे, यासी बोलणें जालें होतें. बाळोजी बावाचें पत्र आपल्यास आहे. त्यांत मजकूर बारीक बहुत आहे, तो ध्यानास यावा हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad writes to Trimbakji Dengle that Daulatrao Sindia should be requested to decide the question of succession to the rulership of Jaipur in favour of Mansing, as he is supported in his object by the neighbouring principalities and is willing to offer 15 lakhs by way of a present.*

---

*No. 277*] [*12-11-1811*

पा। छ २४ जिल्काद सुा

इसने अशर मया तैन व अल्फ

**श्री**

वडिलाचे शेवेसी. आपत्यसमान कृष्णाजी नाईक गाईकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ २९ माहे सवाल बुधवार मुकाम लष्करनजीक ग्वालेर येथें बालकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्याबाहादर रोज गुदस्त उठोन शौच्यविधि मुखमार्जन करून स्नान केलें. देवघरांत जाऊन देवतार्च्यन व नित्ते+ दाणें होऊन तेथें प्रसाद शेवण करून वाडांत जाऊन भोज्यन जालें. निद्रा होऊन मागील प्रहर दिवस राहातां कचेरीस आले. दरगदार मंडळी

\+ नित्य दानें.

मानकरी पागे पथक सिलेदार मंडळी सर्वांचे रामराम जाहले. नंतर आपण व राजश्री गोपाळराव चिटनीस गोकुळ पारख मोरो हरि येकांतीं बसून लोकाचे खर्चाविशी बोलणें जाहालें; व पेंढारी यांचा बंदोबस्त करावयाविशी व गडकोट्याची सोडचिठीविशी बोलून राजश्री दार्जीबा देशमुख यांजकडील पत्र आलें, त्यांतील मजकूर निघाला. श्रीमंत स्वामी साहेबांची मर्जी पेंढारी याजविशी रुष्ट आहे; कारण तुम्ही पेंढारी यांचा बंदोबस्त अद्यापि केला नाहीं. सबब विंचूरकर यांजबराबर जरी पटका देऊण रवाणा केलें. या बोलण्यांत येकांतीं असतां आकबार आली, तिचा मजकूर त्रिंबकजी पाटील डेंगळे याजला वस्त्रें होऊण बराबर सरंजाम तोफा पंचवीस फौजा सत्राहजार याचा दुमाही फडच्या करून रवाणा केलें. मुकाम लोहागावावर आहे. याप्रमाणें मजकूर पाहूण कल्पना घेतली. राजश्री बालोजी कुंजेर सात आठ वर्षें राहूण, श्रीमंतास पत्र पाठऊण, त्रिंबकजी पाटील डेंगळे बाहेर काढावयाचा वेव्हार यांणी केला. याप्रमाणें आंतःकर्णात पकपणें ठसले. हें वर्तमान बाबास व मजला समजलें. बाबा बोलूं लागले. येथील मंडळीनें दोश तुजवर व आम्हांवर ठेविला आहे त्यास कांहीं चिंता नाहीं. बाबाणी काट केला, श्रीमंताचे प्रतापेंकरूण यांचा आपला बोलन्याचा प्रसंग पडला तर जावसाल होईल. त्यांचा दोश त्यांचे पदरीं घालून दार्जीबा देशमुख यांणी लिहिले लस्करची वर्धी आपले येथील कची येत आसते, जे करणें तें बहुत विचारांणें करावें. भरतपूरकर जाट याजकडील वकील येथें आला आहे. मुलास कडीं, जडावाची कंठी मोत्याचा सिरपेंच, बिजवरा जडावाचा, आंगडें कुंचडें आलिजाबहादर यांजला वस्त्रें सौभाग्यवती बाईजाबाईस वस्त्रें याप्रमाणें दिल्हीं. बाबाणी वकिलाची माझी भेट करूण दिल्ही. च्यार घटिका त्रिवर्ग बोलत बसलों. त्याचें ये(ज) मानाचें आतःकर्णात वेव्हार आहे. ते गुह याचे बोलन्यावरूण ध्यानास आलें. रुपया खर्च जाला तरी करावा; परंतु सोबती जबरदस्त पाहातो. सरदार बाहादूर रंजितसिंग शीक दिलींत हल्लीं पातशाहा आहे त्यास मीरखान यांजकडे संधाणें आंतूण परस्पेर लाऊण ठेविलीं आहेत. मदरहू त्रिवर्ग यांचे वकील येथें आहेत, त्यांची भेट बाबाणी करून दिल्ही. सान्हाच वेव्हार आपले सूत्रावर आहे. आपले सूत्रासिवाय हालत नाहींत. बाबास वर्तमान कांहींएक समजल्यास ते मजला सांगत आहेत. येथील कारभारी यार्जीवरसीं आलिज्याबहादर याचे मणांत वांकडें दोन तीन दिवस आलें. आंतूनहि दोन तीन आसामी मिळाली आहे. धराधरी होणार. काल दोण घटका रात्रपावेतों शिलेदार पागे यांणी बक्षी पागणीस याजसुद्धां सरकारडेन्यास उपासी बसले. आलिजाबहादर यांणी कारभारी यास सांगितलें, लोकास समजाऊण रात्रीचे उठऊण न्यावे. एका दो रोजानी खर्चाची सोय करूण

देऊं; इतकें बोलून वाडांत गेले. कारभारी त्रिवर्ग बाहेर आले. तों लोकांचे गवगवे चहूंकडून जाले. पानाच्या पत्र्या आम्हांस देणें म्हणजे आम्ही देसीं जाऊं. भारो हरि बोलले, येका दों रोजानीं तुम्हास खर्चास देऊं. (सुरत)सिंग पाटील बोलला की आमचा जीव आज चालला; तुम्हास येक दों रोजाचे पडले. ऐसे बोलोन दुसरीयाची तरवार घेऊन आपले गल्यावर ठेविली. तेव्हां दाहा पांच जणानीं त्याचे हातची तरवार धेतली. सर्वांनी एकच गवगवा केला. आमची मुलें माणसें घोडीं खर्चावीन मरतात; परंतु तुम्हांस आमचे दर्द येत नाहीं. त्यास याप्रमाणेंच तुम्हांजवल आपले हातें मरून जाऊं; आणि दाटी धरूण समजाऊण वाटे लाविले; व आपण आपले ठिकाणी गेले. आज छ मजकूर आलिज्याबहादर यांचे तीर्थरूपाचें श्राद्ध होतें. प्रातःकाली नित्यनेम सारून श्राध संकल्पविधि होऊन, होम जाहाला. ब्राह्मणास धर्म यथायुक्त करूण दाहा घटिकेंत भोजनें जाहालीं. आज कचेरीस आले नाहींत. कारभार मागील प्रहर दिवस राहातां दोन घटिका बसून, मागती लवकरच गेले. बावानी पत्रें सरकारास व राजश्री सदाशिवपंत भाऊ यांजला लिहिलीं आहेत. हे पावतील. आपण बावास मजविसीं लिहिलें होतें, त्याजवरूण हे लोभ बहुत करतात. चिरंजिवाप्रमाणें ममता ठेऊन वारंवार जवल बोलाऊन घेत आहेत. कामकाज असल्यास मलाच सांगतात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Krishnaji Gaikwad in communicating the daily happenings at the court of Daulatrao Sindia says that the action of Peshwa Bajirao in sending Trimbakji Dengla with an army and artillery to quell the rebellion of the Pindaris displeased Daulatrao Sindia. Daulatrao holds Baloji Kunjir responsible for prejudicing the mind of Bajirao against him. Krishnaji appears to be Trimbakji's relation and informant residing with Daulatrao at Gwalior.*

---

*No. 278]* *[June 1813*

**श्री**

यादी कृष्णाजी गाईकवाड याजकडून पत्रें आली त्यांतील अन्वये मुा सन अर्बा अशर

१ छ १० जमादिलाखर भूपालास मोर्चे लागले. बाहेरील फौज खासा मेल्यामुळें लोक तजावजा. किल्यांत माणसी पोटास तीन पाव आटा व आदपाव दाल देतात. आद्यापवर कायम आहेत. सरकारची फौज नर्मदातीरी यामुळें गोपालराव रघुनाथ नित्य बोलाऊन आणीत होते.

१ छ १२ जमादिलाखर आपा चिटणीस यास सोडून स्मशुरु करविली.

१ छ १५ जमादिलाखर आटकेकडील सीक याची कही गेली. त्याजवर शहाकडील वजीर याची स्वारी जाऊन कही वलून घेऊन चालिले, तो सिकास समजतांच स्वार पाठवून कही माघारी आणून शहाकडील दोन आडीचशे माणूस मारिले. सिकाची फत्ते जाहाली. उभयतांची तीन चार कोशाची तफावत आहे.

१ छ १८ जमादिलाखर दिल्लीहून अखबार आली त्यातील सुज्यात अल्ली बरुशा लाहुरास आला. रंजितसिंग सीक याणे चार कोटीचे जवाहीर मागितले ते त्याणी दिल्हे. नंतर बात(द)शहास हत्तीवर आंबारीस बसऊन खवजग्वान्यांत आपण बसून मोर्चेल वारून फुले उडवीत शहरांत आणून नजर नजराणा जाहला.

¶*This document comprising extracts from letters written by Krishnaji Gaikwad refers to the activities of the Sikhs and the reception of Shah Shuja of Afghanistan by Ranjitsing. An attack on the fortress of Bhopal is alluded to.*

---

*No. 279*] [*July 1813*

श्री

यादी कृष्णाजी गाईकवाड याजकडून अखबारी पत्रे आली त्यातील अन्वये सुा सन अर्बा अशर मया तेन व अलफ.

१ छ ९ रजब दिल्लीचे अखबारींतील सुज्यान मुलुक पातशहा लाहुरास आहे त्यांचे कारभारी हुसेनखां व हेबतअली याणी महमदशा पातशहा याचे वजिरास अटकेकडे पत्र पाठविली कीं, तुम्ही कूच दरकूच इकडे येणे. लाहूरचा बंदोबस्त आम्ही करितो. ती पत्रे रजतसिंग सीक याणी धरून, पातशहास दाखविली. नंतर सिकानीं कारभारी कैद करून, त्याचे चवकशीस सुजान मुलुक ठेऊन पलटण व पांचशें शीक ठेविले. पातशहाकडे परवानगी खेरीज कोणी जाऊं नये.

१ छ १३ रजब लाहूरचे अखबारींतील रंजीतसिंग याजकडील महकुमसिंग दिवाण व खडकसिंग व शहाकडील वजीर यांची लढाई जाहाली. वजीर सिकस्त होऊन माघारा गेला. तीन हजार मनुष्य पडले. त्याचे मागें खडकसिंग व महकुमसिंग गेले.

१ छ १५ रजब. शहाची फौज आटकेपार गेली. सीक आलीकडील काठीं आहे. शाहाचे मुछदी सात धरिले. ते जिवंतच जाळले.

१ छ १८ रजब. शहाकडील दुराणी वीस हजार येऊन, खडकसिंग यासी लढाई घेतली, तेव्हां दुराणी कचरान माघारे गेले. खडकसिंग यास येश आले.

१ छ २१ रजब. शहाची व सिकाची लढाई जाहाली. वजीराचा बंधु दोस महंमद याणे उठवणी करून, महकूमसिंग हत्तीवर होता, त्याचे होद्यास भाला लाविला. ते समई सिकाकडील लोकानीं जलदी करून, दोस महंमद याचे सीर कापिले. छन्याचा मार दिल्हा, तेव्हां वजिराची फौज पळाली. येश सिकास आले व इंग्रजाची पलटणे जालवणाजवळ होती त्याणी कूच करून, पाणी पाहून आलीकडे पांच कोशावर मुक्काम केला.

१ छ २५ रजब शहाकडील वजीर कामास आला, त्याचा रणांत शोध केला. वजिराचा ठिकाण लागत नाहीं. पोपाख मात्र सांपडला. इंग्रजाकडील दोन पलटणे आली. दोन हजार बंदुख व तोफा च्यार थोर, व लहान दोन. काले सिंदीचे पारच आहेत.

१ छ २९ रजब. शहाचा बंधू याचा इमान ठराऊन बागांत कूच करून गेले. वजीर पळाल्याचे वर्तमान काश्मिरास गेले. सा। शहानीं आपले चिरंजीवास काश्मीरास रवाना केला. कलम

१ छ ७ रजब सूर्यग्रहणास शृंगी रामपुरास स्वारी गेली. तिकडून येताना इंग्रजी चार पलटणे आठ तोफा घेऊन आले. त्याचे बोलणे बाबाजी पाटणकर याजकडून जाहाले. साडेतीन मनगे देऊन, मेवाडांत कामगिरी सांगितली. इंग्रजाकडील वकील आत्मारामपंत येऊन, स्वारी शृंगीरामपुरास गेली; तेव्हां मार्गी नुकसान साठ हजाराचे व झांसी, दतिया, जालवन मिळोन चालीस हजार तें भरून द्यावें. त्यास गोपाळराव रघुनाथ याणी उत्तर केले कीं स्वारीस सहा महिने जाहाले. आजपर्यंत भरून मागितले नाहीं. तेव्हां मागावयाचे होते. झांसी, दतियाचे नुकसान जाहाले म्हणतात, त्यास घासदाणा मुख्यानें घेतला असेल तो द्यावयाचा सिरस्ताच आहे.

¶*These extracts from the news-letters written by Krishnaji Gaikwad relate to the fighting between the forces of Ranajitsing and the forces of the Shah of the Duranis at Kandahar. The movements of the English are also alluded to.*

*No. 280]* *[20-8-1813*

पैवस्ती छ २० रमजान भा सन
आर्बा मुकाम फुलगांव.

**श्री**

माहाराजाचे शेवेसी. आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ २२ माहे साबान मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबाहादर रोज गुदस्त प्राथःकाळीं उठून, सौचविध मुखमार्ज्यन करून, खासगीवाले यांस जेन्माष्टमीचे मखराची व सभास्थाणी स्तंभास बिलोरीची भांडी लावावयाची व बिछायतीची ताकीद केली. स्मश्रु कर्णे ते रहित करून श्नाण जाले. पुराणश्रवण करून पोशाग्व घेतला. बारा घटिका दिवस येतां वाड्यांत जाऊन फराळ जाला. दोन प्रहराचे अमलांत बंगल्यांत बैठक जाली. कारभारी मानकरी वकील मंडली येऊन दरबार जाले. गोकुल पारग्व यांसी येक घटिका ग्वलबत जालें. मल्हार भिमाजी बक्षी याणे विनंती केली येकांडे सिलेदार यांची आदा पावती आपण पाहिली आहे. ते मंडल आज रुसून जातें. सबब त्यांजकडे हुजऱ्या पाठऊन, गुरुजीकडे हिशेबास पाठविले. लोक भर हिशेब मागूं लागले. गुरुजी नरवरचे हिशेब पुढें मांगूं लागले. सेवटीं तोड न पडला. आटकेकडील वर्तमान शाहा व फत्तेग्वां वजीर लढाईस आटकेवर येन्हार. त्याजवरूण सिकानें जागोजाग आपला बंदोबस्त करून, त्यांचे फौजेंत दाहा जोडी हालकारे बातमीस पाठविले. काश्मीरवाले जमादार यास सांगून पाठविले तुम्हीं काश्मीर खालीं करणें. तुमचे कुमकेस आम्हीं आहोत. च्यार घटिका दिवस राहातां कचेरींत येऊन, देवाची व कचेरीची चित्राकारी रंग फुलें छतें जागा पाहून, कारभारी मानकरी रामराम करून गेले. आपण बागांत येऊण आपा चिटनीस यासी दोन घटिका रात्र पर्यंत भाशन जालें. वाड्यांत जातमसई, जिनसीच्या तोफा दोन व पलटनची कंपनी येक दरवाज्यापुढें आणविली. प्रहर रात्र जालियावर गोपाळराव रघुनाथ, आत्माराम सिवराम, मोरो हरि, बाळाराम भाई गोकुल पारख बक्षी येऊन बिछायेत केली. मानकरी वकील मंडली यांस बोलाऊं पाठविली. रोशनाई कारंजी चालू केली. कलवंतिनीचा नाच होऊं लागला. दीड प्रहराचे अमलांत आपण येऊन राजश्री त्रिंबकराव दाभाडे यांजला बोलाविलें. पावणेदोन प्रहरांत नाना गोसावी कीर्तनास उभे राहिले. श्नाण करून देवघरांत गेले. पूज्यनास आरंभ केला. वेदशास्त्रसंपन्न खंडबावा शास्त्री जोशी उपाधे आश्रित मंडली आली. दादा उपाध्ये याणी पूजा सांगून, आर्ध रात्रीचे आमलांत

जन्मकाल होऊन, तोफा तेरा व चवघडा आदी करून, वाद्यें होऊं लागलीं. उत्तरार्ध पूज्या करून वर आलंकार परिमल द्रव्यें आर्पून नैवेद्य जाला. ब्राह्मणास दक्षिणा देऊन कीर्तनास आले. आडीच प्रहर रात्र परियेंत कीर्तन होऊन, विडे अत्तर गुलाब सर्वांस देऊन. उठून गेले. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik Gaikwad in reporting the daily happenings at the court of Daulatrao states that the Shah of the Duranis and Fatekhan at the head of a strong army are proceeding towards Attock to oppose the Sikhs.*

---

*No. 281*] [*23-8-1813*

पौ छ २७ रमजान

मु॥ फुलगाव.

श्री

माहाराजांचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निमवत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ २५ माबान मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलत-राव शिंदे अलीजाबाहादर रोजगुदस्त प्रात:काळी उठोन शौच्यविधि मुख-माज्यन जाहालें. राजश्री बाबूराव आंगरे याकडील गोविंदराव आंगरे येथें होते, ते मृत्य पावले. त्यांचे दहनास येक शेला व पन्नास रुपये संभाजी आंगरे यांजकडे पाठऊन दिल्हे. गुलाबखां मेवाती देवडीवरील त्याचे पुतण्यानें दुसरे मेवाती याचे बायकोशीं जबरदस्तीनें बदआमली केली. सौभाग्यवती बायेजाबाई यांणीं आपले देवडीवर बांधोन ठेविला. दोन घटिका दिवस येतां स्नान करून देवार्च्यन जाहालें. पुराणश्रवण करून पोपाख घेतला. आबाजी घाटगे, नाना भोंसले, मल्हार भिमाजी बक्षी शागीर्दपेशा यांचा रामराम जाहाला. कैलासवासी महादजी शिंदे यांची नाटकशाला रहिमान पथरगडवाली उजनीस पेशजी मृत्य पावली. तिजकडील हातणी येथें आणिली. बाळा चोपदार घेऊन आला, ते पाहोन चोपदार मजकूर याजकडे दिल्ही. घाटगे यांसी दोन घटिका खलबत जाहालें. खाजगीवाले याजकडे ब्राह्मणसंतर्पण पांचशेंपानेतों जाहाले. आसामीस च्यार आणे दक्षणा दिल्ही. बारा घटिकाचे आमलांत वाड्यांत जाऊन भोज्यन जाहालें. विडा घेऊन तळघरांत बैठक जाहाली. मीरा हरीस गोकुळ पारख याजकडे ऐवजाचे तोडीकरितां पाठविले. गुलमहमद चोपदार यासी आज्ञा करून कीर्त-नाच बोलावणीं सर्वांस पाठविलीं. दोन प्रहरां बिछाईत करून कलवंतणीचा नाच होऊं लागला. गोपालराव रघुनाथ रामचंद्र भास्कर आदिकरून दरकदार

मानकरी वकील मंडली शास्त्री पुराणिक जोशी सर्व येऊन सभा जाहाली. लाहोरचें वर्तमान सरदारसिंग तिलोंडीवाला लाहोरास भेटीस आला. त्याजला रणजितसिंग सीख येक कोस पुढें जाऊन समारंभानें शहरास घेऊन आले. दोनशें रुपये खैरात केली. उतरावयासी जागा दिल्ही. पांचशें रुपये मेजमानी पाठविली. कासमीर खाली करावयासी तोफखाना व फौज रवाना केली म्हणोन दोन प्रहर दिवस राहातां कीर्तनास येऊन बसले. विडे अत्तर गुलाब होऊन दोन घटिका दिवसास आरती जाहाली. आत्मारामपंत वकील याणी विनंती केली साहेब आज बेहडांतून आले आहेत, ते देवदर्शनास येतात, त्यांस यावयाची आज्ञा केली. देवघरांतून येऊन आपण तळघरांत बसले. रामचंद्र भास्कर यासी बोलाऊन दोन घटिका खलबत जाहालें. दीड घटिका रात्रीच्या आमलांत इस्तेरसाहेब[1] व तार्टेसाहेब[2] यांची स्वारी आली. आपण कचेरीस आले. गोपाळराव यांसी पुढें पाठऊन त्याजला घेऊन आले. आर्धेताजीम देऊन, डावे बाजूस बसावयासी जागा घेतली. कलवंतणीचा नाच व रासधारी यांचा तमासा पाहून इंग्रजाणी हास्य केलें. विडे अत्तर गुलाब घेऊन बसलीसाहेब हेराण आहे ते आगऱ्यास जातात, आम्ही बेहडांतून दर्शनास आलों होतों, पुन्हां जातों. आज्ञा घेऊन पांच घटिका रात्रीं स्वारी ठिकाणास गेली. मागे ला(लो)काचा रामराम घेऊन आपण वाड्यांत गेले. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik Gaikwad communicates to the Peshwa the daily happenings at the court of Daulatrao. Mention is incidentally made of a concubine of Mahadji Sindia named Rahiman Pathargadkar, having died.*

---

*No. 282*] [*September 1813*

श्री

यादी कृष्णाजी नाईक गाईकवाड याजकडून सरकारांत विनंतिपत्र आली त्यातील सारांश माहे रमजान भाद्रपद सन अर्बा.

१ छ ६ राज मीरखां मेवाडांत गेले; व हत्रसवाले जाठ यास इंग्रेजानीं पत्र पाठविलें कीं तुम्ही भरतपूरवाले याजकडेस जाऊं नये. गेले असतां बिघाड होईल. त्यांणी उत्तर केलें कीं परस्परें एकमेकांचा उपराळा राखीत आलो, तुमचे विचारास येईल तसें करावें.

१ छ ८ राज होळकराकडील तात्या आलेकर यांचा कारभार बंद होऊन गणपतराव नारायेण यास वस्त्रें होणार. लष्करांत धारण दोन पाइलीची.

---

1 Strachey. 2 Start?

१ छ ९ रोज मार्चेडीवाले व भरतपूरवाले यांचे वकील दिल्लीस होते, इंग्रजानीं उठवून दिल्हे. पलटणे नवी आली आहेत. उभयतांवर इरादा आहे.

१ छ ११ रोज भरतपूरवाले आपले ठिकाणीं सावध आहेत. रजिंतसिंग सीख याची फौज मुलतांनचे मोईमेस रवाना जाली.

¶*This document mentions among other matters that the English were making preparations against the Jats of Bharatpur.*

---

*No. 283*| |*6-9-1813*

पौा छ ३ सवाल आश्विन
सन आर्बा मुाा पुणे.

**श्री**

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसवत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ १० माहे रमजान मुकाम लष्कर नजीक ग्वालेर, येथे सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेप. राजश्री दौलतराव शिंदे आलीज्याबाहादुर रोज गुदस्त प्रात:कालीं उठून सौच्य-विध मुखमार्ज्यन जालें. बाळाजी राम (राम) ख्वाजगीवाले यास ताकीद केली. प्रज्यन्न पडिला. * * * व इंद्र पूज्यनाचे ब्राह्मणसंतर्पण तुम्हाक(डे) * * * नें करणें. स्वारी बागांत भोज्यनास जाईल. दरगदार मानकरी वकील मंडळी यांस वनभोज्यनास जावयाची ताकीद केली. चांदण्या व कणाता पागांत पाठऊन पाख करावयास आज्ञा केली. ब्राम्हणभोज्यनास नदीतीरीं चांदण्या दिल्ह्या. दरगदार मानकरी वकील हे बागांत जागाजाग भोज्यनास गेले. च्यार घटिका दिवस येतां श्नाण करूण देवताचर्येन जालें. पुराणश्रवण करूण पोशाख घेतला. मानकरी (मानकरी) यांस चोपदार बोलाऊं पाठविले. लक्ष्मणराव मुनशी याणें रंजीतसिंग शीक याजकडील येकवार वाचिली. तिचा मजकूर श्यामसिंग कुपेदान याणें मोहोकमसिंग दिवाण याचे बरावर कामकाज चांगलें केलें. सबब त्याजला वस्त्रें तीण दागिणे जडावाचे, चांदीचे हौद्याचा हात्ती, सोण्याचे सरंजामाचा घोडा, दोण गांव जागीर चाळीस हाजार रुपये दिल्हे; पांच साहा सरदार यांस वस्त्रें देऊण, गौरव बहुत केला. येक सरदार मृत पावला, त्याचें दहण करावयास बेल व चंदन दिल्हा. त्याजकडील कारभारी यांसी बोलाऊन समाधान केलें. त्यास सांगितलें तुमचे सरदाराचे चिरंजिवास वस्त्रें देऊण पूर्ववतप्रमाणें सरदारी चालऊं. महमुदशाहा कंपूवाला याचे वकी-

लास पंचवीस हजार रुपये रोकड व सवा लक्षार्ची हुंडी दिल्ही. त्याजला मुलतानची मोहीम सांगितली, म्हणोन वर्तमान आहे. कर्णेल ज्यान बत्तिस शाहाडौऱ्याकडे आला आहे. प्रहर दिवस येतां सौभाग्येवती रखमाबाई व बायेजाबाई शिंदे व चिमणाबाई दाभाडे व गंगारूप साळूबाई शिंदे यांची स्वारी बागांत गेली, तेव्हां किल्याची येक तोफ जाली. दाहा घटिकां दिवसां मानकरी- सहित स्वारी बागांत गेली, तेव्हां दोन तोफा जाल्या. ब्राह्मण मंडळीकडे इंद्रपूज्यन होऊन हावण जालें. पांचशे आसामी भोज्यनास आली. च्यार आणेप्रमाणें दक्षणा दिल्ही. दोन प्रहराचे अमलांत माणकर्ण व राजश्री त्रिंबक- राव दाभाडे यांजसहित भोज्यन जालें. च्यार घटिकां बागांतील झाडें पाहिलीं. कलवंतनीचा नाच जाला. साहा घटिका रात्र होतां बागांतूण स्वारी निघाली तेव्हां तोफा जाल्या. सर्वांचे रामराम घेऊण वाड्यांत दाखल जाले. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad in communicating the daily happenings at the court of Daulatrao states that Ranjitsing rewarded his military officers for their glorious achievements.*

---

*No. 284*] [*21-1-1815*

**श्री**

माहाराजाचे सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ ९ माहे सफर मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादुर राज गुदस्त प्राथःकाळीं मुखमाज्र्जेन जालें. वेदमूर्ति राजश्री दादाभट शेंडे याणी येऊन सांगितलें. आज गंगारूप येमुणाबाईचें उनाब्धिक श्राध आहे. त्याजवरून यादवराव विनीवाले यास सांगितलें, च्यार पितर भोज्यनास सांगणें. मुनसीणें येकवार आणिलें. मीकाणें आमरसरचा वाणी मुज्याळमुलुक बातशहाची बेगम पळून त्याचे दुकाणी गेली. त्याजवरून तो कैद केला. त्याचें दुकाण जप्तीस आहे. ते वाणीयाचे पुत्राबराबर सिबंदी देऊन दुकाणचा माल लाहुरास आणावयास पाठविलें. शहांकडील फतेखां वजीर कास्मरास येन्हार. सबब ठिकाणें आटकेस फौज पाठऊन खबरदारी करनार होलकराकडील कुमेदान पलटनीची भरती करावयास उज्यनीस गेला. कांहीं लोक ठेविले ते कर्णेल ज्यान बतीस यास कळलें. त्यानें मीरखास सांगितलें तुम्ही येथें कामावर असतां कुमेदान कोन्हाचे परवानगीणें पलटन भरितो. कुमेदानास चवकस केली. त्यानें होलकराकडील पत्र दाखविलें. कुमेदानास तेथून आपले महाली भरती

उनाब्धिक श्राद्ध = वर्षश्राद्धाच्या आदल्या दिवशी करावयाचें श्राद्ध.

करावयास काढून दिल्हें. येशवंतराव सिवाजी जावदेकडे आहे. सरंजाम सत्रा तोफा तीन पेथ्या पांच हाजार फौज बराबर आहे. त्याजकडे आवाजी सखाराम व मंदासरवाले आठ कोसावर आहेत. पेंढारी याजकडे सरंजाम पाठवावयास येथून पत्र कर्णेलास पाठविलें. तुमचीं दोन पलटनें व जेकबसाहेब याचीं दोन व बक्षी याजला चितोडाकडे पाठवणें. रामदीन निसबत होलकर बंड करीत आहे, त्यास काढून देणें. च्यार घटिका दिवस येतां श्नाण करून श्राधविध जाला. च्यार ब्राह्मणास च्यार रुपयेप्रमाणें येकास शंखापागोटें व येकास धोत्र जोडा येक गोप्रदान दिल्हे. पितर बोलाऊन पावणें दोन प्रहरां भोज्यन जालें. दीड प्रहर दिवस राहातां बारादारी कचेरी जाली. राजश्री बालाजी बाबा कुंजीर आले. त्यांसी च्यार घटिका खलबत जालें. त्रयोदसीस कूच करून जावयास सांगितलें. सिलेदार लोकांनी खर्चाचें बोलणें केलें. त्यांस सांगितलें येक दो रोजानें बापू चिटनीस वाड्यांत आलियावर कारभार चालू होईल. गोपालराव रघुनाथ याचा त्रयोदशा जाला. त्याचे येथें कारभारी विचपाखून दोन घटिका दिवस राहातां जाऊन आपले ठिकाणीं गेले. नुरा कुंनडा याजकडे नरवर ठरली. सालगुदस्त ऐसी हाजार रुपये होते. सालमजकुरीं येकलक्ष रुपये ठरून साठ हजाराची निशा सावकारी हुंडी देऊन, चिमणाजी देशमुख याजकडून किला काढिला. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik in reporting the daily happenings at the court of Daulatrao Sindia states that the Sikhs have despatched an army to Attock to resist the march of Fatekhan, the Wazir of the Durani Shah, towards Kashmir.*

---

*No. 285*] [*9-2-1814*

पौ छ ९ रबिल्वल फाल्गुन

सन आर्बा

**श्री**

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ १७ माहे सफर मुकाम लस्कर नजीक ग्वाल्हेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलीज्याबाहादुर रोजगुदस्त प्रातःकाळीं आठदाहा मानकरी व शागिर्दपेशा याचा रामराम जाहला. च्यार घटिका दिवसा श्नाण करून पोषाख घेतला. बारा घटिका दिवसा भोज्यन जाहलें. हौदाजवळ जाऊन मगराचा तमाशा पाहिला. बाहेर काढून मेशाचें मांस त्याजला भक्षावयास दिल्हें. आणाजी

दौंग हुजर यांस सांगितलें, मगर खाले पाण्यांत नेऊण सोडून देणें. त्याणें खाटेवर घालून नदीचे डोहांत कामाठी याजपाशीं देऊन सोडविला. हिमतबाहादर जैकमसाहेब तात्या नांदखले आठदाहा माणकरी आले, त्यांशीं च्यार घटिका भाशन जालें. सदाशिव सखदेव खासगीवाले याणें राजश्री सैनापति येशवंतराव दाभाडे यांचे खर्चाविशई विनंती केली. कारभारी मानकरी वकील मंडळी येऊन कचेरी जाहली. कर्णेल ज्यान बर्त्तिस साहा कोसावर मुकामास आले म्हणोन त्याजकडील वकील दुर्गाप्रसाद याणें निवेदन केलें. गोपाळराव रघुनाथ, मोरो हरि, गोकुळ पारख यासी च्यार घटिका खलबत पट करावयाविशई जालें. पारख मोरो हरि यांचे बोलणें चैत्र मासीं पट करावा तापावेतों ऐवज जमा होईल. त्यांचें बोलणें हुताशनीपावेतों येवज लोकास द्यावा. ऐवजाची तोड सुभा ग्वालेर च्याळीस लक्ष इंग्रेजाकडील हिंदुस्थान येवजीं दाहा लक्ष माहालीं मामलतदार पंनास लक्ष येकूण येक कोटीचा पट कर्णे, ऐशी निकडीची ताकीद आहे. दिलीकडील येकवार्गीचा मजकूर रंजितसिंग शीक अमरसराहून लाहुरास आला. महमुदशाहा पातशाहा याजकडील वकील याणें बोलणें केलें, आपण आमचा घरोबा पहिलें चालत आला त प्रमाणें पुढें चालवावा. आपूण आपसांत येकमेकाची दौलत हरण करावयास लागले तर दुसरा सहजांतच दौलतीस विक्षेप करील, यास्तव दुराग्रह सोडून येकविचारें चालावें. तुमचा आग्रह आटक न द्यावी, त्यास हें पहिलें आपले करारांत नाहीं. आस्तु. आटकचे मुबदला तुम्हास मुलतानचा किला देवितों; आपण आटक शाहास द्यावी आणि तेथील येथील संस्थाण समेटाण चालवावींत. शीकाणी उत्तर केलें प्रथम तुमचा आमचा करार काश्मीर निमेनिम घ्यावी; त्यावरून तें संस्थान तुम्ही आम्ही मिळोण सर केलें; अखेरीस तुम्ही बोलिल्याप्रमाणें न कर्त्ता दावादाव केला. तुमचे वचनाची कायमता न राहिली, तेव्हां आम्ही आटक दाबली. हालीं तुम्हास शाहाणी व फत्तेखां वजीर याणें इकडे पाठविलें; उत्तम आहे; परंतु तुम्हाशीं बोलणें केल्यास त्यांची पकाईत असली तर बोलावयासी येईल, येविशई तुम्ही (तुम्ही) त्यांजला लिहून खचित ठरून उत्तर आणवावें. या उपरी बोलण्यांत अंतर पडलें तर तुम्हांस या प(क्षां सं)स्थाण जतन कर्णे कठिण पडेल, ऐसें समजून उत्तर आणवणें. त्याजवरून वकिलाचीं पत्रें पिसोरास शाहाकडे व वजीराकडे गेलीं आहेत म्हणोन वर्तमान आलें. सायंकाळीं रामराम घेऊन दरबार बरखास्त जालें. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik in reporting the daily happenings at the court of Daulatrao Sindia states that negotiations have been opened between Ranjitsing and the Vakil of Muhammad Shah.*

7268

No. 286] [14-2-1814

पौ छ १० रावल सन
आर्बा अशर मया तैन.

श्री

माहाराजाचे सेवेसीं आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ २१ माहे सफर मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादुर रोज गुदस्त प्राथःकाळीं आपा चिटनसि याजला दारकोजी-राव पाटनकर याचे समाचारास पाठविलें. तेथें जाऊन मशारनिले आपले रूबरू वैद्याकडून औषध देऊन च्यार साहा घटिका बसले. च्यार घटिका दिवसा श्नाण करून पोशाख घेतला. बारा घटिका दिवसा भोज्यन जालें. गोकुळ पारख, मणिराम, गोपाळराव रघुनाथ, मोरो हरि, कर्णेल ज्यान बर्नास यांजला बोलाविलें; मांडवाचे कचेरीस दरबार जाले. कर्णल याणे गडे कोटाचे दरी वगैरे जागा सोडविल्या ते सविस्तर निवेदन केलें. किल्याचे नक्ष करून आणिले ते दाखविलें. कर्णल उठून गेलियाउपरी खर्चाच्या पटाचें बोलणें येवजाविषईं जालें. गुरुजीणें लोकांचे हिशेब आकारून आदा पावतीच्या यादी केल्या. त्या आठदाहा आसामीच्या पाहिल्या. आबाजी घाटगे, गोविंदराव खंडागळे विठोबा करंडे पंधरा वीस मानकरी यांचे रामराम जाले. कृष्णाजी मोरे याची घोडी सुम्याबराबर लढाईत पांच सात कामास आली. त्याजला बोलाऊन खर्चाविषईं व घोड्यांविषईं खातरी केली. तीण घटिका दिवस राहतां कचेरी बरखास्त जाली. दोन घटिका दिवस राहतां देवघराचा मार्ग झाडून बाट लाविलें. केदारजी सिंदे याचें मातुश्रीणें देवास नवस केला होता, आलिज्याबाहादुर यांजला आराम द्यावा, मी दंडवत करीत देवळी दर्शनास येईन, तिजला लुगडें चोळी देऊन दोन घटिका रात्रीं नवस पूर्ण केला. मागाहून आपण दर्शन करून आले. होलकराचे लस्करांत बाळाराम शेट आगरवाले यांचे येथें लोक धरणें घेऊन बसले. तेथें गंगारूप तुलसाबाई जाऊन थोडे बहुतानें खर्चाचा करार करून धरणे उठविलें. राजश्री मल्हारराव होळकर यांची स्वारी मीरखां याचे येथें गेली. त्यांचे पुत्रास वस्त्रें सिरपेंच कंठी दिल्ही. मीरखां याणें मल्हारराव यांजला वस्त्रें सिरपेंच कंठी हातातील मोत्याचे गजरे हाती घोडा दिल्हा. करीमखां पेढारी याजविशीं राजश्री राजे जालमसिंग याजला पत्रें पाठविलीं. तुमच्या विच्यारास आलें तर करीमखांची मुक्तता करावी याचे लिहावें. त्याणी उत्तर पाठविलें, सोडून दिल्ह्यास करीमखां लबाडी करावयास चुकनार नाहीं, त्यास सोडूं नये म्हणोन श्रीमंताची आज्ञा आहे व

आलिज्याबहादुर याचीं पत्रें येतात सोडावयाची मसलत आम्हां सांगनार नाहीं म्हणोन होलकराकडील वकिलाचे येथे वर्तमान आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik in reporting the daily happenings at the court of Daulatrao states that the release of Karimkhan Pindari was under consideration.*

---

*No. 287*] [*18-2-1814*

पां छ १७ रोावल फाल्गुन

सन आर्बा

**श्री**

महाराजाचे शेवेसी अज्ञाधारक कृष्णाजी नाईक गाईकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ २९ माहे सफर मुक्काम लष्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिजा बहाद्दररोज गुदस्त प्राथःकाली उठून आठदहा मानकरी सदाशिव सखदेव व सखो शामजी यांचा रामराम जाला. चार घटिका दिवसा स्मश्रु करावयास बसले. गवई याचे गायेन करावयास आरंभ जाला. अडीच प्रहर दिवसा तैलाभ्यंग करून स्नान जाले. गोपाळराव रघुनाथ मोरो हरि गोकुळ पारख येऊन रामराम जाला. चार घटिका भाशन जाले. शणीश्वराचे दर्शनास येथून सात आठ कोस आहे तेथें जावे एसे ठरूण मोरो हरि यासी आज्ञा केली. उदईक तुम्ही पुढें जाऊन पाणी पाहून घास लकडी सरंजाम सिध्ध कर्णे. स्वारी सायंकाली येईल. राजश्री सेनापति येशवंतराव दाभाडे याजला सांगून पाठविले, तुम्ही शणीश्वराचे दर्शनास चालावे. भालदार पाठऊन पागे पथके याजला ताकिदे केली. बाळाराम सेट गोकुळ पारख लष्करांत राहाणार. गोपाळराव शणवारी प्राथःकाली मागाहून येन्हार. फरास यास बोलाऊण डेरे राहुट्या बिचोबे बाड बाहेर काढून सिद्ध करावयास आज्ञा केली. तीन घटिका दिवस राहतां उठून वाड्यात गेले. होलकराचे लष्करचे कूच होऊन भानपुऱ्याकडे सहा कोस आले. बापूराव सिंदे व जैयपूरवाल्याकडील फौज यांची लढाई छ ७ मिनहूस होणार म्हणोन वर्तमान आहे. शहाचे मुलकांत दुसरा बातशाहा येऊन खंदारांत लढाई जाली. शहाकडील फौज सिकस्त पावली. हे वर्तमान आटकेहून लाहुरास रंजितसिंग सीक याजपासी आले तें जामुदास सिकाणे विनाम देऊन बोलिले, शहा आम्हास बेबदल जाले, त्यास त्याचे पारपत्ये श्रीगुरूनें परभारेच केले. हे दिल्लीचे एकबारीत वर्तमान आले. छ मजकुरी प्राथःकाली मोरो हरि

शंणिश्वरास गेले. स्वारी तयार करावयासी आज्ञा करून स्नान जाले. वाड्यापुढें बिनिवाले उभे राहिले, त्यास सांगितले पुढें चालणे. बिनी पुढें निघाल्याउपरी बाजार व लष्करचे लोक चालिले. प्रहर दिवस येतां फराल जालियावर सेनापतीची व यांची स्वारी निघाली. त्यांचे मागे सौभाग्यवती बायेजाबाई आदीकरून बायांची स्वारी गेली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik states that Ranjitsing rejoiced to know that the Shah of the Duranis was defeated at Kandahar ; the movements of the forces of Holkar are also alluded to.*

---

*No. 288]* *[24-2-1814*

पौ छ २० गोवल फाल्गुन
सन आर्बा अशर मुा नासिक

**श्री**

माहाराजांचे सेवेसी. आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायिकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ ३ माहे रबिलावल मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्या-बहादुर रोज गुदस्त प्राथःकाली सदाशिव सखदेव आपा चिटणीस सखो शामजी ग्वासगीवाले याचा रामराम जाला. आपा चिटनीस याणें सांगितले राजश्री हिंदुराव घाटगे याणी चोपड्यास ठाणें बसवायाकरितां सरंजाम पाठविला आहे. तेथें निंबालकर ठाणें देत नाहींत. सबब त्यांची यांची लढाई होते. निंबालकराचीं कांहीं माणसें ठार जालीं. याजकडीलहि जखमी जालीं म्हणोन चोपड्याहून पत्र आलें. त्यास जगदेवराव निंबालकर यांजला बोलाऊन येथें सोडचिटी देऊन पाठवावी म्हणजे ठाणें हस्तगत होऊन, तेथील जमीदार परागंदा आहेत ते येऊन, माहालची आबादी होईल. च्यार घटिका दिवसा स्नाण जालें. कारभारी यासी बोलावणी पाठविलीं. बारा घटिका दिवस येतां भोज्यन जालें. सवा दोन प्रहरा कचेरी जाली. कर्णेल ज्यान बतीस यासी दोन घटिका खलबत जालें. शाहाडौरा व पिपलोद येथील सोडचिटी कर्णेलपासून घेतली. पेंढारी यास द्यावयाचा विचार आहे. गोपालराव रघुनाथ यासी खलबत निकालस होऊन, ते उठून नवा बंगला होता तेथें जाऊन, अंबाजी घाटगे यासी दोन घटिका खलबत होऊन, तेथेंच बसून राहिले. मोरो हरि, गोकुल पारख, बालाराम शेट यासी खलबत जालें. मल्हार भिमाजी बक्षी याणें लोकाचे खर्चाविशई विनंती केली. गणपत-राव विंचुरवाले, नारो नरसि मंदोसरवाले, बाळकृष्णराव कोटवाले, गणेश उमाजी

रामचंद्र बाजी निसबत भुसकुटे हे बोलाऊन च्यार घटिका भाशन जालें. सायंकालीं कचेरी बरखास जाली. बापूराव सिंदे याचा मामला जैपूरवाल्याचा पनास हजार रुपये करार जाला. सिंदे याणी मुलकांत खंडनी घेतली. तो यैवज आकारेल तो मजरा घ्यावा. सिंदे याचें बोलणें पडलें. आम्हीं जोतपुराकडे जातों, त्यांजकडे तुम्हीं जाऊं नये. दिलीस सिंग, याची बेगम आली, ते बातशाचे माहालांत जाऊन नजर (नजराणे) दिल्हे. इंग्रेजाचीं पलटनें लाहुरचे तोंडावर लुधान्यास आहेत. त्याजला इंग्रजाणी ताकीद केली, रात्रंदिवस तुम्हीं सावध आसावें, म्हाणोन यैकबारींत वर्तमान आले. शेवेशीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad writes that the English have established the camp of their army at Ludhiana and that the army is instructed to remain watchful day and night.*

---

*No. 289]* *[25-2-1814*

पौ छ २० गोवल

फालगुन मन आर्बा अशर

मुा नासिक

श्री

माहाराजाचे शेवसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ ४ माहे रबिलावल मुकाम लस्कर नजीक ग्वाल्हेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलिज्याबाहादुर रोजगुदस्त प्रात:कालीं * * * * त मानकरी व शागिर्दपेशा यांचा रामराम जाला. च्यार घटिका दिवसा श्नाण करून बारा घटिकांत भोज्यन जालें. पुण्याकडील वर्तमान नगरवाले व आणिख तीन आसामी सरकारांत धरूण आटकेंत ठेविले आहेत. दीड प्रहर दिवस राहातां कारभारी मानकरी येऊन कचेरी जाली. गोपाळराव रघुनाथ मोरो हरि गोकुल पारख यांसी च्यार घटिका खलबत जालें. आत्मारामपंत वकील याणें विनंती केली, आपण इस्तेरची[+] साहेब यांजला बोलाविले होते, त्यांचा आज यावयाचा बेत आहे. त्याजवरून गुल महमद चोपदार बोलाऊं पाठविला. हिरेखान याचें पत्र उज्यनीहून आलें. त्यांतील मजकूर पेंढारी हजार पंधराशे स्वार याणी इंदूर सावेर नवलाई देपालपूर उज्यन येथील गांव लुटून माघारे गेले. माळवे प्रांतीं दंगा बहुत आहे. मार्ग चालू देत नाहीत. याप्रमाणें भुसकुटे यांचे पत्र नवलाईहून आलें. कर्णेल ज्यान बतीस यासी खलबत जालें. त्याजला सांगितलें

---

+ Stratchy.

माळवे प्रांतीं जाऊन पेंढारी याचा बंदोबस्त कर्णें. कर्णेल याण विनंती केली पेंढारीजवळ घोडेस्वार आहेत. मजपाशीं तर पायाचे लोक. पेंढारी तीस कोस जाऊन लहबार[1] घेऊन जान्हार. पायचे लोकांस तिसा कोसांत तीण दिवस जावयासी पाहिजेत. ग्वरे जुरतीची लढाइ घेतल्यास त्यांचे पारपतें करावयास येईल. त्यांत लोकांचे हिशेब चढले. ते खावंदांचे पायाजवळ गेल्या उपरी देण्याचा करार आहे. हिशेब शेवसी हजीर केला आहे. त्याचे ऐवजाची आज्ञा होईल तेप्रमाणें फडच्या करून आज्ञा होईल तिकडे चाकरी करितील. इतक्यांत वकिलाची स्वारीचें वर्तमान आलें. तेव्हां वकील मानकरी दरगदार यांजला थांरले कचेरींत लाऊन दिल्हें. कचेरीचे दरवाज्यापावेतों गोपाळराव येऊन घेऊण गेले. अर्ध ताजीम होऊन, डावे बाजूंकडे जागा घेतली. येक घटिका ग्वल्वत जालें. गोपालराव याणी विचारलें तुम्हाकडील ऐवज अद्यापि येत नाहीं, येथें फौजेचे ग्वर्चास दिल्हा पाहिजे तर ऐवज द्यावा. त्याणें उत्तर केलें आमचीं पत्रें आलीं. ऐवज मागाहूण रवाणा करितों. तो आठ दाहा रोजांत दाग्वल होईल. विंचूरकर वगैरे (प्रकर्णी) कांहीं इंग्रजाचें बोलणें जालें. येक घटिका ग(त्रीं विडे) देऊन मार्गस्त केलें. शेवसी श्रुत होये हे विज्ञापना.

*Krishnaji Gaikwad gives an account of how Malwa and the territory in the vicinity was being pillaged by the Pindaris. He mentions the visit which the British Resident Strachey paid to the Sindia.*

---

*No. 290]* *[28-2-1814*

पौ छ २७ रावल

नत आर्वा

**श्री**

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ ७ माहे रविलावल मुकाम लस्कर नजिक ग्वाल्हेर येथें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिजाबहादुर रोज गुदस्त प्राथःकालीं उठून स्नाण जाले. प्रहर दिवसा भोज्यन करून स्वारी तयार करऊन दाहा घटिका दिवसा स्वारी बागांत गेली. दीड प्रहर दिवसा सौभाग्यवती बायेजाबाई यांची स्वारी गेली. शागीर्द पेशा मानकरी सर्व लोक बागाचे बाहेर लाऊन, उभयेतां बंगल्यांत बसले. दाहा घटिका दिवस राहातां घोडे बोलाऊन फेरिले. दोन घटिका दिवस राहातां बान आणोन काग, रावे, वगैरे पाखरावर सोडिले. सायेकालीं स्वारी वाड्यांत आली. सदाशिवपंत निसबत सेनापति व मल्हार भिमाजी बक्षी याणी खर्चाविशई विनंती केली. हुताशणी-

१ लहबार = Travelling equipment or train; baggage and followers.

परियेंत थोडे थोडें खर्चास देवितों म्हणोन भाशन करून आंत दाखल जाले. खंदाराकडील वर्तमान दुसरे बातशहाची फौज आली आहे. तिजवर शहाकडील फौजेनें छापा घातिला. कायेमखां, नफरखां व बरखी दोन सरदार जखमी जाले. दाहावीस माणूस मारिले. पलून च्यार कोस माघारी गेले. शाहाकडील फौजेची फते जाली. रनजितसिंग सीक याणें लाहुरास पाथरवट पांचसातशें आसामी यांसी खर्चास देऊन, आटकेस पाठविलें. किल्यासभोवता खंदक पनास हात रुंदीचा पाणी लागे तोपावेतों खणावयाची आज्ञा केली म्हणोन दिलीचे येकबारीत आलें. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer supplies news received from Kandahar. Ranajitsing was digging a deep moat round the fort of Attock to defend the place against the Afghans.*

---

*No. 291*] [*12-3-1814*

पौ छ ९ राग्व चैत्र

सन आर्बा अशर

मुा नासिक

श्री

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगलें विज्ञापना. तागाईत छ १९ माहे रविलावल मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलीज्याबाहादुर राजगुदस्त प्रात:कालीं मुखमार्ज्येन जालें. भालदार याजला आज्ञा केली. कारभारी दरगदार मानकरी वकील मंडळी लाहाणथोर रंग घ्यावयास बलावणें. सखो शामजी यांस राजश्री सेनापति येशवंतराव दाभाडे यांजकडे पाठविलें, आपण रंगास आलें पाहिजे. भोज्येनास वाड्यांत चालिलें पाहिजे. दोन घटिका दिवस येतां श्नाण करून पोशाख घेतला. त्रिंबकराव दाभाडे व सौभाग्यवती चिमणाबाई यांची स्वारी आली. पांच घटिका दिवसां भोज्येन जालें. भले लोक मानकरी येऊन कचेरींत बसले. गोपालराव रघुनाथ मोरो हरि गोकुल पारख आले. पारख यांसीं दोन घटिका खलबत जालें. दरगदार वकील मंडळी येऊन कचेरी जाली. कलवंतनीचा नाच होऊं लागला. दीडप्रहर दिवसां कचेरीत येऊन सर्वांचा रामराम जाला. जैकम साहेब याणें विनंती केली पलटणचे लोक रंगास यावयाची आज्ञा जाली पाहिजे. त्याजला बोलावयास सांगितलें. येक येक कंपणी पुढें बोलाऊन त्याजवर रंग दोही हातांकडे

दोन नसका त्यास तोच्या लाऊन रंग घालून वर गुलाल टाकूण विडे देऊन डेन्या-बाहेर लाविले. त्याचें मागें पथकें याजकडील पथकाचे लोक बोलाऊन रंग गुलाल विडे दिल्हे. पागाकडील लोक त्यास याप्रमाणें रंग घालून विडे दिल्हे. नंतर मानकरी यांजवर घातला. सर्वास विडे देऊन दीड प्रहर दिवस राहातां सर्वांचा रामराम घेऊन आपण व दाभाडे वाड्यांत गेले; तिकडे प्रहर दहा घटिका रंग खेलिले. आंगावरील पोशाख भिजले घटका दोन दिवस राहातां श्नाणें जालीं. दाभाडे यांजला पोशाख व चिमणाबाई यांजला लुगडें चोळी दिल्हे. तीन घटिकां रात्रीं भोज्येन करून दाभाडे व बाई यांची स्वारी आपले वाड्यांत गेली. तुकारामबोवाचे उछाहाचें ब्राम्हणभोज्यनास मुक्तद्वार सेनापतीचे येथें केले. सात आठशें ब्राम्हण भोज्यनास आले. तिसरें प्रहरां व रात्रौ कीर्तन जालें. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad gives an account of how the "Rang-Panchami" festival was celebrated at the court of Sindia by throwing coloured water upon the assemblage.*

---

*No. 292]* *[28-3-1814*

श्री

वडिलांचे शेवेसी. आपल्येममान कृष्णाजी नाईक गायेकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ ५ माहे रबिलाखर मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें वाळकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलिज्या बाहादुर रोजगुदस्त प्रात:काळीं श्नान करून पोशाख घेतला. गंगारूप बालाबाई देशमुख यांचे येथें पावचालीनें समाचारास गेले. च्यार घटिका बैसोन औपधें दिल्हीं. गोपाळराव रघुनाथ यांजला बोलाऊं पाठविलें. त्याजला सामाधान नाहीं म्हणोन वर्तमान आलें. दाहा घटिकां दिवसां वाड्यांत येऊन भोज्यन जालें. स्वारी तयार करून बागांत गेले. दोनतीन दिवस हाजिरी घेऊन घोडीं छयाट दीडशें काढिलें. त्यांस आणोन उत्तम ध्यानास आले ते पागांत लाविलें; वरकड बागांत ठेऊन पाहऱ्यासभोवती ठेविलें. दीड प्रहर दिवस राहातां गोकुळ पारख मणिराम मल्हार भिमाजी बक्षी आले. पारखास दोन घटिका बोलणें होतां मोरो हरि कर्णेल ज्यान बत्तीस गणपतराव राजाराम विंचुरकर गणेश उमाजी निम्बत भुसकुटे आले. पारख मोरो हरि यासी खलबत जालें. भुसकुटे बऱ्हाणपुरीं मृते पावल्या मागें दत्तविधान घ्यावयासी च्यार मुलें आणिलीं, त्यांत येकास देवी निघोण मृत पावलें, म्हणोन भुसकुटे यांचे वकिलाणें सांगितलें. बलवंतराव देवरीवाले यांची नकल जाली, सबब त्यांच्या कन्येचें मूल दत्त घ्यावें

येविशी पुण्यास सरकारांत नजराणा देऊन वस्त्रें सकारचीं येका दो रोजानें पुण्याहून वकील रवाणा करणार म्हणोन त्यांजकडील वकिलाचे येथें वर्तमान आहे. येक घटिका रात्रीं स्वारी वाड्यांत येऊन दाखल जाली. राजश्री बाळोजीबावा कुंजर यांचा वाखा हरघडीं होत आहे. आठसात दिवस पित्तविकार होऊन डावें आंग आगदी जड पडिलें. अन्न चालत नाहीं. शरीर अगदीं शक्तिहीण जालें; त्याजवर वृद्धापकालाची ज्येरा प्राप्त. श्रीसत्तेकरून दिवस लोटतो हा खरा. देह आवसान चालतें. इतक्यांत स्वामीमाहाराजाचे चेरणीं मस्तक ठेवावयाची इच्छा करून दिवसांतून शत वेळां उद्‌कार करीत आहेत. शेवेसी श्रुत होये हें विज्ञापना.

*¶Krishnaji Gaikwad writes a daily account of Daulatrao's life and also reports the illness of Baloji Kunjir.*

---

*No. 293]* *[4-12-1814*

श्री

वडिलांचें शेवेशी अपत्यसमान कृष्णाजी नाईक गाईकवाड दंडवत विज्ञापना. तागायत छ २१ माहे जिल्हेज मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें बालकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्याबहाद्दर रोज गुदस्त प्राथःकाळीं मुख माज्येन जालें. खासा स्वारी व बाईकडील स्वारीचे लोकास स्वारीची तार्कीद जाली. स्नान करून सहा घटिका दिवस येता भोज्यन जालें. भास्कर बल्लाळ व उदाजी खटके यानीं येऊन पागाकडील लोकांचे खर्चाविसी विनंति केली. त्यांजला सांगितले पटाचे बराबर तुम्हाकडे खर्चास पावेल. राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति यांचे शरीरास समाधान नाहीं. त्यांजकडील वर्तमान आणवावयास हुजऱ्या पाठविला. मुनसीनें दिल्लीची एकबार आणली. मटकर्णसाहेब+ याणे डाक बसऊन जर्णेलाकडे जावयास सरंजाम पुढें रवाणा केला. आपन डाकेनें जान्हार. पातशाहाचा निरोप जाला. जंबूचे जमीदारानीं उठावणी केली. याजकडे रंजितसिंग सीक याणे फौज पाठविली. आटकवाल्याचे पत्र सिकास आलें. शहाकडील वजीर पिसोराहून व काश्मीरवाला सुभा येन्हार; तर येथील कुमकेस फौज आली पाहिजे. सिकाणे उत्तर पाठविले हुजरी घेऊन फौजेची रवानगी करितो. तुम्ही वरचेवर वर्तमान लिहीत जावे म्हणोन वर्तमान आलें. सौभाग्यवती बायेजाबाई व चिमणाबाई मुलास घेऊन देवी पुजावयास ग्वाल्हेरी पलीकडे एक कोस स्वारी गेली. सरदार याची स्वारी सिकारीस पन्हाराकडे तीन कोस गेली. रामचंद्र भास्कर याजला दोन

+ Macnaughten.

प्रहरापासून ज्वराचा उपद्रव जाला. मीरो हरि मानकरी वकील मंडळी गोकुल पागवाचे येथें जाऊन कचेरी जाली. सहा घटिका दिवस राहतां बायाची स्वारी आली. च्यार घटिका रात्री एक हरण सिकारींत गोळीनें मारून स्वारी आली. वेधृतीमुळे दरबार जाले नाहीं. शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Krishnaji Naik communicates that Ranjitsing was mobilizing his forces and intended to post them at Attock to resist the onward march of Fatekhan, the Vazir of the Shah of the Duranis.*

---

*No. 294]* *[13-12-1814*

श्री

वडिलांचे शेवेशी आपत्यसमान कृष्णाजी नाईक गायेकवाड दंडवत विज्ञापना. तागायत छ २० माहे जिल्हेज मुक्काम लष्कर नजीक ग्वाल्हेर येथें वालकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्याबहादूर रोज गुदस्त प्राथःकाली मुखमार्ज्यन जाले. बाळोजी कुंजर कूच करून लागले त्याजला सांगून पाठविले आज कूच न करावें, दो चव रोजांत तुम्हास मार्गस्त करितो. त्याजवरून त्यानीं मुक्काम केला. ज्यान बक्तिसाकडील एकवार मुनसिंग आणिली. येशवंतराव सिवाजी हांड्याकडे गेला. करीमखां पेंढारी याचे लोक चैनपूरवाड्या-नजीक आहेत. छितू पेंढारी सत्वासेस आले. इंग्रेजाची व गोरख्याची लढाई आणीख जाली म्हणोन बोलवा आहे. रामपुरानजीक कोणी अख्तर लुधानेवाला आहे, त्याचे पलटण पहाडांत चढून गेले ते गढीतील लोकांस समजताच (ल)ढाई करून आले. वरून तोफा खालन पायचे लोक होऊन मधें पलटण मारले. एक कर्णेलाचे डोके कापून नेले. एक कर्णेल जखमी जाला. लोक भारी फार पडून सिकस्त पावले. त्याचे येथें वर्तमान लढाई जाली म्हणोन मोघम सांगतात. यामुद्रा तीन लढाया लढता सिकस्त इंग्रेजाकडील जाली. या लढाईत इंग्रेजाणी हत्ती बाधला होता तो दारूणे भडकूण पळाला. सेनापतीचे गाठांतील राहुटीवर पाये देऊण गेला तो राहुटींत ब्राम्हन निद्रिस्त होता त्याजवर पाये पडून मृत्ये पावला. शहरांत बैरागी याणे द्रव्य सांगितले होते तेथें अणा बानड्याचे पागेंतील बारगीर पाठविले. खाणीनें जागा खाली निघालीच सबब तो बैरागी पागाचे चवकीत आहे. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Krishnaji Naik reports a battle between the Gurkhas and the English.*

*No. 295*] [*15-12-1814*

श्री

वडिलाचे शेवसी अपत्यसमान कृष्णाजी नाईक गायकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ २ माहे मोहरम मुकाम लष्कर नजीक ग्वालेर येथें बालकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबाहादुर रोज गुदस्त प्रात:काळीं उठून मुखमार्ज्यन वाड्यांत जालें. राजश्री सेनापति येशवंतराव दाभाडे शहरांतून स्वारी आली, ते जनानखान्याकडे गेले. तेथें रामराम जाला. मुलाचें वर्तमान विचारिलें, ते हैराण आहे. तोंडास बुडबुडा आणोन नेत्राचें बुबुल वर चढविलें. गोपाळराव रघुनाथ मुरलीधर वकील निसबत जगनाथराम आणोन वैधे बोलाऊन औषधउपचार करूं लागले. अडीच प्रहर दिवसा स्नानें होऊन भोज्यनें सर्वांचीं जालीं. गोपाळराव रघुनाथ प्रहर दिवस राहातां आपले येथें स्नानास गेले. मुलाचे समाचाराकरितां कारकून व जासूद दरगदाराकडील व शेटजीकडील व मानकरी याचे हरघडीं समाचार घेत राहिले. दिन अस्तमित सेनापतीकडील बाया शहरांतून आल्या. त्याणी व सौभाग्यवती बायेजाबाई याणीं मुलावरून ओंवाळून धर्म केला. खासगीवाले ब्राम्हण पांच सात आसामी यांजला आलाहिदा पांचच्यारशें रुपये धर्म केला. दोन घटिका रात्रीं काहींक आराम होऊन दुग्धपान केलें. इंग्रजाचे व गोरखी याचे तिसर लढाईत किंकरजनास आठ जखमा जाल्या. सात आठशें तेलंगा व गोरा मारिला. नवीं पलटणें आणोन ठेवित आहेत. चवदा ठिकाणीं लढाईचा इरादा लागला आहे. छ १४ जिल्हेजी शीक लाहुराम येऊन फौजेची तयारी करीत आहे. बालीसाहेब लखनुरवाला नवाबाचे ममलतीनें आहे म्हणोन कलकत्याहून त्याचे बदली दुसरा गोरा पाठवणार. दिलीचे आसपास चोरांचे जालें. जागजागीं वाटावाटा मारितात. याची चवकशी दिलींत गोरा आहे तो करितो. जे गावांत चोरांनीं वाट मारिली जाईल तेथील जमीदारास आणून शासन करावें, ऐसें दबाव चालीत आहे म्हणोन वर्तमान आलें.

[*Krishnaji Gaikwad reports the news which reached the court of Gwalior about the fighting between the Gurkhas and the English. The Sikhs at Lahore are reported to be engaged in making preparations for war.*

---

*No. 296*] [*21-12-1814*

श्री

वडिलाचे शेवेशी अपत्यसमान कृष्णाजी नाईक गायकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ ८ माहे मोहरम मुकाम लष्करनजीक ग्वालेर येथें बालकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिजाबहादूर रोज गुदस्त

याजकडे मुनसी दिल्लीचा एकबार आणिले. जर्णेल साहेब यानें दरबार केलें. दिल्लीहून बातशाहाकडून गेले. त्यांत कमलनयन यानें पांच मोहरा दोन घोडे एक हत्ती एकवीस-किस्त पोषाख व जवाहिर नजर केली. अजमगडवाले याणे आक्रा किस्ती दोन घोडे एक हत्ती. अरबज्यान याचा मूळ बिनहत्यारा-सिवाये भेटीस येईना. आम्ही सिपाई आमचा बाना ठेऊन येणार नाहीं तेव्हा हत्यारासहित भेटून अक्रा मोहरे दोन घोडे एक हत्ती दिल्हा. बातशहाचा मुका देऊन दोन घटिका बैठक जाली. विडे अत्तर देऊन आपले ठिकाणी विदा केले. गोरखीयाचे लढाईनें हावालदील आहेत. तिन्ही लढाया चांगल्या मारल्या म्हणोन वर्तमान आहे. दक्षणेत पलटणें होती ते रेवा पलीकडे आली. लढाईस परभारे जात आहेत. चार घटिका दिवस येता श्नान करून दहा घटिका दिवसी भोज्यन जालें. दहा बारा मानकरी वकील बक्षी येऊन प्रहर सहा घटिका भाशन जालें. गोकुळ पारख याजला पोटांत दर्द जाले त्याने हैराण आहे. रामचंद्र भास्कर यांचे येथें बंधूचें श्राध्ध जाले. वरकड कारभारी आले नाहींत. दोन घटिका रात्री राजश्री त्रिंबकराव दाभाडे याजला बोलाऊन मीर असदअली यांचे येथें ताज्याचे दर्शनास गेले. तीन घटिका परियंत मरसीये एकूण स्वारी वाड्यात आली. दाभाडे याजला फकिरीचे वस्त्रे व बाईकडे मोहरा फकरीच्या दिल्या. फराळ करून आपले वाड्यांत गेले. वाड्यांतून हुजऱ्या इम्नरची साहेब यांचे येथें डाक्तर साहेबास बोलाऊन गेला. त्याणी सांगितले कीं सौभाग्यवती रखमाबाई हैराण आहेत. सबब बोलाविले. त्याणी विचार केला आपल्याकडे बोलाऊ गुलमहंमद चोपदार येत आसतो, अथवा चिठी तरी असावी; त्याजवरून हुजऱ्या माघारी फिरऊन आत्मारामपंत वकील पाठविला. त्याणे वर्तमान सांगताच चौकशी केली तो ख्वासगी बोल्या बाईकरितां हुजऱ्या पाठविला असे सिद्ध जाले. शेवेशी श्रुत होय हे विनंति.

¶*Krishnaji Gaikwad reports the fighting between the Gurkhas and the English and the illness of Rakhmabai.*

---

*No. 297*] [*22-12-1814*

**श्री**

वडिलांचे शेवेसी अपत्य समान कृष्णाजी नाईक गायकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ ९ माहे मोहरम मुकाम लस्करनजिक ग्वालेर येथें बालकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादूर रोज गुदस्त मुखमार्जेन करून मानकरी व मल्हार भिमाजी बक्षी यांचा रामराम जाला. बक्षीणें लोकाचे खर्चाविशई विनंती केली. त्याज बराबर सखो शामजी यास देऊन मोघम पटा पैकीं माणिराम याजकडून खर्चास देविले ; जातेसमई दौलतराव

देशमुख याणें खर्चा करितां बक्षीस आडविलें. थब्याखालीं आंगावरील शालजोडी व आंगांतील रूदार आंगरखा काढून घेतला. बक्षी आंगवस्त्रानसी मणिराम याचे येथें गेले. मुनसीनें येकबार आणिलें. हरसुकलाल कागदी दिल्लीवाला याचा मुकाम आमरसरास आहे. सुज्यालमल्क बातशहा याची बेगम लाहुराहून पुरुशाचा वेस घेऊन गेली, ते आमरसरीं त्याचे भेदानें त्याचे दुकाणी राहिली. त्याणें पुढें काढून दिल्ही ते चवकस करितां वर्तमान रंजितसिंग सीक यास समजलें. त्याजवरून आमरसरचे दुकाणचा गुमास्ता व आणीख येक बायेको येक पठाण बेगमचे भेदांतील धरून किल्यावर चढविली. दुकाण जप्त केलें. लोणी आस्तर याणें पाहाडास टाकी लाऊन वर्ग केला, तो गोरख्यानीं करूं दिल्हा. ...द तोंडावर कांही लोक पाठऊन लढाईचा प्रसंग घालून पाठीवर घेऊन पुढें पल काढिला. लोणी आस्तर व च्यार पलटणें चढून गेलीं, तेव्हां झाडींतून सभोवते गोरखे जमले. तरवार चालऊन च्यारी पलटनें पैकीं दोन हाजार लोक मारिला. चौदा साहेब ठार केले. लोनी आस्तर व जखमी बाकीचे लोक पळून तोफा सोडून गेले. जर्णेल याणें दिलीचे वगैरे वकील भेटीस गेले होते, त्यास दिलीस खालीं वाटे लाविलें सांगितलें. मागाहून मटकन साहेब आलियावर तुम्हांस वस्त्रें देतील. आपण मुरादाबादेहून कूच करून कासी रुद्रपूर गोरख्याचें आहे तिकडे गेले. कासीपूर पाहाडाखालीं मैदानांत आहे. रुद्रपूर पाहाडांत आहे. प्रयागा-कडे मिर्जापूरचे जिल्ह्यांत रेवामुकुंदपूरचे जमीदाराणी दंगा करून इंग्रजाचीं ठाणीं उठऊन दिल्हीं. दाहा पांच ठाणीं खालीं जालीं. देमीं घोडनदीवरील पलटणें उमरावतीकडे आलीं. भुपाळास आथवा लढाईकडे जाणार म्हणोन वर्तमान. भोज्येन उत्तर अडीच प्रहर दिवसा कचेरी जाली. इस्तेरची साहेब येन्हार त्याजकडे बोलाऊं गुलमहमद चोपदार पाठविला. दोन घटिका दिवस राहातां बगींत बसून आले. वाड्यांत बगी येतां मेवाती याणीं मणा करून उभी केली. मागाहून आंतून परवानगी पाठऊन आंत बगीसहित आले. अर्ध घटिका कचेरीस येऊन मुल गत जाले त्याचे शांतवन करून गेले. बालाजी येशवंत याचे चिरं-जिवास पहिले नागपूर वकिलीचे कामास जावयाचीं वस्त्रें जालीं त्याजवर ते जाणें तहकूब जालें. हालीं पुन्हा त्यास साडेतीनसें रवानगीचीं आलीं. दिन आस्तमांत कचेरी बरखास जाली. दोन घटिका रात्रीं स्वारी सेनापतीचे येथें ताज्याचे दर्शनास गेली. दोन घटिका मरसीये एकून पांचवीचे आमलांत वाड्यांत आले. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶Krishnaji Gaikwad in communicating the daily happenings at the court of the Sindia gives an account of the reverse which General Ochterlony suffered.*

+ Ochterlony.

7280

**श्री**

यादी सरकारांत विनंतीपत्रें आलीं त्यांतील सारांश. सुा सन आर्बा अशर मयातेन व अलफ.

कलमें.

१ कृष्णाजी गायेकवाड याजकडील छ १४ रमजानचें पत्र आलें. त्यांतील इस्तेरची साहेब याणें सिंदे यांसी बोलणें केलें कीं श्रीमंताची आज्ञा जाली आहे. खासगी सरकार व सरंजामी लोक विंचुरकर वगैरे यांचे माहाल तुम्हाकडे आहेत. त्याचा मागील ऐवज आकारेल तो व माहाल ज्यांचे त्यास द्यावे. आपले कमाविसदार यास तांकीद करून सोडचिठ्या देवाव्या; यांत सरकारचा व तुमचें आमचें रहश राहातें. नाहीं तर आम्हास सरकार कामगारी करणें प्राप्त आहे. शिंदे यांणीं उत्तर केलें कीं याचें बोलणें मागाहून तुम्हासी करूं. नंतर शिंदे याणीं राजश्री बाळोजी कुंजीर यांसी बोलणें केलें कीं श्रीमंतास तुम्ही आपलें नावें पत्र पाठवावें, आपलें बोलणें इंग्रजाचे वकिलासी न पडावें, सरकारची आज्ञा तुम्हास यावी. तुम्ही आम्हास सांगावें, त्याप्रमाणें तुमचे आमचे विचारें करावयास येईल. शत्रूचे हातें काम व्यावें हें चांगलें नाहीं. कुंजीर याचें उत्तर. तुम्ही सांगतां तें नीटच आहे; परंतु सालगुदस्तां गडेकोट्याविशीं सरकारांत पत्रें पाठविलीं कीं ठाणीं खालीं करून कुंजीर याचे जिमेस करून देतों, हे आम्हास सांगून पत्रें पाठविलीं, असें असतां तुम्ही गैरमार्गाची चाल करून सरकारांत आमचे पदरीं लबाडी आणिली. प्रसंगीं बोलणें बोलतां, अखेरीस आम्हास लबाड पाडून तुम्ही आपली करणी करीतच आहांत. हालीं तुम्ही बोलतां याची खातरी आमची होत नाहीं. याजकरितां सरकारांत पत्र लिहून लबाडी घेणार नाहीं. या प्रमाणें मध्यस्तासी स्पष्टोत्तर जालें.

१ रामचंद्र लक्ष्मण गोखले यांजकडील पत्र तालुके आडुर वगैरे प्रांत कर्नाटक येथील श्रावण वद्य १३ चें आलें. त्यांतील लोकांस माहे साबानचें रोजमऱ्याची वांटणी हातावर करून सूडबंद व पावत्या व जदीदबंदीची शिलक झाडा लिहून शेवेसी पाठविला आहे. सैद मासुम रामपूरवाले पठाण आसामी ४१ बेळगांवीहून तालुके मजकुरीं छ १४ साबानीं पोहचले. हजिरी घेऊन रवाना दिल्हा.

१ नरसिंगराव दत्तात्रय याजकडील पत्र किले लोहोगडाहून आश्विन शुद्ध २ (द्वितीये) चें आलें, त्यांतील मुंबईहून जासूद आसामी दोन रोकड ऐवज

घेऊन पुण्यास येतां बोरघांटांत अर्धे घांटीं चोरय्यांनीं ठार मारिलें. ते चोर धरून ऐवजमुद्रां पाठविले. मजला दर्शनास यावयाची आज्ञा जाहाल्यास दर्शन घेऊन जाईन.

¶*This document gives a summary of letters written by Krishnaji Gaikwad in connection with the relations between Daulatrao Sindia and the Peshwa Bajirao.*

---

*No. 299*] [*1-1-1815*

श्री

माहाराजांचे सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायिकवाड निमवत त्रिंबकजी डेंगळे विज्ञापना. तागाईत छ १९ माहे मोहरम मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्या बाहादुर रोज गुदस्त प्राथःकालीं पागेचे घोडे आणोन चाबुकस्वाराकडून फेरिलें. कर्णेल ज्यान बर्नास याजला पत्र लिहिलें. हिंदुराव घाटगे याचा आमल जावदेस येशवंतराव सिवाजीकडील होऊं देत नाहींत. तुम्हीं घाटगे याचा आमल बसऊन देणे. मुनर्सीनें येकवार आणिले. मीरखां कृष्णगडाचे जिल्ह्यांत आहे. त्याजकडे महताबखां सडा भेटावयास गेला. बापू सिंदे याचा कुवर खटल्यासुधां जैपुरीं जातांना मार्गांत जमीदाराणें धरून नेला. दादावीस माणश कुवर याजकडील जखमी जाले. यशवंतराव याजकडील मजकूर छितु पेंढारी मशारनिलेजवळ गेला. त्याजला कर्णेल याणें आपल्याकडे आणावयाचे बोलणें लाविलें. तो यांजला पातजत नाहीं. सबब कोटवाल्याचे विद्यमान्य बोलणें करीत आहेत. रंजितसिंग सीख याणें सरंजाम आटकेस कांहीं पाठविला म्हणोन वर्तमान आहे. भोज्यन उत्तर हिंदुराव घाटगे याचीं पत्रें आलीं ते पाहिलीं. कारभारी मानकरी येऊन कचेरी जाली. रामचंद्र भास्कर गोकुळ पारख यास खलबत केलें. नंतर पारख रामचंद्र भास्कर या उभयेतांचे जालें. बालारामशेट बोलाऊन त्रिवर्गाचें दोन घटिका जालें. उपरांतीक सरदाराकडे जाऊन, त्रिवर्गानी खलबत केलें. सौभाग्यवती बायेजाबाई यांचा ऐवज पारखाकडे आहे ते आपला ऐवज व त्यांजकडील लोकांचा हिशब मागतात. जगदेवराव निंबालकर याजकडील जातीची हजिरी आद्यापि घेतली नाहीं. त्याणें खर्चाचें बोलणें घातलें. त्यास दोन लक्ष रुपये देतात. इतक्याणें त्याची समजूद होत नाहीं. त्याचें बोलणें हजिरीविसीं कितेक वेळां आपणांस विनंती केली. आपण हाजिरी न करितां चाकरी घेत आले. ते घोडे माणूस आपले ध्यानांत आहे. ते आन्वयें खर्चास द्यावे. तीन

7282

घटिका रात्रपरियेंत बोलणें करून कचेरी बरखास केली. मागें रामचंद्र भास्कर यांसी खलबत करून उठून गेले. शेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Krishnaji Gaikwad communicates the daily happenings at the court of the Sindia mentioning that Ranjitsing was reinforcing his army posted at Attock.*

---

*No. 300]* *[4-1-1815*

श्री

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ २२ माहे मोहरम मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिजा बाहादुर रोज गुदस्त मुखमार्ज्येन जालें. माधवराव ब्राह्मजी, मल्हार भिमाजी बक्षी आले. दक्षिणे लोकांस कर्जाऊ ऐवज वाटिला. त्याची यादी आणिली ते पाहून उत्तर केलें, रामचंद्र भास्कर याजकडे घेऊन जाणें. इस्तेरची साहेब सिकारीस गेला होता, तो रात्रीं आला. हिंदुराव घाटगे याजला पत्र खासगी-वालेकडून लिहिली. कांहीं खर्चाची तयेकरून पाठविनार. मोज्यनउत्तर कारभारी मानकरी येऊन कचेरी जाली. गोकुल पारख यांसी खलबत च्यार घटिका जालें; रामराव फालके जगदेवराव निंबालकर याणी आपले खर्चाविषई बोलने केले. फालके साहा लक्ष रुपये हिशाब मागतात. निंबालकराचें मोघम बोलणें होत आहे. वरकड सिलेदाराचीं बोलनीं जालीं. आज काल पट दुकानी जात होता त्यास प्रथम दिवसच आहे. पांच रुपये द्यावयाचे आसले तर द्यावे, नाहीं तर विडे देऊन मार्गस्त करावें. राजश्री बालोजीबाबा कुंजर येऊन बोलणें केलें, मला श्रीमंताचे पायांजवल जावयास निकट तीन महिणें परस्थानी आहे. आद्यापि तुम्हीं निरोप देत नाहींत. तेथें श्रीमंताचे मणांत विपर्यास येईल. तेव्हां निरोपाकरितां कितेक दिवस आटकूण राहावें? मजला दररोज साठ सत्तर रुपये खर्च लागतो हा कोठून करावा? त्यासी उत्तर केलें कोठी तुम्हांयोग्य नाहीं. ते तलाशात मोरो हरि आहेत; तजवीज करून दशमीस वस्त्रे देऊन मार्गस्थ करितों. यानी उत्तर केलें वस्त्रें कोठी जेसी असेल तेसीच देऊन वाटेस लावावें. त्यानी आग्रह करून दशमीपर्येंत ठेऊन घेतले. समागमें गंगारूप सालूबाई सिंदे यांजला वाटे लावणार. पारख याणें कर्णेलास पत्र घेऊन लाला दुर्गाप्रसाद वकील निसबत कर्णेल याजपासीं देऊन सांगितलें, जलदीनें पत्र रवाणा करणें. सायेकालपरियेंत सिलेदारमंडल वाटे लाविले. फालके व निंबालकर याची बोलनी करितां पांच घटिका रात्रीं घरास जाऊन आपण उठून गेले. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Baloji Kunjir who had been on deputation to the court of Sindia requests permission to return to Poona.*

7283

No. 301] [7-1-1815

श्री

महाराजाचे शेवेशीं आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गाईकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ २९ माहे मोहरम मुक्काम लष्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्या बहादूर रोज गुदस्त प्रातःकाली मुखमार्ज्यन जाले. मानकरी सर्वा शामजी मुनसी येऊन रामराम जाला. कलकत्याकडील वर्तमान सावकाराची दोन जहाजे भरून आली आहेत. इंग्रजाणी गोरखी याजकडील देहेरा व न्हाण दोन जागा घेतल्या. त्याजवर गुरखे यांची फौज कालसीहून न्हाणचे शहरात इंग्रेज आले होते ते मारीत बाहेर काढून पलविले. देहेऱ्यास होते त्याणी गोरखी यांची जागा पाडून निघोन गेले. हरिद्वाराकडे पलटणे व तोफा जान्हार. इंग्रजाकडील गोरे हरण्यास व मेटार्नीस जाऊन नवी पलटणे भरतीस लोक पाहूं लागले. त्याणी उत्तर केले, आम्ही जमीदाराजवल वेटी चाकरी केली नाहीं, पुढेंहि आम्हास होत नाहीं, याचप्रमाणें हिंदुस्थानीं सरंजामी याम तार्कीद व त्याचें बोलणें आहे. नवी पलटणें भरावयास लोक मिलत नाहीं. जर्णेल करनाल पटाले लुधाणे या जिल्ह्यात आहे. दिल्लीकडे यावयाची आवाई आहे. महमूदशहा पातशहा यांची बेगम लाहुराहून सिकाचे जमीतून निघोन गेली. ते लुधिन्यास इंग्रेजाजवल आहे त्याणी बरदास्त करून ठेविली. त्याजवरून रंजितसिंग सीक यांचे बोलणें आपले ठिकाणीं इंग्रेज आम्हास सलुखांचे बोलणें करून, आमचे येथून भेद लाऊन बेगम घेऊन गेला. पुढेंही याचा सलुख येसाच उपयोगी पडनार. त्याचे मणातील भाव शहाकडील वकील सलुखांचे बोलण्यास आला, त्यासी सलुख करून गोरखे आणून मिलोण इंग्रजाचे पारपत्य करावे येसी वदंता आहे. कर्णेल ज्यान बर्त्तीस उज्येनीनजीक दोहो कोसावर आहे. येशवंतराव सिवाजी आपले ठिकाणी जावदेस गेला. अंबाजी सखाराम जावद प्रांती दंगा करून पैसा घेत आहे. त्यास मणाई पत्र पाठविले. जावदेचे वगैरे येशवंतराव यांचे माहालास उपद्रव करूं नये. चार घटिका दिवस येता स्नाण करून स्वारी सांगितली. भोज्यन करून राजश्री त्रिंबकराव दाभाडे व आपण घोड्यावर स्वार होऊन, दीड प्रहर दिवस येता स्वारी बागांत गेली. दोन घटिका मागाहून सौभाग्यवती बायेजाबाई यांची स्वारी गेली. बागांत जागा पडली तेथें दोऱ्या धरून झाडे लावावयाची तऱ्हाचा नक्षा संतबा मोरे यास दाखविला. त्याजला उज्येनिस झाडे लावावयास पाठवणार. बालाराम भाई शेट याचे स्त्रीयेसी ऋतु प्राप्त जाला. तिचे फल-शोभणाचा समारंभ शेटजीचे दुकाणीं जाला. भोज्येन उत्तर सरदाराकडील

आहेर सखो शामजी व बायेजाबाईकडील आहेर बावा खासगीवाले घेऊन गेले. दरगदार मानकरी वकील पागे सावकार याजकडील आहे. शेला, पागोटे, लुगडी घोलखण प्रमाणे जाले. कलवंतनीचा नाच विडे अत्तर .गुलाब सायंकालपर्यंत जाले. सायंकालचे समई बागात तितर व खरगोस यांची सिकार करून दिन अस्तमान स्वारी वाड्यात आली. गोपालराव रघुनाथ याजला दोन तीन दिवस जाले. ज्वर कांहींसा येत आहे. तशेच स्नान देवतार्चन करून कचेरीस येत राहिले. चार घटिका रात्री वायूचा उपद्रव होऊन थोर शब्द केला. बोलन्यात तफावत पडला. शंगड्या शंकावयास करून औषध उपचार करूं लागले. माणूश वोलखी व बोलणे कमति पडले. उशःकाली वाड्यांत व दरकदार मानकरी वकिलास समजले. सर्व लहाण थोर आले. सरदारांणीं हुजरे चोपदार जासूद हालकरे नेहमी ठेवून वरचेवर वर्तमान आणवित. प्रहर दहा घटिका दिवस येतां कांहींक आरामसा दिसला. रामनामावली एकसारखी करूं लागले. पुन्हां भ्रम होऊन बोलणे सोडून नामावली चालली. मागील चार घटिका दिवस पावेतो आठ प्रहराच्या आठ मात्रा दिल्या. गोकुल पारख मोरो हरि नेहमी जवल बसले. नवग्रहाची दाणे वगैरे वृशभ गोप्रदानें म्हसी दाणे केली. सायंकाली मोरो हरि आले. त्याचे मागे पारख गेले. लोकाची दाटी नेहमी आहे. चार घटिका रात्रपर्येयेंत राहून, नामस्मरणाचा शब्द हलू येतो. शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Krishnaji Gaikwad writes that Ranajitsing was attempting to unite his forces with those of the Gurkhas and of King Mahamud Shah in order to crush the English. The daily happenings at the Court of the Sindia and the illness of Gopalrao Raghunathrao are also reported therein.*

---

*No. 302*| |*10-1-1815*

पौं छ २० सफर पौष
मास सन खमस अशर

श्री

माहाराजाचे शेवसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ २८ माहे मोहरम मुकाम लष्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलीज्याबाहादुर रोजदगुस्त प्रातःकाळीं स्वारी गोपाळराव रघुनाथ याचें येथें गेली. त्याचे चिरंजिवाचे शांतवण खातरी करून येक घटिकानें वाड्यांत आले. स्नान करून साहा घटिका दिवसां भोजन जालें. स्वारी

तयार करून प्रहर दिवस येतां बागांत गेले. दोन घटिकां मागाहून सौभाग्यवती बायेजाबाई यांची स्वारी गेली. बागांतील झाडें पाहून खालीं जागा आहे ते तयार करावयास सांगितलें. तृतीये प्रहरीं बाज घेऊन तीतर वगैरे पांखरांवर सोडिले. सुरतसिंग पाटील याचे गोटांत सौदागार हात्ती विकाऊ घेऊन आला, तो पाहाव-यास आणविला ; पाहून माघारां लाविला. दिन अस्तमित होतां बागांतून स्वारी वाड्यांत आली. मुनशींनें कर्णेल ज्यान बत्तिस याजकडील येकबार आणिलें. उज्यनचे मुकामीं दत्ताचे आखाड्यावर आहे. येथून आज्ञा जाईल त्याप्रमाणें तेथून कूच करणार. इंग्रजाणें गोरख्याकडील संस्थान न्हाणची जागा घेऊन राज्याचे माहालाशी लढत होते. गोरख्याकडील सुभा काल्रशीहून आला. त्याणें लढाई घेऊन इंग्रज शेहरांतून मारीत पाहाडाखालीं मैदानांत दोन कोस तलवार करीत नेलें. शेरसाहिब याजला सोला सत्रा जखमा होऊन रणाचें ठायीं राहिला. त्यास फिकरंजनसाहेब टाकून पळाला. फिकरंजीनसाहेबास जखमा जाल्या. साहा कोसांवर जाऊन येक बिल्टण उभें करून रात्रीं मुकाम केला. लढाईंत लोक मारिले गेले, त्याचें वर्तमान अद्यापि नाहीं. इस्तेरची साहेब याचे येथें वर्तमान आलें ते दिवशीं उदास होऊन अर्धरात्रीं भोज्यन केलें. येरवीं पांच घटिका रात्रीं भोज्यन होतें. त्याचे येथून हें वर्तमान निघालें. इकडील डाक खर्चाविण चालत नाहीं. इस्तेरची साहेब शिकारीस गेला होते. ते समयीं विंचूरकरांकडील ठाणेदार याणें भीतरवार व ममुष्यास नेऊन ठाणीं गढींत नेऊन दाखविलीं, म्हणोन वर्तमान आहे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad in communicating the daily happenings at the court of Daulatrao Sindia gives an account of the fighting between the English and the Gurkhas.*

---

*No. 303*] [*17-1-1815*

श्री

महाराजे सेवेसी. आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागायत छ ९ माहे सफर मुक्काम लष्कर नजीक ग्वाल्हेर येथें शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीजा-बहादूर रोजगुदस्त प्राथःकाली मुखमार्जेन जाले. रामचंद्र भास्कर मोरो हरि आले. यासहित स्वारी गोपालराव रघुनाथ याचे येथें गेली. बापू चिटनीस याचे शांतवन करून वाड्यात आले. अन्नामहाराज सन्यासी जगदेवराव निंबालकर यांचे गोटांत आहे. त्याचे खर्चाचे साहिते न जाले. सबब ते रागास येऊन

पांचचार कोसावर राहिले. त्याजला आणावयास अबाजी घाटगे याजला पाठविले. स्नान करून भोज्यन दहा घटिकांत जाले. सवा दोन प्रहरा कारभारी व राजश्री बालोजीबावा कुंजीर आले. बावांनी मार्गस्त करावयाचे विचारिले. त्याजला सांगितले तुम्हीं उदईक यांत्र बोलणे करावयाचे आहे. नागपूरवाल्याचे पत्र आले ते वकिलाणे देऊन उत्तर मागितले. त्यास सांगितले तात्या आलेकर होळकराकडील आलीयावर बोलणे करून उत्तर देऊं, म्हणोन तुम्ही आपले पत्रीं लिहिणे, कोटेवाले वकील याणे विनंती केली, उदेपूर व नाथद्वाराचे बंदोबस्ताविषयीं बापूजीराव सिंदे याजला पत्रे दिल्ही पाहिजे. ते चार घटिका रामचंद्र भास्कर गोकुळ पारख यास खलबत जाले. गोपाळराव यांचे धर्मास दहा हजार रुपये द्यावे असे ठरले. पारखास आज्ञा केली. एवज रोकड देणे. चिठी करून गुरुजींचे हातची दरगदार यांची चिन्हे होऊन, चिटनिसांचे येथें पाठविली. तात्या आलेकराचा मार्ग लक्ष्यांत आहेत. ते आलियाउपरी मसलत उभी करनार. सायंकाळीं कचेरी बरखास जाली. म्हणची लढाई इंग्रेजाची फत्ते जाली ते गोरख्यानीं मारून संस्थान त्याणी आपले घेतले ते लढाईत चौदा साहेब धरून नेले. दोन थोर माणूस होते ते सुटावयाकरितां पांच पांच लक्ष रुपये देऊ लागले; ते न घेतां दोघास गोरख्यानीं गर्दी दिल्हे म्हणोन बोलवा आहे. जर्नेल लुधाने करनाळचे जिल्ह्यांत आहे तो दिल्लीस यावयाकरितां बातशाहास सांगून पाठविले. तुम्ही आम्हास न्यावयाकरितां पुढे यावे. बातशाहाचा हुकूम जाला यामागें कोन्हास पुढे गेलो नाहीं, तुम्हास ही यावयाचे नाहीं. तुम्हीच आले तर आपले मर्यादेणे चार सरदाराप्रमाणें खाली बसाल म्हणोन वर्तमान आहे. शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik communicates that the Gurkhas carried off fourteen English officers as prisoners in the battle of Nahan.*

---

*No. 304*] [*23-1-1815*

पौ छ ८ रोवल सन
खमस अशर मया तैन

श्री

माहाराजाचे सेवेसी. आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ ११ माहे सफर मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादूर रोजगुदस्त प्राथःकालीं मुखमार्ज्येन जालें.

7287

पागांचे घोडे चाबुकस्वाराकडून दोन फिरविले. नरवरवाले लोहाराकडून येथें बंदुखा नव्या केल्या, त्याच्या गोल्या लाविल्या. बालोजी कुंजीर यानी बावाजी पाटनकर याचे गोटाकडून कूच केलें म्हणोन हलकारे याणी सांगितलें. त्याजकडे देवर्जा सांगल्या हुजर यास पाठविलें. त्याणी सांगितलें पौर्णिमापरियेंत तुमची खानगी होईल. येका दो रोजाकरितां उतावली करूं नये. तेव्हां लस्करचे पूर्वेस जगदेवराव निंबालकर याचे गोटाशेजारीं येऊन डेरा लाविला. च्यार घटिका दिवस येतां श्नाण करून पोशाख घेतला. भोज्यन करून दीड प्रहर दिवस राहतां बारादारीत कचेरी आली. रामचंद्र भास्कर याम्नी खलबत जाले. भास्कर बलाल पागनीस याजला पटापैकीं बारा लक्ष रुपये लाऊन द्यावयाचे ठरलें. गोकुल पारख यानी आक्षेप घेतला त्यांत पांच रुपये कमती करावेत. त्यास सांगितलें पांचच्यार पागाचे लोकांस व येकांड याजला हिशव बमोजी द्यावे लागेल. वरकड हालके पागाकडे मागाहून आदा विशेप नाहीं. त्याजला पांच रुपये द्यावयाचे यांत कमी करावयाचें नाहीं. च्यार घटिका दिवस राहतां बापू चिटनीस खंडेराव गोपाल नारायणराव कृष्ण त्रिवर्ग आले. त्याजला पटाचा इतेर्थ आहे तो रामचंद्र भास्कर याणी निवेदन केला. पेंढारी कोटेवाल्यास माहाल याणी लाऊन दिल्हे तिकडे दंगा केला आहे. त्याजविसी वकिलाणी विनंती केली त्याजला सांगितलें, कर्णेल ज्यान बतीस व आंबाजी सखाराम याजला येविसीं पत्रें पाठविलीं आहेत. सिलेदार मंडल च्यार घटका रात्रपरियेंत कारभारी याजला घेऊन बसले. निदान पौर्णिमा जालियावर द्यावयाचा वाइदा करून लोकांस उठऊन लाविलें. कारभारी आपले ठिकाणास गेले. शेवसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Krishnaji Gaikwad states that Baloji Kunjir has been permitted to return to Poona within a few days.*

---

*No. 305]* *[18-1-1815*

## श्री

महाराजांचे सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गाईकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना तागायत छ ६ माहे सफर मुक्काम लष्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेप. राजश्री दौलतराव सिंदे आलीज्या-बहादूर रोजगुदस्त प्राथःकाली मुखमार्जन जाले. पागाचे घोडे चाबुक स्वार याजकडून फिरविले. मोरो हरि येऊन दोन घटिका बोलनें जालें. माधवराव ब्रम्हाजी यानें निलेबूट हरबऱ्याचे आणिले ते वाड्यांत पाठविलें. राजश्री त्रिंबकराव

दाभाडे सिकारीस गेले. मुनसीनें आगऱ्याचे एखबार आणिले. इंग्रेज म्हाणचे लढाईत तोफा व जखमी सोडून पळाले ते आणावयाची हिंमत पुरेना. गोरख्याने सांगून पाठविले, तुम्ही तोफा व खनातील लोक घेऊन जाणे. गोरखे भारी पडले येविषयीं इंग्रजांणी कौशल्य करून कलकत्यास पत्र पाठविले, रामगडचा इरादा धरून झाडी तोडीत आहेत. लुधाणे मिरट वगैरे ठिकाणची छावणी सिमरूचे बेगमेस रखवाली करावयास सांगतात. तिणे उत्तर केले मजकडून छावणीची रखवाली होणार नाहीं. तुम्ही आपला मुखत्यार ठेऊन करावी. सिबंदी पाहिजे तर थोडी फार देईन. खोडीची छावणी तेथील जमीदारास, व मथुरांची रणधरसिंग जाट भरतपूरवाला यास सांगतात. त्यानींहीं याप्रमाणें उत्तर केले म्हणोन वर्तमान आहे. स्नान करून बारा घटिकांत भोज्यन जाले. दाभाडे याजला सिकारीत * * पाठविले. गंगारूप बालाबाई, बाबा आसगीवाले, सौभाग्यनी बायजाबाई आपण च्यार घटिका भाशन जाले. गोरख्याकडील पत्रे हरघडी येतात. पांच चार लढाई इंग्रजांची मारली. तुम्हाकडून उपराला जाला नाहीं. हल्ली त्याकडे तुमचा मुलूक आहे, त्याचा बंदोबस्त तुम्ही करावा; नाहीं तर इंग्रेजास मारून आमची फत्ते जालियावर तुम्ही मुलकाचा इरादा करू तर देन्हार नाहीं. तुम्हा आम्हात खलस पडेल. त्याजवरून येशवंतराव सिवाजी यास बोलाविले, पाहिजे त्याची खातरी व्हावी म्हणोन वस्त्र सिरपेच कंठी हाती त्याजकडे बहुमाणास पाठऊन आणावे. ज्यास वत्तिस बोलाऊन घ्यावा. आपले फौजेचा बंदोबस्त ठेवावा. प्रसंग पाहून पुढे करावयास येईल. बायजाबाईचे बोलणे जाले, नागोजी गुंड याजकडे वऱ्हानपूरबाबत वगैरे एवज येणे सबब त्याचे येथें पाहारे बसविले. आठ आठ दिवस उपोसित ठेविले. हली वाड्यांत आटकेंत ठेविला; परंतु पैशास ठिकाण नाहीं. त्यास काढून द्यावयाचे. यानीं उत्तर केले, तुमचे विचारास येईल तसे करावे. आडीच प्रहर दिवसा कचेरी जाली. रंजक वाड्यांत बजावीत आहेत. तेथें आग्नप्रवेश होऊन बरुद उडाली. कोन्हास धक्का पावला नाहीं. रामचंद्र भास्कर गोकुल पारख यांसी खलबत जाले. कचेरी बरखास्त केली. गुंड याजला मुलामानसासुधा अंगावरील वस्त्राणे बाईनीं मेवती लावून काढून देविले. ते पाई चालता सायंकाळीं शहरांत गेली. दाभाडे याची स्वारी सिकारीहून खाली आली शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad reports the fighting between the English and the Gurkhas. The apathy of Daulatrao in the Nepal war is also referred to therein.*

7289

No. 306] [14-2-1815

पौ छ २० रोवल सन खमस

**श्री**

महाराजांचे शेवेशीं आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गाईकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ ४ माहे रबिलोवल मुक्काम लष्कर नजीक ग्वाल्हेर येथें शेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीजा बहादूर रोज गुदस्त प्राथ:काळीं मुखमार्जन जाले. मीरो हरि माधवराव गुरुजी यासी चार घटिका सिलेदाराकडील व पागाकडील खर्चाचें बोलणे जाले. गोरखी याचे जिल्ह्यांत कोणी अख्तर न्हानचे संस्थानांतून तीन कोस पुढें घाटावर गेला. तेथें गोरखी यानीं लढाई घेतली. तीन कोस मारीरी न्हानचे तलाव-परियेंत मारीत आणिले. माणूस बहुत कट्टा जाहले. रुद्रपुराकडे लढाई जाली. तिकडील घाट इंग्रेजाणी फत्ते करून घेतला. जर्णेल होडर परबल येथें गेला. पुढें आगऱ्यास येन्हार. दिल्लीस जावयाचे ठरले नाहीं म्हणोन वर्तमान आहे. सहा घटिका दिवस येतां स्मश्रु करावयास बसले. दीड प्रहर दिवस राहता स्नान करून पोशाख घेतला. रामचंद्र भास्कर मीरो हरि आले त्यास सांगितले, शेटजीस वराता द्यावयाच्या त्याजविषयीं येथें वकील आहेत, त्याज-कडून शेटजीची खातरी दुकानीं नेऊन करूण देवावी. त्याजवरून कोटेवाले मंदोसरवाले भुसकुटे बापूजी राव सिंदे याजकडील वकिलास बोलाऊन, रामचंद्र भास्कर वकिलास घेऊन, शेटजीचे दुकानीं गेले. तेथें गोकूळ पारख यासी बोलणे जाले. पारखजीनें चिठी लिहून बलवंतराव कारकून यास वाड्यात पाठविलें. त्याणें चिठी दिल्ही ते पाहून सेवा शामजी यास बोलणे करून दुकानीं पाठविलें. चार घटिका बोलणें जाले. एवजाविशीं वकीलाणीं खातरी केली; परंतु रुबरू वकील पारखजी याचे बोलणं व्हावे असे ठरून आपले ठिकाणी गेले. बापू घारपुरे नागपूरवाले श्रीधर सदाशिव येशवंतराव सिवाजीकडील आले. त्याजला सांगून पाठविले, आज कचेरी नाहीं, तुम्ही जाणे. बुगाजी जामदार यास ताकीद केली. दोन पोशाख बसंती रंगाचे रंगवून ठेवणे. दोन घटिका लोकास हाश-विनोद करून, दोन घटिका दिवस राहता वाड्यात गेले. शेवेशीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad reports the fighting between the English and the Gurkhas and narrates the doings of Daulatrao Sindia.*

7290

No. 307]                                                                                    [22-2-1815

पैवस्ती छ २९ रबिलोवल सन खमस
अशर माघ मास

**श्री**

माहाराजाचे शेवसी · · आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ १२ माहे रबिलौवल मुकाम लस्करनजीक ग्वाल्हेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलिज्याबाहादूर राजगुदस्त प्रात:काळी मुखमार्ज्येन करून या(द)वराव बिनीवाले यास सांगितलें, भोजनास तेरा पितर सांगणें, माहादजी शिंदे यांचे श्राद्ध आहे. कर्नेल ज्यान बाप्तिस याजकडून थैली आली. पेंढारी दरजमानदार यास सांगितलें आडीच लक्षाची जागीर तुम्हास देवितों; दोड हजारानें चाकरीस असावें. पेंढारी यांनीं उपद्रव करूं नये. तें त्यांचे विचारास न येतां कूच करून मल्हारगडाकडे गेले. रामदीन निसबत होलकर मेवाडांतून माळवे प्रांतीं खाचरोदचें राणांत येऊन च्यार गांव लुटिले म्हणोन वर्तमान आहे. मदुबेग यानें दोन बग्गीचे घोडे मजविले, ते बग्गीस जुंपून आणिले. बग्गी फेरून पाहिली. साहा घटिका दिवस येतां श्राण जालें. उपाध्ये दादा शेंडे व रावजी शेंडे खंडबावा शास्त्री पंचवीस तीस ब्राम्हणमंडळी आली. श्राद्धसंकल्प होऊन पिंडाजवळ दक्षणा येक मोहोर उपाध्ये यास दोन मोहोरा वीस गोप्रदाणें याची दक्षणा दर पांच रुपयेप्रमाणें तेरा ब्राम्हणाची पादपूज्या केली. त्यास दर पांच रुपयेप्रमाणें दक्षणा दिल्ही. शिरमंडळी यांस पांच च्यार रुपयेप्रमाणें भूयसी पांच रुपये दिल्हे. पितर बोलाऊन सवादोन प्रहरां भोज्येन जालें. बाळाराम भाईशेट यांचे येथें लष्करचे वाणी यांजला भोज्यन जालें. रामचंद्र भास्कर मेरो हरि दरगदार वकीलमंडळी त्याचें येथें गेली. जर्नेल मथुराहून फत्तेपुरास गेला. गोरखीयाचे जिल्ह्यांत गोरखे इंग्रेज यांची लढाई देहेन्यावर जाली. इंग्रेजाची शिकस्त होऊन हाजार बाराशे माणूस ठार जालें. आंतरवेदांतील लोक खेडा वगैरे माहालचे ठेऊन लढाईस पाठविले होते, त्यांस पुढें करून मारविलें. लढाईतून जगून आले ते घोडीं व हातीयारें सोडून पळून गेले. भरतपूरवाला जाट रणधीरसिंग याणें डेरा बाहेर केला. जर्नेलाचे भेटीस जान्हार म्हणोन वर्तमान आहे. मानकरी व बाळोजी कुंजीर आले. बाळोजीबावा यासी येक घटिका बोलणें होऊन आपले ठिकाणीं गेले. मानकरी यासी च्यार साहा घटिका भाशन होऊन खाली तोता याजकडे येऊन सायेंकालपरियेंत तिरंदाजी जाली. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer reports the war between the English and the Gurkhas. The movements of the Pindaris and the daily happenings at the court are also mentioned therein.*

No. 308] [24-2-1815

पौ छ ३० रोवल फालगुन
शुा १ सन खमस अशर

श्री

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना तागायत छ १४ माहे रबिलावल मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादुर रोज गुदस्त च्यार घटिका रात्रीं उठून स्वारी सांगून श्नाण केलें. पोशाख करून दोन घटिका रात्रीं स्वारी निघाली ते चुनीलालचे बागांत गेली. तेथें लोक उभे करून बारा पंधरा स्वागणें सिकारीस गेले. येका घटिका दिवस येतां सौभाग्यवती बायेजाबाई यांची स्वारी बागांत गेली. स्वयंपाकाची तयारी करविली. राजश्री त्रिंबकराव दाभाडे यांची स्वारी साहा घटिका दिवस येता भोज्यन करून आंत्रीकडे सिकारीस गेले. आलिज्याबहादुर यानी प्रहर दिवसा दोन खरगोस मारून बागांत पाठविले. पावणेदोन प्रहरा बागांत येऊन भोज्यन जालें. प्रहर दिवस राहातां स्वारी सिकारीस गेली. गोकुल पारख याचे येथें मोरो हरि जाऊन दोन घटिका बोलनें करून, पारख व मोरो हरि रामचंद्र भास्कर यांचे येथें आले. पटाचे खर्चाचें बोलणें करून, सायंकाली आपले ठिकाणी गेले. सिकारीहून स्वारी परभारें आपले बागांत दोन घटिका दिवस राहातां आली. बाईस वर्तमान समजतां त्यांची स्वारी या बागांत आली. जर्णेलचे भेटीस इस्तेरची साहेब येथून गेला, त्याची भेट किरावलीस जाली. त्याचे विद्यमान्य धवलपूरवाला राजा भेटला. येकवीस मोहार नजर केली. आक्रा किस्त पोशाख येक किस्त जवाहीर दोन घोडे दिल्हे. भरतपूरवाला जाट करावलीचे मुकामीहून भेट घेऊन गेले. जर्णेल कूच करून छ १२ मिनहूस आग्र्यास गेला म्हणोन वर्तमान आलें. कर्णेल ज्यानबतीस नाहारगडानजिक आहे. दोस महमद पेंढारी मृत पावल्याचें वर्तमान त्यास गेले. त्याजवरून कर्णेल याजबरोबर त्याचा भाऊ व पुत्र आहे त्याचे येथें जाऊन दोघांस शेले निवटे देऊन घटिका शतवन केलें. च्यार कपणी च्यार तोफा दोन रिसालदार दोस महमदचें बुनगें आणावयास भेलशाकडे पाठविनार म्हणोन पत्र आलें. उमरावतीकडे पलटणें होतीं ते भुपालास आथवा गोरखी याचे लढाईस जावयाचा इरादा होता. ते पलटणें पावलागडाकडे गेली म्हणोन वर्तमान आहे. स्वारी बागांतून दोन घटिका रात्रीं आली. सरकारची फौज पंचवीस तीस हजार तीन पलटणें तोफखाना याप्रमाणें सरंजाम त्रिंबकजी पाटील डेंगले याचे बराबर देऊन, या प्रांतीं पेंढारी याचे पारपत्यास रवाना करनार. त्याजवरून

7292

येथील सरदारास विचार पडत आहे. फौज रेवानजीक येतां कलज्यावरी आसली ते वर्तमानावरून येथें कितेकाचे माणस सरकार चाकरी करावी, फौजेचा मार्ग लक्षीत आहेत. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad reports the anxiety felt by Daulatrao at the news that the Peshwa was fitting out an expedition under Trimbakji Dengle to crush the Pindaris. Dost Muhammad, a leader of the Pindaris, is reported to be dead.*

---

*No. 309*] [*25-2-1815*

पौ छ ३ राबीवर सन

खमस अशर मया तैन

श्री

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निमबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ १५ माहे रबिलावल मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादुर रोज गुदस्त मुखमार्ज्येन जाले. गंगारूप बालाबाई देशमुख सितोळे याणी राधाकृष्णाच्या मूर्ती केल्या. त्याचें लग्न आरंभिले. वेदमूर्ती बालंभट बाईकडील आश्रित याजकडे कृष्णाची मूर्ति दिल्ही. राधेची मूर्ति आपण ठेविली यासंमंधें बाईस गडगनेर आलिज्याबहादुर याणी केले. बाज्यासभोवती जागा नीट करून रोशनाईस तारांगणें व आतसबाजी केली. नदीस आगाडीवर डेरा देविला. जर्णेल आगरेनजीक तासगंज येथें मुकाम आहे. तोफ येक धारली पडले आहे, ते पाहावयास गेले. तिचें तोंड व लांबी मोजून वजनाचा आजमास विच्यारिला. आठ दाहा मुकाम तेथें होणार. कर्णेल ज्यान बतीस याचे लस्करांत बक्षीकडील सिलेदाराने बाहेर जाऊन येक बाइको लुटली. ते लस्करांत कर्णेलाकडे आली. त्याणे चवकस करून तो स्वार ठिकाणी लाऊन आणिला. तीन लाकडें रोऊन त्यास सिलेदार बांधून बाइकोचा लहंगा व सोन्याची गरशेळी नेली होती, ती त्याचे गल्यांत बांधिली. घोडे पागेस लाविले. करीमखां व दोस्त महंमद व छितु पेंढारी या त्रिवर्गास दरजमादारास आडीच लक्षाची जागीर द्यावी, त्याणी दिडा दिडा हाजाराणें चाकरी करावी. येशवंतराव सिवाजी याजकडील प्रगणें जावद हिंदुराव घाटगे यास देऊन, ठाणें बसवावयास कर्णेलास आज्ञा होती, ते राहित करून त्यांचे त्याजकडे जावद ठेविली. पेंढारी मान्य करीत नाहीत. कुंभेलनेराकडे सादडीचे जिल्ह्यांत आहेत. तिकडे नजीक बासवाडा आहे. येशवंतरायाचे आसऱ्यावर आहेत. गंगाधर विठल मंदोसरवाले बोलणें करितात म्हणोन वर्तमान आहे. च्यार घटिका दिवस येतां श्नाण करून, पोशाख घेतला.

सौभाग्यवती बायेजाबाई बालाबाईकडे व चिमणाबाई शहरांत सेनापतीचे मातुश्रीस आणावयास गेल्या. प्रहर दिवस येतां बालाबाईची स्वारी वाद्येघोश करीत मिरवत आली. सेनापति मातुश्री सहित दीडा प्रहरा आले. बायाकडे कलवंतनीचा नाच व श्वाणें जाली. सवा दोन प्रहरां बालाबाईकडील व सेनापतीकडील मंडली-सहित भोज्यन जालें. रामचंद्र भास्कर, मोरो हरि, भास्कर बलाल पागनीस, बालोजी बावा कुंजीर आले. गोकुल पारख याजला बोलाऊं पाठविलें. त्याज-कडून कारकूण बलवंतराव आला. त्यानें सांगितलें. शेटजीकडील श्रीजीचा पुजारी येसोबा सोरटी उज्यनकर याची कन्या जयराम पांडुरंग फरासखाणे याचे पुत्रास नेमिली. तो आज आपले येथें येऊन चवथाचे साक्षीणें निश्चये होणार म्हणोन येणे होत नाहीं. दोन घटिका पागनीस मोरो हरि रामचंद्र भास्कर यासी बोलणें होऊन मंडली दरगदार वकील पारखाचे येथें गेली. साक्ष विडा जाला. बालाजी सखदेव यांचे चिरंजिवाचे लग्न जालवणास माधवराव याचे कन्येमी करावयास गेले. रामचंद्र भास्कर याचे चिरंजिवाचा शरीरसंमध गोपालराव रघुनाथ याचे कन्येसी करावा, हें उभयपक्षीं येक मास बोलणें. हलीं तो शरीर-संमध चिटनिसाकडून रहित जाला. सबब रामराव विठल श्रींगोंदेकर याचे कन्येचें बोलणें ठरलें. रामराव याणें देसी आपले घरीं पत्र पाठऊन मुलें मणुश बोलाविली तें आलियावर लग्न होणार. च्यार घटिका रात्रीं श्रीजीची मूर्ति श्रीमंत पूज्या करून नदीस डेरा दिल्हा तेथून मिरवत घेऊन आले. जानवसा पोतनिसाचे गोटांत डेरा दिल्हा. बाईची स्वारी प्रहर रात्रीं वस्त्रें दागिणें घेऊन आपले वाड्यांत गेली. शेवसीं श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer states that Pindari leaders Karimkhan, Cheetoo, and Dostmuhammad are offered Jahagirs by the English to win their friendship. The daily happenings in the court are also mentioned including the marriage of the images of Krishna and Radha.*

---

*No. 310]* *[27-2-1815*

पौ छ ३ राखर सन खमस

फालगुन

श्री

महाराजांचे शेवेशी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गाईकवाड निसबत त्रिंकबजी पाटील डेंगलं विज्ञापना. तागायत छ १७ माहे रबिलौवल मुक्काम लष्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलीजाबहादूर रोज प्राथःकाली मुखमार्जेन केलें. माधवराव गुरुजी मोरो हरि फडनीस आठ दहा मानकरी येऊन रामराम जाला. मोरो हरि बोलणे करून

आपले घरास गेले. मुनसीनें सांगितले जर्णेल तासगंजास आहे. नामी जागा आहेत. तेथें व किल्ल्यास जाऊन जागा पाहतात. जागजागे *छावण्यातील गोरे सर्व त्याजपाशीं जमा जाले आहेत. लाहुरास रंजितसिंग सीक याजकडे शहाचा वकील आहे. त्याचे यांचें बोलणे सलुखीचे होऊन, जावयास निरोप मांगितला. त्यास उत्तर केले चार दिवस राहून आम्हाकडील वकील घेऊन जाणें. तूर्त त्यास ठेवून घेतले'म्हणोन एखबार आली. सौभाग्यवती रखमाबाई व बायजाबाई व चिमणाबाई यांची स्वारी गंगारूप बाळाबाई याचे येथें लग्नाचे ममारंभास गेली. चार घटिका दिवस येता स्नान करून दहा घटिकांत भोज्येन जाले. कारभारी याजला बोलावणी पाठविली. बालाराम भाईशेट गोकुल पारख आले. यासी त्यासी बोलणे जाले. कारभारी वकीलमंडली मानकरी येऊन कचेरी जाली.' प्रगणे पानव्याहार प्रांत मालवे येथील जमिदाराची घरं संभाजी आंगरे याणी लुटली. सबब ते येथें मोरो हरि याचे विद्यमाने भेटून आपले वर्तमान जाहीर केले. मोरो हरि यांचे कर्ज आंगरे याजकडे देसी जावयास्तव घेऊन त्यास हसबंदीनें महाली ऐवज लावून दिल्हा तो न पावला, त्याजवरून प्रगणे मजकूर व नेवरी व राजगड हे तीन महालची जफ्तीची यादी सनंदा करावयास केली. तेथील ऐवज मोरो हरि याजकडे रदकर्जी आंगरे याजबदल लाऊन दिल्हा. बालोजीबाबा कुंजीर आले त्यांचे खानगीबावद खर्चास पंधरा हजार रुपये व आपा जगताप व सितोले येकूण पंचवीस हजाराच्या चिठ्या करून दिल्ह्या. गंगारूप साळूबाई सिंदे देसी जात आहे त्याचे खर्चास सत्रा हजार व त्याजबरोबर दहा बारा असामी लग्नास आली आहे त्याचे खर्चास कमजादा वीसहजार रुपयेच्या चिठ्या जाल्या. रामचंद्र कृष्ण सिवराम हरि (ना)तू याचे नांवें झांसीचे संस्थानची वस्त्रें कृष्णाजी आत्माराम याजपासी दिल्ही. कृष्णराव याचे नांवें पंचवस्त्रे सिरपेच कंठी घोडा त्याचे कारभारी कर्दाम गोपालराव त्यास साडेतीन वस्त्रे मुलाचे मातुश्रीस पातल शालजोडी काढून ठेविली. खानगी करनार आहेत. नागपूरवाल्याचे व होळकराकडील रविशंक्रमणाचे तील आले. ते थैल्या वकिलाणी आणोन दिल्ह्या. त्याची उत्तरं घ्यावयास चिटनीसाकडे सांगितले. रामराव फालके आमृतराव सिंदे वगैरे येक दोन सिलेदार यांचे कबज्यात चिठ्या करून दिल्ह्या. तुवार घार प्रांतसि चोर दोन धरिले ते मुम्याणे येथें पाठविले. पुन्हा चोरास मुम्याकडे लावून दिल्हे. त्यास पत्र लिहिले याची चवकशी करून पारपत्य कर्णे ते करावें. दोन घटिका रात्रीं कचेरी बरखास जाली. शेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad in communicating the daily happenings at the court of Gwalior reports that friendly relations have been established between the Shah of Kandahar and Ranajitsing.*

7295

No. 311] [28-2-1815

पौ छ ९ शाखर सन
खमस अशर मया तैन

श्री

माहाराजाचे शेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगळे विज्ञापना. तागाईत छ १८ माहे रबिलौवल मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असें विशेष. राजश्री दौलतराव शिंदे आलीज्या बाहादूर रोजगुदस्त प्रात:काळीं मुखमार्जेन जालें. मोरो हरि गुरुजी सखो शामजी पांच सात मानकरी येऊन रामराम जाला. मोरो हरि यांसीं येक घटिका बोलणें जालें. येशवंतराव शिवाजी याची व कर्नेल ज्यान बत्तीस याची लढाई भूपालाचे जिल्ह्यांत जाली. तेथें येशवंतराव याची शिकस्त होऊन कर्णेलाकडे लूट गेली, ते लिहून गंगाधर विठल मंदोमरवाले याजकडे दिल्ही; ते यादी येथें आली. कमजादा चाळिस लक्षाचा अजमास आहे, तो कर्णेलाकडून देवावा म्हणोन लिहिलें आहे. गोरखे याचे जिल्ह्यांत न्हाणहून इंग्रेज बारा पंधरा कोस चोर मार्गानें चढून गेले. ते गोरखीयास समजतां फौज पाठविली, त्यांनीं मारीत माघारीं आणिले. दोन गोरे च्यार सुभेदार बेच्याळीस लोक धरून घेऊन गेले. माणूस फार ठार जालें म्हणोन वर्तमान आहे. साहा घटिका दिवस येतां स्मश्रु करावयास बसले. सौभाग्यवती रखमाबाई, बायेजाबाई व सेनापति याजकडील सर्व बाया गंगारूप बाळाबाई देशमुख यांचे तेथें श्रीजीचे लग्नांतील समारंभास गेली. गोकुळ पारख यांचें घरीं शिलेदार मंडळपैकी भोज्येन करावयाचें राहिलें होतें त्यांस भोज्येनास बोलाविलें. साहा घटिका दिवस राहातां तैलाभ्यंग करून स्नाण केलें. पोपाख घेतला. सायेंकाळपरियेंत मानकरी लोकांस बोलणे हाशविणोद जाला. खाली तो त्याकडे मानकरी यानी रोशनाईखालीं तिरंदाजी केली. च्यार घटिका रात्रीं बाळाबाई यांचे येथून बायांची स्वारी आली; नंतर उठून जनानखाण्यांत गेले. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The writer Krishnaji Gaikwad gives an account of a battle between Yashwantrao Shivaji and Col. Jean Baptiste in the district of Bhopal. The daily happenings at the court of Gwalior and the activities of the Gurkhas are also mentioned.*

7296

No. 312] [February 1815

श्री

यादी कृष्णाजी गाईकवाड यांजकडून अखबारीं पत्रें आलीं त्यांतील सारांश. मुा सन खमस

१ छ १५ रबिलौवल जर्णेल आगऱ्यानजिक तासगंज येथें मुकाम आहे. थोर तोफ येक तेथें आहे, ती पाहून वजनाचा अजमास केला. येशवंतराव शिवाजी याचे आश्रयानें पेंढारी बासवाड्यानजीक जिल्ह्यांत आहेत. कलम.

१ छ १६ रबिलौवल बाळाजी कुंजर देशीं जाणार, त्याजबराबर पांच सात आसामी शिलेदार जाणार. त्यांस खर्चास देण्याविशीं गोकुळ पारख यास आज्ञा केली कीं त्यास जाण्याची जलदी याजकरितां खर्चाचा बंदोबस्त करावा. कलम.

१ छ मजकूर शिवराम हरि झांसीवाले यांचे नातू रामचंद्र कृष्ण यास ते संस्थानाचीं वस्त्रें कृष्णाजी आत्माराम वकील यांजबरोबर स्वार वगैरे लवाजमा समागमें देऊन रवाना होणार. कलम.

१ छ १७ रबिलौवल
जर्णेल तासगंजास आहेत, तेथील जागा नामी आहे. तेथें जागां जागांतील छ्यावण्यांतील गोरे जमा जाहाले आहेत. कलम.

१ लाहुरास रंजितसिंग शीख यांजकडे शाहाचा वकील आहे. त्यांचीं व यांचीं सलुखाचीं बोलणीं होऊन निरोप मागितला. त्यास च्यार दिवस राहून, आम्हाकडील वकील घेऊन जावें म्हणून सांगितलें. कलम.

१ बाळाजी कुंजर याचे रवानगीबद्दल खर्चास पंधरा हजार रुपये व आपाजी जगथाप व शितोळे मिळोन येकूण पंचवीस हजार रुपयांच्या चिठ्या दिल्या. कलम.

---

३

१ छ १८ रबिलौवल

१ येशवंतराव शिवाजी व कर्णेल ज्यान बत्तिस यांची लढाई भूपाळच्या जिल्ह्यांत जाहाली. येशवंतराव शिकस्त होऊन कमज्यास्त चालीस लक्षांची लूट जाहाली. कलम.

7297

१ गोरखी याचे जिल्ह्यांत न्हाणपुराहून इंग्रज बारा पंधरा कोश चोर मार्गानें चढोन गेले. तें गोरखी यांस समजतांच फौज पाठऊन इंग्रजाचे लोक मारीत माघारें आणिले. दोन गोरे व च्यार सुभेदार व बेच्यालीस लोक धरून नेले व माणूस फार कामास आलें.

---

२

१ छ २२ रबिलोवल.

१ शिलेदार यांचे रोजमरियाचा पट होऊन, साठ सत्तर लक्ष रुपयाची परवानगी जाहाली. दोन तीन रोजांत ऐवज पटऊन देऊं म्हणऊन सांगितले. कलम.

१ पेंढारी यांजकडील मजकूर बोलण्यांत आला. करीमखां व छितु व दोस्त मो या तिघा जमातदारांस पांच पांच लक्षाची जहागीर द्यावी. पैकीं भोसले पांच लक्ष, व शिंदे पांच लक्ष, व होळकर पांच लक्ष. येणेंप्रमाणें माहाल नेमून द्यावे. तात्या आळेकर भानपुऱ्यास राहिले, ते आल्यावर बोलणें होऊन नेमणूक करून देणार. कलम.

---

२

१ छ २३ रबिलोवल कर्नेल आगऱ्याहून मेडपुऱ्यास गेले. तेथें सिमरूची बेगम व कानपूरवाला गोरा व येथील वकील इस्तरची बरोबर आहेत, त्यांणी निरोप मागितला. त्याजवरून उदईक निरोप देतों म्हणून बोलवा आहे. कलम.

१ छ २५ रबिलोवल पीलखान्यांतील हत्ती आणोन पैकीं दोन हत्तिणी पसंत केल्या व आणखी खरिदी करून आणावयास आज्ञा केली. राजश्री बाळाजी कुंजीर त्याजबरोबर सरकारांत द्यावयाबद्दल रवाना करावयाचा विचार आहे. कलम.

¶*The summary of news-letters written on several occasions by Krishnaji Gaikwad in connection with the activities of the Gurkhas, the Pindaris, the Sikhs and the English, is given in this paper. A settlement with the Pindaris by grants of land has been put forth.*

7298

*No. 313*] [*18-3-1815*

पौ छ २२ राखर

.. खमस फालगुन

**श्री**

माहाराजाचे सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायेकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले विज्ञापना. तागाईत छ ६ माह रबिलाकर मुकाम लस्कर नजीक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादर रोजगुदस्ता प्राथःकालीं मुखमार्ज्यन जालें. आत्माराम नारायण वकील यानें विनंती केली. आज चाचनी साहेब भेटीस येन्हार आहेत. त्यास उत्तर केलें दोन प्रहरा बोलाऊं. चोपदार पाठऊं. तात्या आलेकर निसबत होलकर हे येत आहेत. मुकाम बन्हाईस जाला म्हणोन कललें. त्याजला आणावयास कृष्णाजी आत्माराम दिवान पुढें पाठविले. स्वार बलम भालकरी जासूद नेमून समागमे दिल्हे. दिलीचें येकबार आलें. जर्णेलाकडून च्यार गोरे आले ते मटकनसाहेब यानें बातशहास भेटविले. येकाणें पंधरा मोहोरा, दुसरियाणें पांच दोघांनी च्यार च्यार मोहोरा नजर केली. येक घटिका बेठक होऊन येकास पांच वस्त्रें सिरपेंच कंठी ढाल तरवार, दुसरियास पांच वस्त्रें सिरपेंच कंठी तलवार, दोघांस च्यार च्यार वस्त्रें दिल्हीं. तरवारीची नजर दोन दोन मोहोरा केल्या. बिलासपुरीं गिलेस्पीसाहेब[+] आहे. तिकडे लढाईचा प्रसंग गोरखी यासी आहे. येक लढाई बरोबरीची जाली. च्यार घटिका दिवस येतां श्नाण करून बारा घटिकांत भोज्यन जाले. विठोबा पागानिसाकडील कारकूण यास बोलाऊन च्यार घटिका बोलणें जालें. त्यास सतबा डुबल हुजऱ्या याजला देसावर आणावयास रवाणा करनार लोकाची व पागाची नेमणूक करून साहा महिण्याचे खर्चास आगाऊ देन्हार. चाचनीसाहेब यास बोलाऊं गुलमहमद चोपदार पाठविला. कारभारी मानकरी येऊन कचेरी जाली. आंबाजी घाटगे याजकडील त्याचे मावसबंधु व शालक देशीं जातात. त्याजला निरोपाचीं वस्त्रें दिल्हीं. तीन घटका दिवस राहतां इस्तरची साहेब व चाचनी साहेब व आणीख च्यार गोरे आले. त्याजला आणावयास पंधरा वीस हात पुढें खंडेराव गोपाल याजला पाठऊन आणिले. अर्धी ताजीम देऊन डावे बाजूकडे गाशावर जागा दिल्ही. चाचनी साहेब यानें बोलनें केलें, इस्तेरची साहेब याजसमागमें सयं(ह)ल करावयास आलों. यानी सांगितलें आपली भेट घ्यावी, त्याजवरून आज आपले भेटीचा लाभ जाला. पावघटिका बैठक होऊन चाचनी साहेब व बनसी साहेब यांजला पांच वस्त्रें सिरपेंच कंठी दिल्ही. इस्तेरची साहेब याणें उत्तर केलें आम्ही बेहेटापावतों

+ Gillespy.

बराबर जाऊं. विडे आतर गुलाब देऊन मार्गस्त केलें. मागें कचेरी बरखास जाली. दारकोजी राव पाटनकर याची चिटी येक लक्ष तीस हजाराची जाली. तीस हाजार सावा महिण्यांत द्यावे; ते येथें कोन्हाचें कर्ज बालगून नाहींत. येक लक्ष पटलेने दुकाणचे देणे वारून तीन हजार रुपये बाकी निघाली, ते घेऊन आले. बाबाजी पाटनकर याची चिठी तीन लक्षाची जाली ते दुकाणी बादाबाद होऊन ऐसी हाजार रुपये कर्ज माथी राहिले त्याचे तगादे होत आहेत. आंबाजी घाटगे यास साहा लक्ष रुपये चिटी व दोन लक्ष रुपयेची गोकुल पारख यानें कर्ज दिल्हे. येकूण आठ लक्ष रुपये जाऊन आडीच तीन लक्ष रुपये कर्ज राहिले. ज्यास ऐवज पावला त्याची गत ऐसी आहे. लोकाचे पदरीं राहात नाहीं. सेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Krishnaji reports that some English officers paid a visit to Daulatrao Sindia, when a mutual exchange of presents took place.*

---

*No. 314*] [*Early 1815?*

श्री

पुरवणी रामराम विनंती. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावे विशेष. इकडील मजकूर :

१ दिल्ली येथील छ ९ मोहरमचा मजकूर तरी खजानची याणे येऊन अर्ज केला कीं वीस उंट खज्यान्याचे भरून सिंगपुराहून आले ते येथें येऊन दाखल जाहाले. नबाव मीरखा याचा खलिता आला. त्यांत मजकूर कीं जनरेल लोणी अखतरसाहेब आम्हासी विघाड करणार म्हणोन ऐकिण्यांत येते. त्यास तुमचा व आमचा असा करार आहे कीं काये याप्रमाणें लिहिले होते. त्याजवरून भोसले यास लिहून पाठविला कीं तुम्ही मीरखा याचा जनरेल साहेब याचा मिलाफ करून द्यावा कलम.

१ गौरनेल साहेब याजकडील छ ७ मोहरम मुक्काम कोच येथील वर्तमान खबर आली कीं, करनेल डड साहेब हे कनूजपूर येथून कूच करून भेटीस येणार. त्याजबरोबर चार पलटणे व दोन रजबना आहेत, व पेंढारी याचा मुक्काम बरवासागरनजीक झासी पांच कोस येथें आहे. त्याजवरून चार रजबानीं व सोळा तोफा पेंढारी याचें तोंडावर पाठविल्या. कोतवा-

लानें येऊन अर्ज केला कीं काल रात्रीस आडीचशें माणसे एकाएकीच मृत्यु पावली. त्याजवरून हुकूम जाहाला कीं आजपर्यंत किती माणसे मेली याची यांद करून अणवावी, त्याजवरून कोतवाल याणी मोजणी करून सांगितले कीं, एका महिन्यांत सहा हजार चोपण मानसें मेली. येणेप्रमाणें लष्करांत मरी बहुंत आली आहे. कलम.

१ ज्यान बत्तिसें याजकडील वर्तमान छ ९ मोहरम सलाबतखां किल्लेदार गढे कोटेवाला याणी आर्जी पाठविली त्यात मजकूर कीं इंगराजाचे एक पलटण येथून दोन कोसावर येऊन पडले आहे. हे वाचून कर्णेल ज्यान बत्तिस याणी मेजर हरतुन साहेब यास लिहून पाठविले कीं पत्रदर्शनीं दोन पलटणे इंग्रजाचे मोकाबल्यास पाठवावी; आणि तुम्ही आपलेकडून त्यासीं खलश करूं नये. कदाचित त्याणी खलेश केल्यास, त्यासी समजून द्यावे. इतकीयांत वर्तमान आले कीं पेंढारीयासी व इंग्रजाचे पलटणासी लडाई जाई जाहाली. पेंढारी याणी दोन पलटणे बुडविली व पांच सहाशे पेंढारीहि गारद जाहाले. येणेप्रमाणें खबर आली. कलम.

१ आंग्रे येथील छ ९ मोहरमचे वर्तमान तरी कानपुराकडून दोन पलटणे येऊन दाखल जाहाली. त्याजवरून कोतवाल यास बोलाऊन ताकीद केली कीं चालीस लकडे पलटणांत नेऊन द्यावें. धवलपूरपर्यंत पोहचाऊन मागरि येतील. दहा हजार मण आटा गवरनेलसाहेब याजकडे रवाना केला. कलम.

१ येथील मजकूर नवल विशेष ल्याहावा असा अर्थ नाहीं. नित्यशाहा सिलेदारचे वगैरे खर्चाची मात्र खलबती होतात. वरकड कोणेताहि इरादा दिसत नाहीं कीं तो ल्याहावा. आपण म्हणत असाल कीं, नित्यशाहा सावक दस्तूर वर्तमान आहे म्हणोन लिहितां, त्यास नवल काहींच वर्तमान दिसण्यांत येत नाहीं कीं ल्याहावे. कांहीं दिसण्यात आल्यास लिहून पाठवूं. कलम.

--

९

सदरहू कलमे लिहिली आहेत. मनन होऊन उत्तर यावे. रवाना छ १६ जिल्हेज बहुत काय लिहिणे. लोभ करावा हे विनंती.

¶*The news received from various quarters is reported in this paper. A battle between the forces of the English and the Pindaris is reported to have taken place with the result that 600 Pindaris were killed. The date of despatch, viz., 16 Jilhej is not consistent with the dates mentioned in the body, viz., Muharram.*

No. 315] [About 18-5-1815 ?

श्री

वडिलाचे शेवेसी अपत्यसमान कृष्णांजी नाईक गायेकवाड दंडवत विज्ञापना. तागाईत छ ७ माहे शाबान मुकाम लस्करनजीक ग्वालेर येथें बालकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्यांबहादूर रोज गुदस्त प्राथःकाळीं मुखमार्ज्येन जालें. रामराव फालके, सखो शामजी, आपा चिटनीस, गणपतराव राजाराम निसबत विंचुरकर आले, रामराम होऊन फालके याणीं विच्यारिलें, आज आंबाजी घाटगे याचे येथें जावयाचा बेत आहे, त्यास स्वारी जावयाची मर्जी आहे कीं नाहीं. त्यास सांगितलें भोज्यन उत्तर सांगावयास येईल. राजश्री सेनापति येशंवतराव दाभाडे शहरांतून आले म्हणोन हुजऱ्याणें वर्तमान सांगितलें. प्रहर दिवसा श्नान करून भोज्यन जालें निद्रा केली. प्रहर दिवस राहातां सौभाग्यवती बायेजाबाई व बाळाबाई मंडलीसहित सेनापतीचे वाड्यांत स्वारी गेली. निद्रा जाली यावर साहा घटिका दिवस राहातां मणिराम शेट बलवंतराव कारकूण आले. दोन घटिका मणिराम यासीं खलबत जालें. मोरो हरि माधवराव मुनसी आले. मोरो हरीस भाशन होऊन कर्णेल ज्यान वत्तीस याजकडील वर्तमान जाहीर केलें. त्याकडील पत्रावर पत्रें येतात कीं, फौज लष्कर रवाणा करावी. अण्याबा बक्षी पाठविले ते अद्यापि मगरुणीस आहेत. जेकब साहेब याचीं पलटणें गेलीं. त्यास दारूगोळा कर्णेलाणें दिल्हा. मुनसीणें दिलीची येकबार वाचली. मटकण साहेब बातशाचे येथें जाऊन, जर्णेलाचा खलिता दिल्हा. त्यांतील मजकूर आम्हीं येतों म्हणोन हिंदुस्थानांतील राजेरजवाडे हवालदील आहेत म्हणोन कललें. त्या सर्वांस पत्रें पाठवावीं कीं तुम्हांस चिंता नाहीं, सुखरूप असावें. त्यावरून बातशाचीं आज्ञापत्रें घेऊन राजेरजवाड्यांस पाठवावयाची आज्ञा घेतली. महमद इसव राजे बहादर सुभे निसबत मीरखां, याणीं पहिले भरतपूरचे पांच रुपये घेऊन, माघारीं गेले. ते पुन्हां येऊन तीन गांव भरतपूरचे मारिले म्हणोन वर्तमान आहे. शेवेसीं श्रुत होये हे विज्ञापना. येक प्रहर रात्रीं सौभाग्यवती चिमणाबाईस घेऊन बायेजाबाई वाड्यांत आल्या. नऊमास होत आले हे विज्ञापना.

¶*Krishnaji Gaikwad reports that at the instance of the British General the Mughal Emperor will soon issue a proclamation to the effect that the British power is well-disposed towards the princes in India.*

7302

No. 316] [22-1-1815 ?

श्री

माहाराजाचे सेवेसी आज्ञाधारक कृष्णाजी नाईक गायकवाड निसबत त्रिंबकजी पाटील डेंगले . विज्ञापना. तागाईत छ १० माहे सफर मुकाम लस्कर-नजिक ग्वालेर येथें शेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. राजश्री दौलतराव सिंदे आलिज्याबहादुर रोजगुदस्त प्राथःकाली मुखमाज्येन जालें. च्यार घटिका दिवस येतां श्नाण जालें. • गंगारूप येमुणाबाई सिंदे यांचे वर्षश्राध्ध आहे, तो श्राधविध केला. तेरा ब्राह्मण यांचें पूज्यन करून पांच पांच रुपये दक्षिणा दिल्ही. दोन गोप्रदानें दिल्हीं. याजकडील उत्तरकार्य महादजी सिंदेपासून आनंदराव सिंदा आहे त्याजकडून करवीत आहेत. त्याजला येक धोत्र-जोडा दिल्हा. तेरा पितर बोलाऊन पावणेदोन प्रहरां भोज्यन जालें. रामचंद्र भास्कर, आत्माराम सिवराम, बालाराम भाईशेट दरगदार आले. गोपाळराव रघुनाथ यांचे चिरंजीव खंडेराव गोपाल याजला बोलाऊ पाठविलें. बापू चिटनीस व कृष्णरावाचे चिरंजीव ऐसे त्रिवर्ग आले. रामराम घेऊन ताजीम देऊन जागा घेतली. बापू चिटनीस यांस बोलणें जालें. कृष्णराव व गोपाळराव दोघांची हे दोन्हीं मुलें, लेकुर वयें आहेत. तुम्हीं आबांचे चिरंजीव, आबापासून आज-परियंत येकचित्तें चालविलें; आतां वडिलपण तुमचे माथां आहे. तुम्हीं त्रिवर्ग-बंधू आपले वडिलाचे चालीप्रमाणे राहून, येकमेकास शुधचित्तें आसावें. सरकारांत तुमचा आगतेवाद आहे तो आहेच. खंडेराव गोपाल याजला पांच वस्त्रें सिरपेंच कंठी व समसेर ढाल हाती घोडा हे चारी खाशांतील उत्तम दिल्हीं. कृष्णराव याचे मुलास शेलापागोटें देऊन विडे दिल्हे. रामराम करून निघाले. ते त्रिवर्ग बंधू गंगारूप बालाबाई देशमुख सितोले यांचे येथें गेले. त्यांणी शेलापागोटें दिल्हें. तेथून सौभाग्यवती बायेजाबाई याजकडे गेले. त्यांनी विडे पाठविले. ते घेऊन आपले ठिकाणी गेले. मुनसीनें येकबार आणिलें. कर्णेल ज्यान बतीस उज्येनीहून बडनगराकडे गेला. हिंदुस्थानचें वर्तमान जर्णेल मेरटेंस आला आहे. रेवाडीस येऊन दिलीस येन्हार. बातशाचे येथें खुरसी द्यावी असे ठरलें. दिलीस आलीयावर येथून इस्तेरची साहेब जान्हार. इस्तेरची साहेब याजला गणेश राजाराम निसबत विंचुरकर याणें मस्तुन्याचे ठाण्यांतील तोफ धातूची च्यार हात लांब दिल्ही. तोफ चांगली आहे. श्रीमंत राजश्री + अमृतराव साहेब यांचे व इंग्रजाचे लोकांची कटकट कासींत हरवडी होते. सबब रावसाहेब यांजला चित्रकूट येथें आणावें म्हणोन इंग्रजांचा विचार जाला, ऐसे बोलतात. च्यार सहा

+ अमृतराव

घटिका पटाच्या यादा पाहून कचेरी बरखास जाली. सायेकाळीं चिटनिसानीं हाती बराबर कारकून देऊन माघारी पाठविला. कारकुणानें विनंती केली की च्यारी जिनसा आपण खाशापैकीं दिल्हात, त्यांत समसेर ढाल घोडा ठेविला. हाती आपले स्वारीचा पसंत आहे. त्याजवर आपलीच स्वारी जाली. त्याजवरून हाती कारखण्यांत पाठविला. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Krishnaji Naik communicates that the English think of removing Amritrao the Peshwa's brother to Chitrakoot as he was having frequent trouble with his guards at Benares. The letter mentions the high esteem in which Daulatrao Sindia held the three Chitnis brothers of Gwalior.*

---

*No. 317*] [*7-10-1798*

**श्री**

**राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री**
**बाबुरावजी दादा स्वामीचे शेवेसी**

पो। अंताजी गोपाल सां नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २६ रा।वर रविवार तीनप्रहर दिवसपावेतो आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री रत्नाकरपंत आपा सात आठशे स्वारानिसी छ २३ रा।वर गुरुवारीं नवलगुंदास येऊन शुक्रवारी हचिनालांवरून सवदतीस गेले. तेथे आहेत. वरकड फौज फुटोन गेली. सवदतीस फौज जमऊन माघारे फिरणार असे वर्तमान आहे. राजश्री सर्ज्याराव घाटगे करवीरकराकडील सातआठशे स्वारानिसी लडाईचे अगोधर आडुराकडे गेले होते. याचे कारण रा। रामचंद्रपंत भट नि।। सरसुभा पाच सातशे स्वारानिसी वरदा नदीपलिकडे काही पैका वसूल करावा म्हणोन गेले होते. त्यांजवर रत्नाकरपंत याजकडून त्याचे बदोबस्तास घाटगे याजब।। फौज रवाना जाहाली होती. त्या फौजेवर येजमान स्वामीकडून फौज रवाना झाली आहे. आपणास कलावे म्हणौन लि।। आसे बहुत काय लिहिणे कृपा लोभ करावा हे विनती. येजमान दादा याच्या जखमा चागल्या बऱ्या जाहाल्या. नाकावरील किंचित वोली होती. आठ पधरा दिवसी बरी होईल असे होते. त्यास घोड्यावर बसोन लडाईस गेले त्यासमई नाकावरील जखमेस हिसका बसला आहे. लवकरच बरी होईल. आपण काही चिंता करू नये. इकडून वरचेवरी पत्रे पाठवितो. लोभ करावा हे विनंती.

¶*Antaji Gopal communicates to Baburao Krishna the movements of the force under Ratnakarpant of Kolhapur and Sarjarao Ghatge near Nargund.*

No. 318] [29-7-1809

श्री

दरशादत सरदार खंडेराव नीळकंठ रास्ते हे श्रीमंत साहेबांच्या याद फरमाविल्यावरून तमाम किले व सरंजाम व जिला व परगाणे हाय वगैरे आपले येकनिष्ठपणें श्रीमंत साहेबाचे सरकारात मागती सुपूर्द करून आणि यांजकडे श्रीमंत साहेबाचा हरयेक लढा राहिला नाहीं, याप्रमाणे ठराऊन श्रीमंत बाहादूर ह्यांचा निरोप घेऊन हिंदु मुलकात आपले कामकाजाकरिता रवाना होत आहेत. त्यासी राव मारनिल्हे यांची ख्वायश ऐसी होती की कांहीं आपणास श्रीमंताचे सरकारातून गुजराण करायास्तव कांहीं नेमणूक व्हावी व श्रीमंत साहेबांच्या छायेत असावे परंतु ही गोष्ट आमलात न आली. ऐसियास हे पाहिले की सरकार फौज असार कुंपणी बाहादूरचे सरकारात ऐसे उमदे सरदार यांचे लायक कामकाज नाहीं हे ध्यानास आणौन राव मशारनिल्हे हिंदु मुलकात हरयेक सरकारात आपला बंदोबस्त जेथे बनून येईल तेथे करतील

इंग्रजी अक्षरांची सही सिका

छ १९ जाम्वर सन अशर मयातेन आषाढ वा॥ ३ कर्णेल साहेब याणी सरटिफिकेट करून दिले ते.

¶[*This certificate was given to Khanderao Nilkanth Raste by a British Officer.*

---

No. 319] [24-9-1825

श्री

साहेब मेहरबान दोस्तान मिस्तर
चापलीन बाहादूर यांसी

ॐ यशोदाबाई पेशवे पंत प्रधान सलम हू उपरी येथील खेरीयत लगायत छ ११ माहे सफर जाणून हमेषा कैफियत खुद लेहून दिल तजा करीत जाणे दिगर. ति॥ राजश्री बाबासाहेबाचे कृतीचे निवारणार्थ चिरंजीव व राजश्री गणपतराव नारायण श्रीवर्धनकर पाठविले. यासी चौकशी न करिता अट लाऊन ठेविले. मागाहून मुजरद जोडी पाठविली त्याचेहि उतर न दिधलें. आमचे येथील वर्तमान दो॥ गणपतराव गोविंद आवटी नारो आवट किलेदार किले रायेगड याचा बंधु त्यास आम्ही किलेहून निवालियाचे सविस्तर माहीत तो येथे आलियावर जो घेऊन आला त्याने त्यास हजार रुपये देणें कबूल केले होते.

7305

आम्हास रुपवत देऊन साक्ष घेणं मंजूर नाही सबब अ * * * पक्षात मिळोन तुफान उभे केले जाले त समर्थ अद्यापहि ईश्वराचे भय वागऊन ईनसाफावर लक्ष तुमचे पुरल्यास जो इकडी प्रतिवादी त्याचा लेख घेऊन चौकसी जाली. यास हीच इत्सा ठेऊन वकील जोडी व हाली हे पत्र पाठविले आहे. याजवर आजपावतो वहिवाटाप्रमाणेच असले तर आम्हास आमचे लोकाचा भरवसा तिलशा नाही जाणून उतर दिसेस कूच करून गेलो. परंतु तुमचे पत्रोतराची आपेक्षा आहे. बरखुरदार (?) गणपतराव नारायण श्रीवर्धनकर याचे नावेचे पत्र त्यास पावते होऊन जबाब त्याचा आला पाहिजे. दराज काय लिहिणे हे किताबत.

¶*The pretender of Yeshadabai expresses her surprise to find Ganpatrao Narayan being arrested by the English. She also explains to Chaplin why she has proceeded towards North.*

---

*No. 320*] [*19-8-1825*

पा छ ३० माहे अगष्ट सन १८२५ इसवी तरजमा होऊन मुंबईस बडे सााकडे रवाना जाहली आहे जबाब जरूर नाहीं.

**श्री**

साहेब मुपफक मेहरबान करमफ-
र्माय दोस्तान मिस्तर चापलीन साहेब
बाहादूर यासी

यशोदाबाई पेशवे सलाम बागद पोक तमाम आंकी येथील खेरीयत लगायत छ ४ मोहरम जाणून हमेषा कैफियत खुद लेहून दिलसरी हासल करीत जाणे दिगर माार आम्हास बरानपूर मुकामी येऊन बीस महिणे जाले. चहूकडे माहिती तेव्हा साहेब लोकास विदित असोन कोणीहि माहितगार पाठऊन चौकसी करणे लाजम. परंतु सेवक वेगल जबाब अकलमंद देत नसतात हे जाणून बरखुरदार गणपतराव नारायण श्रीवर्धनकर मंबईस अलफिष्टनसाहेब याजकडे बोलणेस खरिता देऊन रवाणा केले. त्यास आज्ञा पुणे मुकामी तुमचे नावचा खरिता तुम्हास देऊन तुमचे इतिल्याने मंबईस जावे त्या बेताप्रमाणे वकील माराचे मुखे वर्तमान यैकून पुढे रवाणा केलेच असेल. लेकीन छ १७ माहे जिल्हेजीस पुणे मुकामी पोहचले बाा येकहि पत्र येत नाही याजमुले पुन्हा हे पत्र पाठविले आहे. वकिलासी दिगर हरकतीचे करण तो नाही. जर करिता कोणाचे सांगणेवर कल्पना बागली असेलीयास हाली देखत पत्र आम्ही चौकसी करावयाचे कारण काय

हा जाब देऊन बिदा करणे म्हणजे स्वार होऊन ग्वालेरीस इष्टर साहेब याजकडे जाऊन त्याचे विचारं जो बेत ठरेल तैसे करू अगर दुसरी कल्पना नसली तर वकील मारास मंबईस रवाणा करूण देणे. हमेषा खत किताबत पाठवून सेरी हासल करीत जाणे. दराज् कार्य लिहिणं हे किताबत.

¶*The pretender of Yashodabai communicates to Chaplin that she has deputed Ganpatrao Narayan to Bombay on some mission and requests him to help him. The real Yashodabai had died in 1811 at Raigad.*

---

*No. 321*] [*24-9-1825.*

या दोनी पत्राचा तरजमा
करवावा करविली

श्री

चिरंजीव राजश्री गणपतराव नारायण श्रीवर्धनकर यासी यशोदाबाई पेशवे पंतप्रधान आसी उपरी. येथील क्षेम ता छ ११ माहे सफर मुकाम बोरगांव किल्ले आखेरपासोन उतरेस पांच कोस जाणून स्वकीय लिहिणे विशेष. तुम्ही पुणे मुकामी पोहचलीयावर परस्परे तुम्हास अटक जाली म्हणोन कललेवरूण मुजरद जोडी रवाणा तुम्हास व चापलीनचे नावे पत्रे लेहून रवाणा केल ते आठ च्यार दिवस राहून आले परंतु उतर कोणाचेच नाही. यातील मुख्यार्थ आजपावेतो अंगरेज बाहादुराचे येथे इनमाफा आहे परंतु तिा रा बाबासोचे वर्तनुकीची हवा सर्वात्रास लागून कपटखाणी जवल्यात ब्राम्हणमात्र विशेष यदर्थीच तुम्हास अटक जाली. यर्थी प्रयोजन नव्हतं. सांप्रत येथील वर्तमान चिरंजीव राजश्री मौनीबावानी बरानपुराहून कूच करून उतर दिसेस जाणेचा बेत ठरऊन आले. हा मार तुम्हास माहीत आहेच. तो प्रकार आपलाच केलेला सबब षहरातून निघालियावर आम्ही किल्ले रायेगड येथून कैसे निघालों तो मार नारो गोविंद किल्ले रायेगड याचा बंधू गणपतराव गोविंद आवटी यास सविस्तर माहीत यदर्थी बो बालोजी फाटक(?) नगरास गेलाच होता. तो इकडील उतर आणऊन न घेता हजार रुपये देणे कबूल करूण घेऊन आला. भेटी होऊन परस्परे भाषणे मिलणीची प्राचीन ओलखी निघोन रामसिंग चपरासी निा राज * * * सिपाही कारकून पागिर्दपेषा वगैरे सर्वाची खात्री करू लागला की आजपावेतो खरे खोटे ही भ्रांती आता कोठेहि भय नाही. आपण मुंबईस व कालतीस सरकरतरफेने जातो. त्याची पत्रे व मौनीबावास ग्वालेरीस ग्वालेरीस व कानतीवर पाठवणेची पत्रे लिहून तयार जाली. निषार्निया होणे मात्र शेष

7307

होते व कानर्ताचे रस्त्याप्रमाणे से दोनसे खर्चास देऊन रवाणा करावे तो आवटी मार बाबासाहेबाचा पागीर्द त्यास हजार रुपये रुपवत घेणे आम्हास तर रुपवंत देऊन साक्ष घेणे मंजूर नाही सबब त्याणी मोरोबा दातार व बालोजी फाटक यास फितुरात घेऊन मिथ्या मार लेहून आना शपता वाहून मतलब न दाखविता तुमचे जावई परशरामपंत याची साक्ष पालथे कागजा(दा?)वर(?) घालोन घेऊन परतु यैसीयासी ईश्वरनिष्ट होऊन इनसाफ जालियावर चिंता नाही. आम्हास दातार व आवटी नव्हेत. अमक्याची कन्या इत्यादि मधुपानवत भाषण करूण त्याचे लेख होऊन जालियास क्षीर नीर निवड हंस करितो. येरवी तर अंधेर आहेच. वरे आम्ही दरकूच उतर दिसेस गेलो. तुम्ही अधीर न व्हावे. हारयेक स्थली अंगरेज बहादुराचे विद्यमाने वकिलास अटक अनुचित यैसी ताकीद होऊन तुमची मुक्तता करणेत येइल. तुम्ही धैर्य सोडू नये. बहुत काय लिहीणे हा आसीर्वाद.

¶*The pretender of Yashodabai (the wife of Peshwa Madhavrao Narayan) expresses her full faith in the good sense of the English and puts heart in the addressee—Ganpatrao Narayan saying that he would soon be set free from confinement.*

---

*No. 322]* *[26-5-1846*

नकल

१/४

जबानी गणेश कृष्ण उर्फ रावजी पेंडसे उमर सुमार वर्षे ६४ जात ब्राह्मण कसब कारकुनी वस्ती पेठ मेहूणपुरा शहर पुणे याणी येजंट साहेब याचे रुबरू लिहून दिल्हे जे, आम्ही पेषवाईपासून दप्तरात कामावर होतो. इंग्रेजी अमल जाल्यावरहि दप्तरचें काम पाहिलें. हली पेनसेन घेऊन घरी आहों, येजंट साहेब याणी येक पत्र नीलकंठराव सिंदे याचे नांवें माधवराव बलाल प्रधान याणी लिहिलेले ता। ५ जमादिलाखर सूर सन तिसा सितैन सालचे दाखविला हे पाहिलो. अक्षरशाहा व त्याजवर जे सिके आहेत हेहि पुर्तेपणे पाहिलो हे पत्र पेषवे सरकारचे दप्तरातून जाहालेले व खर असे आमचे नजरेस येत नाही. याचे कारण की सदरहू रीतीचे पत्र व्हावे तर फडणविसींचे दप्तराकडून व्हावे आणि हे पत्राचे अक्षरे फडणविसीकडील कारकुन याचे हातचे लिहिणे नव्हे व चिटणिसीकडील कारकून याचे हातचेहि नाही व पत्रात मजकूर लिहिले हे अक्षरें व खाली ते-रिखेपासून जे अक्षरें लिहिले आहे हे सर्व एकाचेच हातचे आहे यात काही संशय

7308

नाही, परंतु भेद मालुम पडावें या बद्दल तेरिखेपासून वळण चुकवून लिहिला आहे परंतु ते साहक नाही. तेरीख व बहुत काय लिहिणे हे पेषवेचे वेळेस ज्याचे हातून व्हावे याचे चाल त्याचे हातचे जाहलेले नाही व सिका पाहिला असता खुद सिका व मुतालिकी सिका यासी बिलकूल मिलत नाही. सिक्याचे क्षेत्र पाहिला असता ते पेशवे सरकारचे सिके होते त्याहून अधिक आहे व सिक्यातील अक्षरे गोवरे वाकडे तिकडे आहेत हे अक्षर व पेषवे सरकारचे सिक्याचे अक्षरास अगदीच मिलत नाही व लिहिण्याचे पध्दतीवरून पाहाता नीलकंठराव सिंदे हे सरदार आहेत याचे नावे पत्र लिहून पेशवे याणी सिका करावेयाचे जाहले तर पाठीमागे दोनतीन वली टाकून सिका करावेयाचे चाल, असे असून या पत्रात मांघ पहिले वलीस लागूनच सिका आहे असे होणार नाही व पत्र लिहिणे जाहल्यास वली जे लिहितील व त्या वलीवर सिका येईल तरी चिंता नाही असी पेशवाईतील चाल व या पत्रास तर सिका करण्याबद्दल बुध्या जागा टाकून लिहून कोरे जागी सिका केले आहे असे कधीच होणार नाही व लखनसीमा हे सिका आखेरीस आहे हे पेषवाईतील लखनसीमाचे सिक्याचे क्षेत्रापेक्षा अधिक आहे व अक्षरहि चागले उमटले नाही व पत्रात दौलतराव हे गजेंद्रगडकर घोरपडे आहेत याणी समजाविल्यावरून पत्र जाहले असेल तर त्यात सांगितले असे बराबरीचे शब्द कधी लिहिणार नाही. विनंती केली असेवगैरे अदबेचे शब्द लिहितील ते तसे नाही (आशास) असे पेषवाईत कधी लिहिण्यात येत नव्हते. एसिजांसी असें लिहितील व पत्रांत गावगनेचे नाव जे लिहिले ते चालती वलीने लिहिले आहेत, पेषवाईत असा लिहिण्याचा सांप्रदाय नव्हता. जर गावचे नाव पत्रांत लिहितील तर येकाचे आकडा टाकून दुबाजू किंवा येक बाजू मौजे म्हणून लिहून गावचें नाव लिहितील व या पत्रात वंशपरंपरा अनभऊन निष्टपणे असावे चालवण्यास मुजाहिम होणार नाही म्हणून लिहिला आहे. पेषवाईत पुत्र-पौत्रादि वंशपरंपरा म्हणून लिहितील सिवाये फक्त वंशपरंपरा असे कधी लिहिणार नाही. येकनिष्टपणे असावे असे लिहितील, निष्टपणे असे लिहिणार नाही. चालवण्यास मुजाहिम होणार नाही असा शेब्द सनदपत्रांत पेषवाईचे वेळेस कधीच लिहीत नव्हते आणि पत्र तमाम पाहता त्यांत स्त्रीलिंग पुलिंग नपुंसकालिंग हे शब्द बराबर लिहिले नाहींत. इछेस वाटले तसे गाबडी शेट लिहिले आहेत ते शेब्द कर्नाटकाकडील मराठी पुर्ते न जाणणारे लिहितात तसें लिहिलेले आहे. याजवर पेषवेसरकारचे व दरकदार याचें चिन्हे कधी होणार नाही. ता। ९ माहे म्हणून पत्रात आहे. पेषवाईत नुसते तेरीख लिहून महिना लिहितील, सिवाय माहे असे लिहिणार नाहीं व पेषवाईत कागद तयार जाल्यावर सिका करिताना सिका

बराबर उमटला नाही किंवा शाई अधिक लागली तर फिरऊन दुसरी सनद फार करून लिहीत नव्हते, तेच कागद देत होते. ते जर खर असेल तर वलखण्यास अनेक चिन्हे त्याजवर असतात ते या पत्रांत येकहि नाही व हर येक सनदेत आज्ञाप्रमाण असे म्हणावेयाचे चाल आहे. परंतु हे पत्र नीलकंठराव सिंदे याचे नावे आहे सिंदे हे बहुत काय लिहिणे म्हणून लिहिण्याचे योग्यतेच होते इतर गावचे नावे वगैरे सनद लिहितील तर आज्ञाप्रमाण म्ह(ण)ण्याची चाल होती. या सर्व कारणावरून सदर्हू पत्र पेशवे सरकारचे दप्तरचे नव्हे व खरे पत्र नाही असे आमचे खातरी आहे व आणिक जाहीर करितो की या पत्रावर (बार) असे जे आहे ते दुसरे रखानेत शेवटचे बाजूस आहे असे पेषवाईत कधी बार असे लिहीत नव्हते. सनदपत्र दप्तरी बार जाहल्यावर कागदाचे मध्येभागी जे कागद मोडल्याचे साध आला असेल तेथे बार म्हणून ल्याहावेयाचे चालते. (बार) या प्रमाणे मध्येभागी लिहीत होते व कागद गोवेकडील आहे. जर पेषवेचे स्वारी कर्नाटकांत गेली असेल त्यावेलेस पत्र लिहितील तर असे कागदावर लिहितील परंतु या पत्राचे कागद फाडलेसारखे आहे. असे फाडून कागदावर पेषवाईत कधीच लिहिणार नाही. कागद बराबर कातरून लिहितील या सर्व कारणावरून सदर्हू पत्र मुधव बनावट आहे—याप्रमाणे लिहून दिल्हा सही ता। २६ माहे हे सन १८४६ इसवी.

(सही) गणेश कृष्ण पेंडसे दस्तुर खुद.

सही साहेबाची इंग्रजी

नकल रुजु पाहणार भास्कर गणेश कारकून.

¶*Ganesh Krishna Pendse gives evidence as to how to distinguish a false copy of a document from its original.*

---

# Index to Selection No. 41

*The last days of the Maratha Raj*

(Figures refer to numbers of letters.)

A



A—contd.

B



B—contd.

B—contd.

C—contd.



D

D—concld.



E



E—contd.

E—concld.



F



G



G—contd.

G—concld.



H



H—contd



I



J

## K



## K—contd.



## L



## M

M—contd.





M—contd.

M—concld.



N



N—contd.



O



P

P—contd



R



R—contd

R—concld.



S



S—contd.

S—concld.



T





T—contd.



U



V

V—contd.



W



Y



Y—contd.



Z





BOMBAY : PRINTED AT THE GOVERNMENT CENTRAL PRESS.